M-2918

| शिर्षक | ग्रंथकार | विषय | विस्तार (पुर्ण/ अपूर्ण) | टिकाकार | आकार | पृष्ठे | लिपी | सामग्री | Lines per page | Letters per line | Condition & age (शके/विक्रम सवंत) | Additional Particulars / Remark |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अधिक मास महात्म्य | परशुराम धगव | दर्शन | पूर्ण | — | 5/8 | ६० | मराठि | कागद | | | | |

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुचरणाभ्यां नमः ॥ ॥ जयजय नमो गणनायका ॥ गजवदना विघ्नहारका ॥ मंगळमूर्ति मंगळंकारका[1] ॥ सुखदायका दयाघना ॥ १ ॥ तूं सर्वेश्वर पूर्णकाम[2] ॥ भक्तकामनाकल्पद्रुम ॥ आरंभीं तुज करितां प्रणाम ॥ सकल कांम[3] पुरविसी ॥ २ ॥ ऐसी तुझी विशुद्ध कीर्ति ॥ श्रुती स्मृति पुराणें गाती ॥ म्हणोन आरंभीं तुज गणपती ॥ साष्टांग नमन करिताहें ॥ ३ ॥ तरी दयाळा कृपा करून ॥ निरसीं सकळ विघ्नांचे गण ॥ उत्तम कवितार्थ बुद्धि देऊन ॥ कामना पूर्ण करीं माझी ॥ ४ ॥ ऐसा प्रार्थिला गणपती ॥ आतां नमितों श्रीसरस्वती ॥ जे कवि जिव्हाग्रीं करूनि वसती ॥ रसाळ ग्रंथ बोलविते ॥ ५ ॥ आतां नमितों श्रीसद्गुरु ॥ जो परमानंदामृतसागरू ॥ जयाच्या कृपाकटाक्षें नरू ॥ भवाब्धिपारू पावत ॥ ६ ॥ आतां नमूं श्रीधूतपापेश्वर ॥ जो कुलस्वामी कृपासागर ॥ तैशीच कुलस्वामिणी सादर ॥ आर्यादुर्गा वंदितों ॥ ७ ॥ आतां नमितों कवि निर्मळ ॥ ज्याहीं रचिले ग्रंथ सोज्वळ ॥ आणि मातापित्रादिक जे वडिल ॥ तेहि सकळ वंदितों ॥ ८ ॥ आतां नमोजी पुरुषोत्तमा ॥ पुराणपुरुषा पूर्णकामा ॥ योगिजनमनोविश्रामा ॥ आत्मारामा स्वामिया ॥ ९ ॥ तूं अंज[4] अच्युत निरुपाधिक ॥ अनंतकोटी ब्रह्मांडनायक ॥ जगदुत्पत्तिस्थित्यंतकारक ॥ जगद्व्यापक जगद्गुरु ॥ १० ॥ तूं सकळ देवांचें दैवत ॥ कलाकाष्ठादिकालांतमा[5] अनंत ॥ तुजला जे कां शरण रिघत ॥ तयां कृतांत[6] बाधिना ॥ ११ ॥ तूं वेदशास्त्रांसी अगोचर ॥ तुझा नकळे कोणासी पार ॥ त्रिगुणातीत सच्चिदक्षर ॥ परात्पर परब्रह्म ॥ १२ ॥ त्वत्कृपा होतां अंध पांगुळ ॥ वेगें उल्लंघिती महा अचंळ[7] ॥ आणि मूकहि होती सुवाचाळ ॥ वांचस्पती[8] सारखे ॥ १३ ॥ तुझा गुणसमुद्र अनंत ॥ त्याचा न लागे कोणाहि अंत ॥ ऐसें असतां मी मूढ अत्यंत ॥ वर्णना प्रवृत्त जाहलों ॥ १४ ॥ हें तों माझें धार्ष्ट्य[9] तत्वतां ॥ परी तुझें तुजपुढें बोलतां ॥ काय पडेल मज न्यूनता ॥ अवघी सत्ता त्वत्कृपेची ॥ १५ ॥ कायावाचामनोभावेंसीं ॥ नमस्कारिती

१

१ कल्याण करणारा. २ परिपूर्ण आहेत मनोरथ ज्याचे. ३ मनोरथ. ४ जन्मरहित. ५ कलादिकालरूप. ६ यम. ७ पर्वत. ८ बृहस्पतीसारखे. ९ धीटपणा.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

जे तुजसी ॥ तया तूं प्रसन्न हृषीकेशी ॥ बुद्धि देसी उत्तम ॥ १६ ॥ ऐसें संत बोलती म्हणून ॥ भावें करितों तुज नमन ॥ तरी भगवंता कृपा करून ॥ ग्रंथरचना करवीं बा ॥ १७ ॥ असो व्यासें पाद्मीं एक ॥ आणि बृहन्नारदीयांत आणिक ॥ अधिकमासमाहात्म्य सुरेख ॥ गीर्वाणभाषें वर्णिलीं जीं ॥ १८ ॥ तयांचा काढूनि मथितार्थ ॥ सकळजनां समजे यथार्थ ॥ ऐसें महाराष्ट्रभाषें येथ ॥ यथामति वर्णितों ॥ १९ ॥ त्यांत होतां न्यूनाधिकता ॥ संतश्रोतीं क्षमिजे सर्वथा ॥ बाळ बोबडे बोल बोलतां ॥ मातापितरें आनंदती ॥ २० ॥ नैमिषारण्यामाजीं सूत ॥ शौनकादिऋषिजनांप्रत ॥ नानापुराणकथा विस्तृत ॥ नित्य नूतन सांगतसे ॥ २१ ॥ तों एकदां ते सर्व ऋषी ॥ विनयें विनविती सूतासी ॥ हे व्यासशिष्या तूं पुण्यराशी ॥ आणि भाग्यवान आहेस ॥ २२ ॥ व्यासकृपें तद्वचनाचें ॥ सकळ हार्द जाणसी साचें ॥ म्हणोन आम्ही सुव्यक्तवाचें ॥ तुजलागीं विनवितों ॥ २३ ॥ ह्या असार संसारांत ॥ सहस्रावधि श्रोतव्यें असत ॥ त्यांतून श्रेयस्कर थोडक्यांत ॥ सारभूत असेल जें ॥ २४ ॥ आणि परमानंदासी कारण ॥ संसाराब्धितारक पावन ॥ तें आम्हां ऋषिजनांलागुन ॥ सर्व विवरून सांगिजे ॥ २५ ॥ ऐसी ऋषींची ऐकोनि वाणी ॥ सूत म्हणे हो महामुनी ॥ मी केवळ विलोमज असोनी ॥ मजला तुम्ही प्रश्नितां ॥ २६ ॥ तस्मात् धन्य झालों निश्चित ॥ तरी व्यासापासून जें कां श्रुत ॥ तेंचि तुम्हांसी यथास्थित ॥ यथामति सांगतों ॥ २७ ॥ ब्रह्मनंदन नारदयोगी ॥ स्वेच्छें फिरतां फिरतां त्रिजगीं ॥ हिमाचलाच्या समीपभागीं ॥ बदरिकारण्यीं पावला ॥ २८ ॥ जें नारायणाचें स्थान ॥ परम पावन तपोवन ॥ जेथें गगनापर्यंत महान ॥ वृक्ष विस्तीर्ण पसरले ॥ २९ ॥ जयाची छाया घनदाट ॥ रविकिरणां नसे वाट ॥ नानालतांकुंज सदट ॥ ठायीं ठायीं शोभती ॥ ३० ॥ बदरी आम्रातक बेल ॥ फणस जंबू धात्री रसाल ॥ आणि खर्जूरादि वृक्ष विपुल ॥ सदा सफल पैं जेथें ॥ ३१ ॥ विष्णुपादोदकी पवित्र ॥ जेथें गंगा वाहे विचित्र ॥ पशुपक्ष्यादि जीव सर्वत्र ॥ निर्वैर जेथें

१ पद्मपुराणांत. २ दुसरें. ३ व्यासाचे वाणीचें. ४ हृद्गत ( मार्ग ). ५ स्पष्ट वाचेनें. ६ ऐकण्याला योग्य. ७ संकरजातीचा. ८ झुडूप. ९ मोठें. १० बोरी. ११ रातंबी. १२ जांभळी. १३ आंवळी. १४ आम्र. १५ विष्णूच्या पायांपासून झालेली.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

क्रीडती ॥ ३२ ॥ जेथें तेथें तुलसीवनें[१] ॥ शोभती पुष्पवृक्षांचीं काननें ॥ जाई जुई मालती सुमनें[२] ॥ प्रफुल्ल जेथें सर्वदा ॥ ३३ ॥ तपोधनांच्या पर्णकुटी ॥ जेथें शोभती गंगातटीं ॥ ठायीं ठायीं योगी हटी ॥ योगसाधना बैसले ॥ ३४ ॥ असंख्य सिद्धगण सतत ॥ परमानंदनिमग्न असत ॥ देवगणही आत्मसुखार्थ ॥ जेथें येऊनि राबती ॥ ३५ ॥ असो ऐशा त्या बदरीवनीं ॥ नरनारायणाच्या आश्रमस्थानीं ॥ विरिंचिसुत[३] नारदमुनी ॥ अकस्मात् पातला ॥ ३६ ॥ तों तेथें नारायणऋषी ॥ जितेंद्रिय महा तापसी ॥ परब्रह्म चिंतीत मानसीं ॥ तेजोराशि बैसलासे ॥ ३७ ॥ देव ऋषि मुनि सिद्धगण ॥ जया बैसले वेढून ॥ तया पाहतांचि ब्रह्मनंदन ॥ साष्टांग नमिता जाहला ॥ ३८ ॥ सर्वेचि जोडून करद्वय ॥ मधुरवाणी बोलता होय ॥ नारायणा तूं निष्काम[४] निष्क्रिय[५] ॥ परमेश्वर आहेसी ॥३९॥ तुज तपाचें कारण नाहीं ॥ परी तें करितोसि ये ठायीं ॥ हें लोकशिक्षार्थ आणि कांहीं ॥ असे मर्यादास्थापनार्थ ॥ ४० ॥ नातरी ह्या कलियुगांत ॥ एकेंचि केलेल्या पापें त्वरित ॥ ही मेदिनी बुडती समस्त ॥ आणि तरती पुण्यें एकाच्या ॥ ४१ ॥ पूर्वीं कृतादियुगांमाझारीं ॥ एककृत पापें कीं पुण्यें सारीं ॥ सर्वगत[६] होत निर्धारीं ॥ ऐसी स्थिती होती जी ॥ ४२ ॥ तैशा स्थितीचा केला लोप ॥ आतां ह्या कलींत पुण्य वा पाप ॥ कर्ताचि एक भोगितो आप[७] ॥ इतरां लेप[८] नव्हेचि ॥ ४३ ॥ तरी सर्वीं स्वयें पुण्य करावें ॥ हेंचि स्वकृतीनें सुचवावें ॥ यास्तव परोपकृतिस्वभावें[९] ॥ तप करीत बैसलासी ॥ ४४ ॥ ह्या असार संसारांत ॥ विषयासक्त प्राणी समस्त ॥ गृहधनदारापुत्रादिकांत ॥ लंपट झाले आहेती ॥ ४५ ॥ तयांचें जेणें कल्याण होई ॥ आणि हितकर असेल माझेंही ॥ ऐसें चित्तीं विचारूनि कांहीं ॥ सांगाया योग्य आहेस ॥ ४६ ॥ त्वन्मुखांतून कीजे श्रवण ॥ म्हणोन येथें आलों शरण ॥ उपकारप्रिय तूं भगवान ॥ ऐसें वेदही बोलतात ॥ ४७ ॥ तरी लोकोपकारार्थ ॥ कांहीं कथा सांगें मजप्रत ॥ जियेच्या श्रवणमात्रें खचित ॥ निर्भय स्थान लाभेल पैं ॥ ४८ ॥

---

१ वनें. २ पुष्पें. ३ ब्रह्मदेवाचा पुत्र नारद. ४ निरिच्छ. ५ क्रियारहित. ६ सर्वांनीं केलीं अशीं. ७ स्वतां. ८ संपर्क. ९ परोपकार स्वभावानें.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

ऐसी नारदोक्तवाणी ऐकुनी ॥ अत्यानंदें नारायणमुनी ॥ भगवत्कथा पुण्यपावनी ॥ प्रेमें सांगूं लागला ॥ ४९ ॥ मध्यें मध्यें ब्रह्मनंदन ॥ शंका घेऊन करी प्रश्न ॥ सर्वांचि तयाचें समाधान ॥ नारायण करितसे ॥ ५० ॥ ऐसा क्रम बहु चालला ॥ तों प्रसंगें नारायण बोलला ॥ नारद पुरुषोत्तमाचा भला ॥ सर्वोपरि महिमा असे ॥ ॥ ५१ ॥ तें ऐकुनी ब्रह्मनंदन ॥ म्हणे देवा पुरुषोत्तमाभिधान ॥ तुवां कथिला तो देव कोण ॥ आणि काय माहात्म्य तयाचें ॥ ५२ ॥ तें मज कथीं विस्तारेंसी ॥ अत्यद्भुत वाटतें मानसीं ॥ ऐसें ऐकुनी नारायण ऋषी ॥ देवर्षीसी बोलत ॥ ५३ ॥ नारदा त्वां पुसिलें उत्तम ॥ तरी सांगतों ऐक वर्म ॥ पुरुषोत्तम ऐसें मासाचें नाम ॥ सहेतुक असे पैं ॥ ५४ ॥ तयाचा स्वामी कृपासागर ॥ पुरुषोत्तम होय साचार ॥ म्हणोन त्यासही ऋषीश्वर ॥ पुरुषोत्तम म्हणतात ॥ ५५ ॥ आणि त्या मासाचें व्रत ॥ भक्तीनें आचरतां यथास्थित ॥ पुरुषोत्तमदेव रमानाथ ॥ संतुष्ट होतो निर्धारें ॥ ५६ ॥ ऐसें नारायणें कथिलें ॥ तें ऐकुनी नारदें पुशिलें ॥ म्यां चैत्रादिक मास सगळे ॥ सेश्वर ऐकिले आहेत ॥ ५७ ॥ त्यांत पुरुषोत्तमाभिधान ॥ एकहि मास नाहीं जाण ॥ तरी पुरुषोत्तम हा कवण ॥ कैसा काय मास असे ॥ ५८ ॥ आणि ह्याचा स्वामी कृपानिधी ॥ पुरुषोत्तम झाला कैसा कधीं ॥ तैसेंचि तयाचें स्वरूप सविधि ॥ कैसें काय असे पैं ॥ ५९ ॥ आणि त्यांत कोणतीं कृत्यें करणें ॥ कोणतीं कैसीं दानें देणें ॥ जप पूजोपवासादि साधनें ॥ कैशीं कवणें करावीं ॥ ६० ॥ आणि तीं तैशीं करितां सर्व ॥ संतोषतो कोणता देव ॥ आणि तो कैसें काय अभिनव ॥ फल देतो कर्त्यासी ॥ ६१ ॥ हें आणि इतरहि कांहीं ॥ असेल तें सांग सर्वही ॥ दीनवत्सल साधु ते पाहीं ॥ न पुसिलें तेंहि कथितात ॥ ६२ ॥ नारायणा पृथ्वीवरुती ॥ परोपरीचे नर जे असती ॥ त्यांतून परभाग्यानुवर्ती ॥ ऐसे असती कित्येक ॥ ६३ ॥ एक सदा दारिद्र्यपीडित ॥ नित्यरोगी कित्येक असत ॥ एक मनीं पुत्र इच्छित ॥ परी त्यां प्राप्त नव्हेचि ॥ ६४ ॥ जड मूक अंध दांभिक ॥

१ नारद. २ लागलेंच. ३ नारदास. ४ खरोखर. ५ स्वामीसहित. ६ पुरुषोत्तमनामक. ७ चमत्कारिक. ८ दुसऱ्यावर अवलंबून राहाणारे.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

विद्याहीन कुचैली एक ॥ नीच लंपट जर्जर नास्तिक ॥ तैसेचि कित्येक परसेवी ॥ ६५ ॥ नष्टाश आणि भग्नसंकल्प ॥ क्षीणसत्व[1] अत्यंत कुरूप ॥ कित्येकांचे अंगीं अमूप ॥ रोग होत कुष्ठादी ॥ ६६ ॥ एकां मातापित्यांचा वियोग ॥ इष्टमित्रांचा नाहीं संग ॥ स्वेष्टवस्तुवर्जित व्यंग ॥ ऐसेहि कित्येक होतात ॥ ६७ ॥ तरी ते जयाचे आचरणानें ॥ कीं पठणें किंवा श्रवणानें ॥ पुनश्च तैसे न होत कशानें ॥ तें मज सांगणें दयाळा ॥ ६८ ॥ वैधव्य आणि वंध्यता दोष ॥ हीनांग दुराधि[2] अशेष ॥ रक्तपित्त अपस्मार विशेष ॥ तैसेचि राजयक्ष्मादिक[3] जे ॥ ॥ ६९ ॥ ह्या सर्व दोषसमूहांनीं ॥ दुःखित ऐशा नरां पाहुनी ॥ मी अति दुःखित झालों म्हणोनी ॥ कृपा करी मजवरी ॥ ७० ॥ जैसें तोषेल मर्मांतरंग ॥ तैसें सविस्तर मजला सांग ॥ तूं सर्व तत्वांचा निधि अभंग ॥ सर्वज्ञ समर्थ आहेसी ॥ ७१ ॥ ऐसें देवर्षीचें वचन ॥ ऐकून बोले नारायण ॥ नारदा लोकहिताकारण ॥ उत्तम प्रश्न केलासी ॥ ७२ ॥ तरी श्रीकृष्णनाथें ॥ युधिष्ठिरासी कथिलें होतें ॥ तेंचि तुज मी सांगतों येथें ॥ एकाग्रचित्तें ऐकिजे ॥ ७३ ॥ दुर्योधनादि कौरव अशेष ॥ महाकपटी दुष्ट विशेष ॥ तयीं एकदां युधिष्ठिरास ॥ कपटद्यूतें फसविलें ॥ ७४ ॥ कपटपाशीं क्रीडा करून ॥ सर्वस्व घेतलें हिरावून ॥ राज्य भृत्य[4] वस्त्र कीं भूषण ॥ कांहींच नाहीं उरविलें ॥ ७५ ॥ शेवटीं प्रिया याज्ञसेनी[5] ॥ तीहि जिंकिली पणा लावुनी ॥ सर्वेची तियेसी ओढित आणुनी ॥ सभेमाजीं विटंबिलें ॥ ७६ ॥ आणि दुःशब्द बोलूनि नाना ॥ पांडवांची केली निर्भर्त्सना ॥ ती ऐकूनि सभ्यजन माना ॥ खालीं घालूनि बैसले ॥ ७७ ॥ कोणी कांहीं न करी भाषण ॥ द्रौपदी झाली अति दीन ॥ तैं श्रीकृष्णें गुप्त येऊन ॥ रक्षण केलें तियेचें ॥ ७८ ॥ मग ते धर्मादि पंडुसुत ॥ राज्य टाकूनियां समस्त ॥ अत्यंतदुःखें कृष्णेसंहित[6] ॥ वनवासार्थ चालिले ॥ ७९ ॥ वनोपवनें अतिक्रमुनी ॥ जाऊन राहिले काम्यकवनीं ॥ अरण्यवासी जैसे मुनि ॥ तैसे झाले तत्काळ ॥ ८० ॥ अंगावरी नाहीं वसन ॥ करित वल्कलें[7]

१ निर्बल. २ वाईट रोगादिकांपासून होणारी मनोव्यथा. ३ क्षयरोगादिक. ४ सेवक. ५ द्रौपदी. ६ द्रौपदीसहित. ७ वस्त्र.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

परिधानं[1] ॥ कंदमूलफलांचें अशनं[2] ॥ रात्रीं शयन भूमीवरी ॥ ८१ ॥ कमंडलूचें जलपात्र ॥ द्रव्यलेश नसे अणुमात्र ॥ दैवगति अत्यंत विचित्र ॥ काय सांगूं नारदा ॥ ८२ ॥ असो ऐसे ते पंडुसुत ॥ द्रौपदीसह काम्यकवनांत ॥ नाना दुःखांचे अनुभवा घेत ॥ काल क्रमीत राहिले ॥ ८३ ॥ पुढें एकदां द्वारकाधीश ॥ सवें घेऊनि मुनिगणास ॥ दुःखित पांडवां भेटावयास ॥ काम्यकवनास पातला ॥ ८४ ॥ तया पाहतांक्षण ते पांडव ॥ परमानंदें उठले सर्व ॥ प्राणागमनें देह सजीव ॥ होऊनि जैसें उठावें ॥ ८५ ॥ सर्वेचि धर्म भीम अर्जुन ॥ पुढें धांवले तिघेजण ॥ प्रेमभरें श्रीकृष्णालागून ॥ अनुक्रमें आलिंगिलें ॥ ८६ ॥ नंतर नकुळसहदेवांनीं ॥ मस्तक ठेविलें कृष्णचरणीं ॥ गहिंवरोनी याज्ञसेनी[3] ॥ पायां पडली तत्क्षण ॥ ८७ ॥ तों त्या पांडवांची दुःखदशा ॥ आणि द्रौपदी झाली बहु कृशा ॥ ऐसें पाहूनि द्वारकाधीशा ॥ दुःख अत्यंत जाहलें ॥ ८८ ॥ आणि कौरवांच्या नाशालागुन ॥ चित्तीं चेतविला क्रोधाग्न ॥ आरक्त झाले दोन्ही नयन ॥ तप्त लाहगोल जैसे ॥ ८९ ॥ भालपटीं पडल्या आंठी ॥ अत्यंत वक्र झाल्या भ्रुकुटी ॥ कल्पांतकाळींचा घोर धूर्जटी[4] ॥ तैसा जगजेठी जाहला ॥ ९० ॥ करकरां दांत खाऊन ॥ महाकाळसा उठला तत्क्षण ॥ अग्निज्वाळांपरि मुखांतून ॥ ऊष्ण श्वास चालले ॥ ९१ ॥ तें कृष्णाचें भयानक रूप ॥ पाहूनि सर्व भ्याले उमोपं[5] ॥ अंगीं सुटला थरथर कंप ॥ कर्तव्य कांहीं सुचेना ॥ ९२ ॥ तैं धर्मादिकीं अर्जुनाला ॥ सुचवितांक्षणीं तो उठला ॥ हस्त जोडूनि श्रीकृष्णाला ॥ अति विनयें प्रार्थित ॥ ९३ ॥ म्हणे हे कृष्णा रुक्मिणीकांता ॥ देवदेवा जगन्नाथा ॥ तूं सकळजगाचा त्राता[6] ॥ भक्त कैवारी आहेस ॥ ९४ ॥ आणि मी तो तुझा भक्त पाहीं ॥ जगाबाहेर राहात नाहीं ॥ जगाचा नाश होतां मीही ॥ नाश पावेन निश्चयें ॥ ९५ ॥ जयाच्या केवळ दृष्टिपातेंसी ॥ ब्रह्माही जाय विलयासी ॥ तयाच्या कोपें जगाची कैशी ॥ काय कीं स्थिती होईल ॥ ९६ ॥ याचा अंतरीं विचार करी ॥ दुष्ट कोप शीघ्र आवरीं ॥ त्वंद्विधांच्या[7] कोपें सत्वरीं ॥ जगत्प्रलय होईल ॥ ९७ ॥ देवा तूं सर्वज्ञ परमेश्वर ॥ सर्वमांगल्यबीज[8] परिकर ॥ त्वांचि हें सकळ चराचर ॥ स्वयें सृंजिलें[9] असें पैं ॥ ९८ ॥ तरी

१ धारण. २ भक्षण. ३ द्रौपदी. ४ रुद्र. ५ पुष्कळ. ६ रक्षण करणारा. ७ तुझ्यासारख्यांच्या. ८ सर्व कल्याणाचें बीज. ९ उत्पन्न केलें.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

ह्या स्वकृत जगालागुन ॥ कैसा संहारिसी आपण ॥ एकें अपराध केला म्हणून ॥ दुजासि कोण शासील ॥ ९९ ॥ कीं मशक देती बहु त्रास ॥ म्हणोन त्यांचा कराया नाश ॥ आपुल्या राहात्या मंदिरास ॥ कोण पुरुष जाळील ॥ ॥ १०० ॥ अंतरीं पाहे विचारून ॥ तूं सर्ववेत्ता भगवान ॥ मी अनाथ पामर हीन दीन ॥ चरणीं शरण रिघताहे ॥ १ ॥ एवं प्रार्थूनियां सादर ॥ अर्जुनें केला नमस्कार ॥ तैं तो भक्तवत्सल शार्ङ्गधर ॥ प्रेमपुरें थबथबला ॥ ॥२॥ आणि समूळ कोप निरसून ॥ सौम्य झाला चंद्रासमान ॥ ऐसा तयासी विलोकून ॥ पांडव पूर्ण आनंदले ॥ ॥ ३ ॥ आणि प्रेमें वंदूनि हरिचरण ॥ मग वंदिले सर्व मुनिगण ॥ आसनपाद्यादि समर्पून ॥ केलें पूजन सर्वांचें ॥ ४ ॥ आणि कंदमूळ फलादिक ॥ प्रेमें समर्पिलीं अनेक ॥ बहुकाळें भेटला जगन्नायक ॥ तैंचें कौतुक काय सांगूं ॥ ५ ॥ मग ते धर्मादिक पांडव ॥ कृष्णासन्निध बैसले सर्व ॥ तयांसी आश्वासाया केशव ॥ गोष्टी सांगूं लागला ॥ ६ ॥ तेव्हां युधिष्ठिर कृष्णाप्रत ॥ स्वहितार्थ आणि परहितार्थ ॥ नारदा तूं प्रश्निलें सांप्रत ॥ ऐसेंचि प्रश्निता जाहला ॥ ७ ॥ तयावरी रुक्मिणीरमण ॥ रायासी उत्तर दे आपण ॥ तें कथानक पुण्यपावन ॥ पुढच्या प्रसंगीं वर्णिजेल ॥१०८॥ इति श्रीअधिकमासमाहात्म्यसार ॥ बृहन्नारदीयपाद्माधार ॥ सज्जन श्रोते ऐकोत चतुर ॥ प्रथमाध्याय मधुर हा ॥ १ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

॥ श्रीगणेशाय नमः ॥ पूर्वाध्यायींचें कथानुसंधान ॥ धर्में कृष्णासी केला प्रश्न ॥ आतां त्यावरी रुक्मिणी रमण ॥ उत्तर दे तें ऐकिजे ॥ १ ॥ कृष्ण म्हणे गा युधिष्ठिरा ॥ तूं मज प्रश्न केलासी खरा ॥ परी याचें उत्तर द्याया जरा ॥ क्लेश अंतरा वाटती ॥ २ ॥ येथींचा विषय अति गुप्त ॥ ऋषींसिही कदा नव्हे प्राप्त ॥ दारा पुत्र बंधु कीं आप्त ॥ यांसीहि अप्राप्त निश्चयें ॥ ३ ॥ तथापि तूं मद्भक्त परम ॥ म्हणोन मज वाटती श्रम ॥ यास्तव आतां यथानुक्रम ॥ सांगतों ऐकें साचार ॥ ४ ॥ चैत्रादिक जे सर्व मास ॥ कलां[1] काष्ठां[2] लव घटी पक्ष ॥ मुहूर्त याम रात्रि प्रदोष ॥ ऋतु अयनें संवत्सरें ॥ ५ ॥ आणि युगादि परार्धांत वरी ॥ जे अन्यहि कालभाग निर्धारीं ॥ वापी कूप पल्वलं[3] झरी ॥ ह्रदं[4] सरिता समुद्र ॥ ६ ॥ लता औषधि वनस्पति द्रुम ॥ त्वक्सारपादप आराम[5] ॥ वनें उपवनें पुरें ग्राम ॥ आणि पर्वत इत्यादिक जे ॥ ७ ॥ ते सकळहि मूर्तिमंत ॥ स्वस्वगुणीं पूजिले जात ॥ त्या सर्वांचेहि स्वामी असत ॥ म्हणोनि सतत पूजिजेती ॥ ८ ॥ त्यांत स्वामीवर्जित आणि ॥ अपूज्य ऐसा नाहींच कोणी ॥ उत्तम फळ देती म्हणोनी ॥ स्वस्वाधिकारीं पूजिजेत ॥ ९ ॥ स्वस्वामीचा आश्रय त्यांस ॥ तेणें पावोनी सौभाग्यास ॥ जगामाजी शोभत अशेष ॥ तों एक विशेष वर्तलें ॥ १० ॥ कदाचित् अधिक महिना ॥ उत्पन्न झाला पांडुनंदना ॥ तया पाहूनी लोक नाना ॥ दूषणें ठेवूं लागले ॥ ११ ॥ म्हणती अहो हा मलमास ॥ कोणीहि सहाय नाहीं यास ॥ निंद्य अनर्ह[6] नीच निःशेष ॥ रविसंक्रांतिहीन असे ॥ १२ ॥ हा निखिल जगाचा मळ ॥ म्हणोनी अस्पृश्य जाणा केवळ ॥ यासी शुभकार्यार्थ सकळ ॥ अशुभ म्हणोनी वर्जिती ॥ १३ ॥ ऐसी सर्वीं केली भर्त्सना ॥ ती ऐकतां तो अधिक महिना ॥ परमदुःखें विलपत नाना ॥ चिंताग्रस्त जाहला ॥ १४ ॥ आणि म्हणे हाय हाय ॥ कटकटा हें केलें काय ॥ आतां धरूं कोणाचे पाय ॥ कांहीं उपाय सुचेना ॥ १५ ॥ ऐसें बोलत मूर्छित पडला ॥ पुनश्च धैर्य धरोन उठला ॥ तों अंतरीं उपाय सुचला ॥ शरण जावें हरीस ॥ १६ ॥ मग राया तो अधिकमास ॥ वेगें पावला वैकुंठास ॥ जेथें मी प्रत्यक्ष जगदीश ॥ वसत असें सर्वदा ॥ १७ ॥

१ एक पळाचा तिसरा भाग. २ अठरा निमिष म्ह० एक काष्ठा. ३ सांचलेल्या पाण्याचीं डबकीं. ४ डोह. ५ बगीचा. ६ अयोग्य.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

मग अंतर्गृहीं प्रवेशुनी ॥ हरीसी पाहे न्याहाळुनी ॥ तों रत्नखचित सिंहासनीं ॥ बैसला असे आनंदें ॥ १८ ॥
ऐसा तया पाहूनि सत्वर ॥ दंडवत घातला नमस्कार ॥ सर्वेचि जोडूनि दोन्ही कर ॥ सादर उभा राहिला ॥ १९ ॥
आणि दुःखें आसवें गाळित ॥ गहिवरोनी बोले कांपत ॥ म्हणे देवा तूं जगन्नाथ ॥ कैसा स्वस्थ बैसलासी ॥ २० ॥
मी पामर अनाथ कृपण ॥ माझें कां न करिसी रक्षण ॥ तूं असूनि करुणा[1]घन ॥ मज कीं ऐसा उपेक्षिसी ॥ २१ ॥
मी निराश्रित असें म्हणोनी ॥ सर्वजनीं मजलागुनी ॥ मलमास ऐसें नाम ठेवुनी ॥ एकीकडे झुगारिलें ॥ २२ ॥
माझी अत्यंत दुर्दशा झाली ॥ ही तूं पाहात असतां वहिली ॥ तव दयाळुता कोठें गेली ॥ आज कां केली कठोरता ॥ २३ ॥ गजेंद्रें भाकितां करुणा स्वरें ॥ तया धांवोनि रक्षिलें त्वरें ॥ तैसें आजि मज कां बरें ॥ न रक्षिसी दयाळा ॥ २४ ॥ आतां मी झालों निराश ॥ ऐसें बोलून तो मलमास ॥ दुःखासवें ढाळित विशेष ॥ पुढें तटस्थ राहिला ॥ २५ ॥ तेव्हां श्रीवैकुंठनाथ ॥ कृपें कळवळोन अत्यंत ॥ म्हणे वत्सा तूं सांप्रत ॥ शोक किमर्थ करितोसी ॥ २६ ॥ तुज अंतरीं काय दुःख ॥ तें मज सांगे सकळीक ॥ त्यांतून तुज काढितों देख ॥ आतां शोक करूं नको ॥ २७ ॥ एकदां मज शरण येई ॥ तया पुनश्च दुःख नाहीं ॥ ऐसें असतां तूं ये ठायीं ॥ येऊन किमर्थ रडतोसी ॥ २८ ॥ अरे हें माझें वैकुंठस्थान ॥ केवळ आनंदाचें सदन ॥ येथें नाहीं शोक जरा मरण ॥ ऐसें असतां साचार ॥ २९ ॥ येथें येऊन शोक करिसी ॥ म्हणोन आश्चर्य सकळांसी ॥ तरी आतां दुःख काय तुजसी ॥ तें तूं मजसी सांगपां ॥ ३० ॥ ऐसें हरीचें ऐकतां भाषित ॥ मलमास झाला अति हर्षित ॥ म्हणे देवा तुजला जगांत ॥ अज्ञात ऐसें काय असे ॥ ३१ ॥ तूं सर्वज्ञ ब्रह्मांडनायक ॥ सर्वदृक्[2] सर्वसाक्षी एक ॥ आकाशा-परी विश्व सकळिक ॥ व्यापून राहिला आहेसी ॥ ३२ ॥ हीं चराचर भूतें सर्वही ॥ व्यवस्थें राहती तुज कूटस्था-ठायीं ॥ तुज विरहित अन्य कांहीं ॥ जगामाजी नाहींच ॥ ३३ ॥ ऐसा तूं असतां भगवंता ॥ अजाण्यापरी पुससी सर्वथा ॥ तरी आतां माझी व्यथा ॥ सांगतों तत्वतां ऐकिजे ॥ ३४ ॥ निमेष काष्ठा कला क्षण ॥ घटि मुहूर्त[3]

१ दयेनें भरलेला, मेघासारखा. २ सर्वद्रष्टा, सर्व पहाणारा. ३ दोन घडींचें नांव.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

यामं दिन ॥ पक्ष मास ऋतु अयन ॥ आणि वर्ष इत्यादि जे ॥ ३५ ॥ यांस स्वामी असती म्हणोनी ॥ स्वस्वामींच्या अधिकारांनीं ॥ निर्भय ऐसे ह्या त्रिभुवनीं ॥ सदा आनंदें वर्ततात ॥ ३६ ॥ आणि मी तों निराश्रित पाहीं ॥ मज नाम आणि धनी नाहीं ॥ म्हणोन ते शुभ कार्याविषयीं ॥ माझा त्याग करितात ॥ ३७ ॥ जेंवी विधवा नारी अनाथ ॥ तियेसी न घेती शुभ कार्यांत ॥ अशुभ म्हणोनि व्यवहारांत ॥ मुख न पहात तियेचें ॥ ३८ ॥ तेवींच झाली माझी स्थिती ॥ हा मलमास निषिद्ध अती ॥ ऐसें सकळ जन बोलती ॥ दुःख किती काय सांगूं ॥ ३९ ॥ यास्तव आतां द्यावा प्राण ॥ हेंचि इच्छितें माझें मन ॥ निंद्यपणें वांचणें आपण ॥ याहूनि मरण श्रेष्ठ वाटे ॥ ४० ॥ सर्वांग जळत आहे ज्याचें ॥ तयासी निद्रासुख कैंचें ॥ याहूनि अन्य सांगावयाचें ॥ उरलें नाहीं कांहींच ॥ ४१ ॥ देवा तूं परदुःखासहिष्णु[२] ॥ लोकोपकारप्रिय विष्णु ॥ आहेसी दुष्टलोकजयिष्णु[३] ॥ वेदीं प्रसिद्ध असे ॥ ४२ ॥ तरी तूं त्या निजधर्मासी ॥ पाहूनि सम्यक्[४] विचारेंसी ॥ जैसें येईल तुझ्या मनासी ॥ तैसें करीं भगवंता ॥ ४३ ॥ वारंवार पामरजनानें[५] ॥ समर्थासी काय सांगणें ॥ तूं न रक्षिसी तरी मरणें ॥ हेंचि उचित मज आतां ॥ ४४ ॥ ऐसें बोलूनि मलमास ॥ तेथेंच पडला कासावीस ॥ तया पाहूनि सर्व लोकांस ॥ बहु आश्चर्य जाहलें ॥ ४५ ॥ तेव्हां हरीस आली दया ॥ सन्निध गरुड होता तया ॥ मलमासास उठवावया ॥ नेत्रसंकेतें सुचविलें ॥ ४६ ॥ तैं त्या गरुडें पंखेंकरून ॥ हलुहलु घातिला पवन[६] ॥ तेणें तो सावध होऊन ॥ बोलला वचन हरीसी ॥ ४७ ॥ देवा तूं करतोसी उपचार ॥ परी हे न रुचती साचार[७] ॥ तूं जगत्कर्ता जगदीश्वर ॥ म्हणोन शरण आलोंसे ॥ ४८ ॥ तरी टाकूनि अन्य काज ॥ त्राहि[८] त्राहि त्राहिच मज ॥ शरणागताची उपेक्षा तुज ॥ योग्य नव्हे समर्था ॥ ४९ ॥ तथापि देवा तूं सांप्रत ॥ माझी उपेक्षा करिसी किमर्थ ॥ ऐसें बोलूनि थरथर कांपत ॥ विलाप करित पडिन्नला ॥ ५० ॥ तैं त्या मलमासासी श्रीधर ॥ म्हणे वत्सा ऊठ ऊठ वर ॥

---

१ प्रहर. २ दुसऱ्याचें दुःख ज्यास सहन होत नाहीं असा. ३ दुष्ट लोकांस जिंकणारा. ४ उत्तम. ५ गरिबानें. ६ वायु. ७ खरोखर. ८ रक्षीं.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तुझें कल्याण होईल सत्वर ॥ विषाद करूं नकोची ॥ ५१ ॥ बा तुझें हें दुःख अनिवार्य ॥ असे यांत नाहीं संशय ॥ परी यावर एक उपाय ॥ सुचला असे अंतरीं ॥ ५२ ॥ तरी मजसंगें येईं त्वरित ॥ चल जाऊं गोलोकाप्रत ॥ तेथें जो कां गोलोकनाथ ॥ पुरुषोत्तम वसताहे ॥ ५३ ॥ तो साक्षात् द्विभुज मुरलीधर ॥ श्रीकृष्ण भगवान् परमेश्वर ॥ देवांचाही देव परिकर ॥ मजहूनही श्रेष्ठ असे ॥ ५४ ॥ तयाची सुंदर स्वरूपस्थिती ॥ येथें काय सांगूं तुजप्रती ॥ तुवां प्रत्यक्ष देखिल्यावरुती ॥ समाधान होईल ॥ ५५ ॥ तो सर्वबीज सर्वाधार ॥ निरीहैं निर्गुण निर्विकार ॥ स्वेच्छामय सत्य अक्षर ॥ परात्पर परमात्मा ॥ ५६ ॥ सकळश्रुति निगमागम ॥ जयास म्हणती परब्रह्म ॥ तोच तो प्रभू परिपूर्णतम ॥ पुरुषोत्तम आहे पैं ॥ ५७ ॥ यास्तव तेथें जाऊं आपण ॥ पुरुषोत्तमाचे धरूं चरण ॥ तो तुझें हें दुःख संपूर्ण ॥ हरील जाण निश्चयें ॥ ५८ ॥ ऐसें बोलोनियां श्रीपती ॥ मलमासास धरूनि हातीं ॥ वैकुंठाहून गोलोकाप्रती ॥ सत्वर जाता जाहला ॥ ५९ ॥ श्रीकृष्ण म्हणे युधिष्ठिरासी ॥ गोलोक तो काय म्हणसी ॥ तरी तयाची स्थिती तुजसी ॥ सांगतों ऐकें समग्र ॥ ६० ॥ पूर्वी प्रळयीं अति निर्मळ ॥ कोटिसूर्याहूनि तेजाळ ॥ ज्योतिस्वरूपमात्र केवळ ॥ असतें झालें एकचि ॥ ६१ ॥ तें सकळ विश्वासी कारण ॥ स्वेच्छामय विभूचें तेज जाण ॥ अनंत विशाळ नित्य उल्बण ॥ ऐसें असे साचार ॥ ६२ ॥ तये तेजाभीतर देख ॥ सुंदर असती तीन लोक ॥ त्यांत जो सर्वोपरी एक ॥ तोच गोलोक जाणिजे ॥ ६३ ॥ तो परब्रह्माऐसा शाश्वत ॥ तीन कोटी योजनें विस्तृत ॥ मंडलाकृति परमाद्भुत ॥ तेजस्वरूप विशाळ ॥ ६४ ॥ रत्नभूमिमय विचित्र ॥ योगियांसहि अदृश्य पवित्र ॥ महावैष्णवजनांची मात्र ॥ गति होय तये लोकीं ॥ ६५ ॥ आणि ईश्वरें योगबळेंसी ॥ अंतरिक्ष धरिलें असे त्यासी ॥ आधि व्याधि जरा मृत्यु विवशी ॥ तेथें नसती कदाच ॥ ६६ ॥ नानाविध रत्नखचित ॥ असंख्य मंदिरें तेथें असत ॥ तयीं तो गोलोक अत्यंत ॥ सुशोभित दिसताहे ॥ ६७ ॥

१ गोलोकाचे स्वरूप पुढें सांगितलें आहे. २ सुंदर. ३ सर्वांचें उत्पत्तिस्थान. ४ निरिच्छ. ५ प्रखर. ६ सर्वांत वर. ७ निरंतर असणारा. ८ मनोव्यथा.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

आणि गोलोकाखालीं दूर ॥ पन्नास कोटि योजनांवर ॥ दक्षिण सव्य बाजूंसि सुंदर ॥ दोन लोक आहेत पैं ॥ ॥ ६८ ॥ त्यांत दक्षिण भागीं जो एक ॥ तोचि जाण वैकुंठलोक ॥ तयाचा विस्तार अति सुरेख ॥ एक कोटि योजनें ॥ ६९ ॥ आणि तये लोकीं जे वसती ॥ ते सर्वही वैष्णव असती ॥ विष्णुसमान तयांची स्थिती ॥ भिन्नाकृति नाहींच ॥ ७० ॥ चतुर्भुज घनसांवळे ॥ पीतांबरधारी तेजागळे ॥ शंख चक्र गदा कमळें ॥ हातीं असती सर्वांचे ॥ ७१ ॥ आणि तेथींच्या स्त्रिया सकळ ॥ लक्ष्मी ऐशा असती सोज्वळ ॥ ऐसा तो वैकुंठ निर्मळ ॥ असे जाण राजेंद्रा ॥ ७२ ॥ तयाचे डावीकडे दूर ॥ शिवलोक शोभतो सुंदर ॥ एक कोटी योजनवर ॥ असे विस्तार तयाचा ॥ ७३ ॥ तेथींची स्थिती पाहतां सतत ॥ पार्षदगणचि सर्व वसत ॥ सकळहि ते भाग्यवंत ॥ भिये कृतांत तयांसी ॥ ७४ ॥ जैसा साक्षात् उमारमण ॥ तैसेच दिसती संपूर्ण ॥ शूल पट्टिश देदीप्यमान ॥ हातीं तीक्ष्ण विराजती ॥ ७५ ॥ सर्वांगीं शुद्ध भस्माची उटी ॥ नागयज्ञोपवीत कंठीं ॥ अर्धचंद्रचकोर ललाटीं ॥ कांसे लंगोटी सर्वांचे ॥ ७६ ॥ आणि ते सर्वही गंगाधर ॥ त्रिनयनयुक्त मनोहर ॥ एवं तो शिवलोक सुंदर ॥ आणि पवित्र आहे पैं ॥ ७७ ॥ कृष्ण म्हणे राया ऐक ॥ जो तेजरूप कथिला गोलोक ॥ तयाचे अभ्यंतरीं एक ॥ ज्योति आहे सुंदर ॥ ७८ ॥ ती परमानंदासी कारण ॥ परात्पर नित्य निरंजन ॥ सकळ योगी तियेचें ध्यान ॥ ज्ञानदृष्टीं करितात ॥ ७९ ॥ तये ज्योतीचे मध्यवर्ती ॥ मनोहर आहे दिव्यमूर्ती ॥ तयेच्या सौंदर्या नाहीं मिती ॥ किशोरवय शोभत ॥ ८० ॥ इंदीवरदलसमान ॥ सर्वांग शोभे श्यामवर्ण ॥ नवपंकजा ऐसे अरुण ॥ नेत्रकोण विराजती ॥ ८१ ॥ कोटिशारदपूर्णेंदु ऐसें ॥ मुखकमल प्रसन्न दिसे ॥ धनुष्या ऐशा वक्र विशेषें ॥ भ्रुकुटी दोन्ही विराजती ॥ ८२ ॥ रत्नखचित किरीट शिरीं ॥ कर्णीं कुंडलें दिसती साजिरीं ॥ श्रीवत्सलांच्छन शोभे उरीं ॥ कटकें करीं चमकती ॥ ८३ ॥ कंठीं कौस्तुभ तेजागळा ॥ गळां विलसे वनमाळा ॥ सुंदर कस्तुरीचा टिळा ॥

१ एक कोटी योजनपर्यंत. २ यम, काल. ३ पार्वतीपती. ४ मध्यभागीं. ५ प्रमाण, इयत्ता. ६ बालवय. ७ निळ्या कमळाच्या पत्राप्रमाणें. ८ आरक्त. ९ शरत्कालींच्या कोट्यावधि पूर्णचंद्रांप्रमाणें.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

रुंद कपाळीं विराजे ॥ ८४ ॥ बावन्नकशी तप्त सुवर्ण ॥ तैसें कांसे पीतवसन[1] ॥ रत्नखचित देदीप्यमान ॥ मेखला[2]
शोभे तयावरी ॥ ८५ ॥ दिव्य पाचूंचे गाभे सतेज ॥ तैसे दिसती दोन्ही भुज ॥ रत्नजडित तेजःपुंज ॥ मुरली
हातीं धरिली असे ॥ ८६ ॥ सर्व लावण्याचें निधान ॥ किती तयांचें करूं वर्णन ॥ कोट्यानुकोटी मीनकेतन[3] ॥
कुर्वंडी करून टाकावे ॥ ८७ ॥ ऐशी ती दिव्य किशोरमूर्ती ॥ गोलोकींच्या तेजांत निरुती ॥ रत्नसिंहासनावरुती ॥
बैसली असे आनंदें ॥ ८८ ॥ तोचि परंज्योति परंधाम ॥ तोचि कृष्ण पुरुषोत्तम ॥ आणि तयासचि परिपूर्णतम ॥
परब्रह्म म्हणतात ॥ ८९ ॥ तो वस्तुतः निर्विकार ॥ निरीहँ[4] निरंजन सर्वाधार ॥ स्वेच्छामय सत्य परात्पर ॥ स्व-
तंत्र आद्य अव्यक्त ॥ ९० ॥ तो सर्व सिद्धिस्वरूप एक ॥ सर्व सिद्धेश सिद्धिदायक ॥ मंगळरूप मंगळकारक ॥
मायातीत परिपूर्ण ॥ ९१ ॥ तो आदिमध्यावसानहीन ॥ पुराणपुरुष विश्वकारण ॥ विश्वव्यापक विश्वपाळण ॥
विश्वहरण विश्वातीत ॥ ९२ ॥ अनंतकोटिब्रह्मांडनायक ॥ अनंतमायाचक्रचाळक ॥ अज्ञानगाढांधकारांतक[5] ॥
मोक्षस्वरूप सनातन ॥ ९३ ॥ क्षराक्षर पर अव्ययाच्युत ॥ षड्गुणैश्वर्यसदालंकृत ॥ षड्दर्शन प्रतिपादित ॥
षडूर्मिवर्जित सर्वमय ॥९४॥ वेदरूप वेदजनक ॥ वेदप्रिय वेदोद्धारक ॥ वेदस्तव्य वेदस्थापक ॥ वेदरक्षक शरण्य[6] ॥
॥ ९५ ॥ वेदमार्गप्रवर्तक आद्य ॥ वेदवेदांगँप्रतिपाद्य ॥ वेदशिरोभागसंवेद्य[7] ॥ शुद्ध शांत परमात्मा ॥ ९६ ॥
आणि तो निर्गुण निर्विकार ॥ तयासी कांहींच ना आकार ॥ सच्चिदानंदात्मक साचार ॥ ऐसाचि असे केवळ ॥
॥ ९७ ॥ परी कराया लोककल्याण ॥ पूर्वप्रकारें साकार सगुण ॥ पुरुषोत्तमरूप आपण ॥ स्वेच्छें धरून राहिला
असे ॥ ९८ ॥ श्रीकृष्ण म्हणे धर्मालागुन ॥ पूर्वानुसंधाना देईं मन ॥ श्रीविष्णु मलमासासी घेऊन ॥ गोलोका
जाता जाहला ॥ ९९ ॥ पुढें जातां जातां दूरवर ॥ मध्यप्रदेशीं पोंचला सत्वर ॥ तों दुरूनचि भगवन्मंदिर ॥ अति
सुंदर देखिलें ॥ १०० ॥ तें मणिस्तंभीं सुशोभित उत्तम ॥ तयामाजी श्रीपुरुषोत्तम ॥ बैसला असोनि तयाचें

१ पीतांबर. २ दाब, कमरपट्टा. ३ मदन. ४ निरिच्छ. ५ अज्ञानरूप निबिड अंधकाराचा नाश करणारा. ६ रक्षण करण्याविषयीं समर्थ. ७ उपनिषद्भागांनीं ज्याचें स्वरूप जाणलें जातें.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

अनुपम ॥ तेज सर्वत्र फांकलेंसे ॥ १ ॥ तेणें तेजें श्रीविष्णूचे डोळे ॥ दिपवोन तत्काळ मिटले ॥ मागुती हळूच उघडूनि बळें ॥ पुढें गमन आरंभिलें ॥ २ ॥ पाठीं घालून मलमासास ॥ तयासह तो वैकुंठेश ॥ मंद मंद चालतां सहर्ष ॥ महाद्वारास पातला ॥ ३ ॥ तों द्वारपाळीं उठोनि तत्क्षण ॥ प्रेमें वंदिले तयाचे चरण ॥ मग त्या मासासहवर्तमान ॥ मंदिरांत विष्णु प्रवेशला ॥ ४ ॥ तों पुरुषोत्तम परंज्योति ॥ श्यामसुंदर किशोरमूर्ती ॥ रत्नसिंहासनावरुती ॥ बैसला असे आनंदें ॥ ५ ॥ तया पाहतांचि रमारमण ॥ आनंदें वंदूनि तच्चरण ॥ सर्वेचि हस्तद्वय जोडून ॥ स्तुति करिता जाहला ॥ ६ ॥ तों उठूनि पार्षदगणीं ॥ श्रीविष्णुसी सत्कारुनी ॥ रत्नसिंहासन आणुनी ॥ बैसावया दीधलें ॥ ७ ॥ मग पुरुषोत्तमें तयासी ॥ कथिलें आसनीं बैसावयासी ॥ तैं तो विष्णु बहु विनयेंसी ॥ वरी बैसता जाहला ॥ ८ ॥ आणि तयापाठीं मलमास ॥ नेत्रीं अश्रु ढाळीत विशेष ॥ थरथर कांपत करद्वयास ॥ जोडूनि उभा राहिला ॥ ९ ॥ ऐसें श्रीकृष्णें धर्मालागुनी ॥ कथियेलें काम्यकवनीं ॥ एवं साक्षात् नारायणमुनी ॥ नारदासी कथिता जाहला ॥ ११० ॥ इति श्रीअधिकमासमाहात्म्यसार ॥ बृहन्नारदीयपाद्माधार ॥ सज्जन श्रोते ऐकोत चतुर ॥ द्वितीयाध्याय मधुर हा ॥ १११ ॥ इति द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥ ॥ छ ॥

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

॥ श्रीगणशाय नमः ॥ ॥ पूर्वाध्यायीं वृत्तांत विशेष ॥ मलमासासहित रमेश[1] ॥ गोलोकीं जाऊनि पुरुषोत्तमास ॥ वंदूनि तेथें बैसला ॥ १ ॥ श्रीकृष्ण म्हणे युधिष्ठिरासी ॥ राया ऐकें पुढील कथेसी ॥ मग तो पुरुषोत्तम[2] मलमासासी ॥ पाहूनि विष्णूसी प्रश्नित ॥ २ ॥ म्हणे विष्णो हा आणिला कोण ॥ काय ह्याचें नामाभिधान ॥ हा रडतो काय म्हणोन ॥ कोणतें दुःख ययासी ॥ ३ ॥ अरे ह्या माझ्या गोलोकांत ॥ कवणाहि दुःख नव्हे प्राप्त ॥ येथें वसती ते सतत ॥ परमानंदीं निमग्न ॥ ४ ॥ स्वप्नामाजींहि ह्या ठायीं ॥ दुर्वार्ता ऐकूं येत नाहीं ॥ मग प्रत्यक्ष दुःखी तो पाहीं ॥ कोठूनियां असणार ॥ ५ ॥ ऐसें असतां हा सांप्रत ॥ माझे पुढें थरथर कांपत ॥ नेत्रीं दुःखाश्रु गाळित ॥ कां कीं उभा राहिला ॥ ६ ॥ तें ऐकून रमारमण[2] ॥ पुरुषोत्तमासी[3] बोले वचन ॥ म्हणे देवा हा अधिमास[4] दीन ॥ दुःखी निमग्न झाला असे ॥ ७ ॥ यास्तव हा आणिला येथें ॥ तरी निरसीं सर्व दुःखातें ॥ याचें मुख्य दुःख काय तें ॥ सांगतों ऐकें समग्र ॥ ८ ॥ कला[5] काष्ठा[6] घडी दिन पक्ष ॥ मास ऋतु अयन वर्ष ॥ औषधी द्रुम ग्राम अशेष ॥ गिरी कूप नदी इत्यादि जे ॥ ९ ॥ त्या सर्वांचेही स्वामी असत ॥ म्हणोन जगीं ते पूजिले जात ॥ तेणें गर्वें ते सतत ॥ यासी निंदित ऐसें कीं ॥ १० ॥ हा अधिमास अति हीन ॥ सकळ विश्वामाजीं मळिण ॥ यांत नाहीं रविसंक्रमण[7] ॥ म्हणोनी निंद्य सर्वांसी ॥ ११ ॥ यासी कोणीही स्वामी नाहीं ॥ हा अयोग्य शुभकर्माविषयीं ॥ स्नान दान जप यात्रादिक हीं ॥ ह्यांत कांहीं करूं नये ॥ १२ ॥ विगतधवा[8] नारी अनाथ ॥ तियेसी न घेत शुभकार्यांत ॥ अशुभ म्हणोन व्यवहारांत ॥ मुख न पाहती तियेचें ॥ १३ ॥ तैंवीच आहे ह्याची स्थिति ॥ हा मळमास निषिद्ध अती ॥ ऐसें सर्व गर्वें बोलती ॥ आणि भर्त्सिती सर्वकाळ ॥ १४ ॥ तये दुःखाग्नीनें त्रासला ॥ म्हणोन मराया उद्युक्त झाला ॥ तो अन्य जनीं कथिलें याला ॥ शरण जावें विष्णूसी ॥ १५ ॥ तेव्हां हा वैकुंठीं धांवत ॥ शरण आला मजप्रत ॥ वारंवार कांपत रडत ॥

---



१ विष्णु. २ भगवान्. ३ भगवंताप्रत. ४ अधिक महिना. ५ आठ सेकंद म्हणजे एक कला. ६ अठरा निमिष म्हणजे एक काष्ठा. ७ सूर्यसंक्रांत. ८ विधवा.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

दुःख समस्त सांगितलें ॥ १६ ॥ तेणें दया आली झणीं ॥ परी हें दुःख तुजवांचूनी ॥ कदा न निवटे कोणाचेनीं ॥ हें मी मनीं जाणताहें ॥ १७ ॥ आणि मी तुझा आश्रित म्हणोन ॥ निराश्रितासी हातीं धरून ॥ तव चरणीं आणिला शरण ॥ करीं रक्षण दयाळा ॥ १८ ॥ तूं पर[1]दुःखासहनशील ॥ अनाथनाथ दीनदयाळ ॥ ऐसें बोलती वेद सकळ ॥ तेंचि सफल करीं आतां ॥ १९ ॥ तव चरणीं शरण येई ॥ तयासी दुःख कदा न होई ॥ ऐसें विद्वान बोलती तेंही ॥ मिथ्या कांहीं करूं नको ॥ २० ॥ आणि मजसाठींही भगवंता ॥ याचें दुःख निरसीं आतां ॥ अन्य काज टाकूनि सर्वथा ॥ यासी घेऊनि आलों असे ॥ २१ ॥ माझें येणें सफळ कर ॥ ह्या दीनासी रक्षीं सत्वर ॥ समर्थाप्रत वारंवार ॥ प्रार्थना फार करूं नये ॥ २२ ॥ ऐसें बोलती प्राज्ञ[2] समस्त ॥ यास्तव आतां राहतों स्वस्थ ॥ ऐसें प्रार्थूनि रमाकांत ॥ जोडूनि हस्त ठाकला ॥ २३ ॥ तैं तो भगवान परिपूर्णतम[3] ॥ किशोर[4]मूर्ति पुरुषोत्तम ॥ विष्णूस म्हणे गा त्वां उत्तम ॥ आजि कर्म केलेंस ॥ २४ ॥ मलमासासी हातीं धरुनी ॥ जो तूं आलासि ह्या स्थानीं ॥ येणें तुझी सर्व त्रिभुवनीं ॥ उत्तम कीर्ति होईल ॥२५॥ अरे तूं माझा प्राणचि भला ॥ तुवां जयाचा स्वीकार केला ॥ तो म्यांचि स्वयें स्वीकारिला ॥ ह्यांत संशय नाहींच ॥ २६ ॥ तरी आतां ह्या मलमासास ॥ सर्वोपरि[5] करितों विशेष ॥ जैसा मी साक्षात्परात्परेश ॥ तैसाचि करितों पाहें पां ॥२७॥ कीर्ति दया शांति औदार्य ॥ पराक्रम बुद्धि तुष्टि धैर्य ॥ ज्ञान वैराग्य कांति ऐश्वर्य ॥ इत्यादि नाना मद्गुण[6] जे ॥ २८ ॥ तयीं मी जैसा पुरुषोत्तम ॥ लोकप्रख्यात आहें उत्तम ॥ तैसाचि हाही प्रसिद्ध परम ॥ मासोत्तम होईल ॥ २९ ॥ मजमाजी जे गुण वसत ॥ ते सर्व यास दिले असत ॥ आणि पुरुषोत्तम ऐसें वेदांत ॥ मन्नाम विख्यात आहे जें ॥ ३० ॥ तेंही तव संतोषाकरितां ॥ यासी म्यां अर्पिलें रमाकांता ॥ आणि मीच ह्या मासाचा आतां ॥ स्वामी सर्वथा झालों असें ॥ ३१ ॥ ह्याच्या नामें विश्व संपूर्ण ॥ पवित्र होईल पैं जाण ॥ हा मम सादृश्य पावून ॥ मासाधिप होईल ॥ ३२ ॥ आणि हा सर्व विश्वालागुनी ॥ सुपूज्य वंद्य ऐसा होउनी ॥ सर्व पूजकजनांचें तत्क्षणीं ॥

१ दुसऱ्याचें दुःख सहन न करणारा. २ सुज्ञ. ३ पूर्णब्रह्म. ४ बालमूर्ति. ५ सर्वांत श्रेष्ठ. ६ माझे गुण.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

दुःख दारिद्र्य हरील ॥ ३३ ॥ चैत्रादिक मास ते समस्त ॥ केवळ सकामैचि आहेत ॥ तयांच्या व्रतें मोक्ष प्राप्त ॥ कदापि नव्हे कोणासी ॥ ३४ ॥ परी ह्या मलमासासी आतां ॥ निष्कामचि करूनि तत्वतां ॥ सर्व लोकांसी मोक्ष-दाता ॥ मत्तुल्य म्यां केला असे ॥ ३५ ॥ सकाम किंवा निष्काम ऐसा ॥ जो पूजील ह्या अधिमासा ॥ तो कर्माकर्मांचें सहसा ॥ जाळूनि भस्म करील ॥ ३६ ॥ मृत्युलोकामाजीं सतत ॥ सौभाग्य भोगूनि यथेच्छित ॥ अंतीं गोलोकीं मजप्रत ॥ येईल जाण निश्चयें ॥३७॥ जयासाठीं महापुरुष ॥ निरंतर करिती सायास ॥ ब्रह्मचर्यव्रत संन्यास ॥ बळें विशेष आचरती ॥ ३८ ॥ एक करिती पंचाग्निसाधन ॥ कित्येक राहती निरशन ॥ एकासी फल-पत्र भक्षण ॥ एक वायूच भक्षिती ॥ ३९ ॥ एक करिती धूम्रपान ॥ एक जिंकिती इंद्रियगण ॥ एक वर्जिती क्रोधा-लागुन॥एक साहती शीं[2]तातपा॥४०॥एक सोशिती वर्षापदां[3]॥ऐसे उपाय करिती सदा ॥ तरी ते माझ्या परमपदा ॥ कदापि नाहीं पावत ॥४१॥ सर्व साधनांहूनि अधिक ॥ श्रेष्ठ असे हा मास एक ॥ सर्वकामार्थसिद्धिदायक॥ यापरी दुजें नसे कांहीं॥४२॥तरी सकळीं अनन्यभावें ॥ ह्या पुरुषोत्तमासी भजावें ॥ स्नानदान जपादि [4]आघवें ॥ सत्कर्म करावें ह्यामाजीं ॥ ४३ ॥ सुभूमीसि पेरितां धान्य ॥ जैसें कोटिशः वाढे जाण ॥ तैसें ह्या मासींचें पुण्य ॥ कोटि-गुणें होईल ॥ ४४ ॥ चातुर्मास्यादि यज्ञकर्मांनीं ॥ कित्येक जाती स्वर्गभुवनीं ॥ परी तेथील भोग भोगुनी ॥ पुनः भूतळीं येतात ॥ ४५ ॥ म्हणजे यज्ञादिकांचें पुण्य ॥ नाशवंत आहे म्हणून ॥ स्वर्गभोग संपतां तत्क्षण ॥ पुनश्च भूतळीं येती ते ॥ ४६ ॥ तैसा प्रकार नाहीं येथें ॥ हें अविनांशी असे निरुतें ॥ यथाविधी पुरुषोत्तमातें ॥ परमादरें सेवील जो ॥४७॥ तो स्वकुळासह उद्धरून ॥ मजप्रतीच येईल जाण ॥ नाना भोग भोगीत पूर्ण ॥ अखंड येथेंचि राहील ॥ ४८ ॥ जो कां येथें एकदां आला ॥ तो पुन्हां न जाय मृत्युलोकाला ॥ आधिव्याध्यादि दुःखें तयाला ॥ कदापि नाहीं स्पर्शत ॥ ४९ ॥ जेथें जाऊनि मागें न फिरत ॥ तेंचि भगवद्धांम निश्चित ॥ ऐसें बोलती वेद

१ कामना पूर्ण करणारे. ( स्वफलदाते ). २ थंडी व ऊन यांस. ३ पावसांत भिजणें हें दुःख. ४ सर्व. ५ नाशरहित. ६ खरोखर. ७ भगवंताचें स्थान.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

सतत ॥ कैसें असंत होईल तें ॥ ५० ॥ असो आतां ह्या अधिमासाचा ॥ मीच अधिपति झालों साचा ॥ आणि चैत्रादि सर्व मासांचा ॥ राजा यास केला असे ॥ ५१ ॥ माझें नाम पुरुषोत्तम ॥ तेंहि ह्यास दीधलें उत्तम ॥ ऐसा माझ्यापरीच अनुपम ॥ केला असे साचार ॥ ५२ ॥ तस्मात् ह्याचे भक्तांविषयीं ॥ मीच चिंता वाहतों सदाही ॥ तयांच्या सर्व कामनाही ॥ मीच पुरविल्या पाहिजेत ॥ ५३ ॥ मद्भक्ताचा अपराध केला ॥ तरी कदाचित साहीन वहिला ॥ परी ह्याचे भक्तांचा मजला ॥ कदापि न साहवेल ॥ ५४ ॥ माझे पूजनाहून निरुतें ॥ भक्तपूजन मज आवडतें ॥ पुत्रापेक्षें पौत्रावरुतें ॥ प्रेम असतें अत्यंत ॥ ५५ ॥ मद्भक्तकामना कराया पूर्ण ॥ कदाचित् वेळ लावीन ॥ परी पुरुषोत्तमभक्तांचे तत्क्षण ॥ मनोरथ पूर्ण करीन मी ॥ ५६ ॥ जे महामूर्ख मानव देहीं ॥ पुरुषोत्तममासाठायीं ॥ स्नान दान जपादि कांहीं ॥ सत्कर्मे नाहीं करणार ॥ ५७ ॥ ते महादुष्ट दुर्भागी आणि ॥ परभाग्योपजीवी होउनी ॥ आधिव्याध्यादि दुःखालागुनी ॥ रात्रंदिनीं भोगितील ॥ ५८ ॥ स्वप्नामाजीहि तयांस ॥ कदा न मिळेल सुखलेश ॥ शशशृंगापरी विशेष ॥ अलभ्य होईल सर्वदा ॥ ५९ ॥ हा अधिमास मम प्रियकर ॥ ह्याचा करितील तिरस्कार ॥ तयांसी नाना यातना घोर ॥ होतील जाण निर्धारें ॥ ॥ ६० ॥ जे कां प्रति तृतीयवर्षी ॥ पात्रोनियां अधिमासासी ॥ नाचरतील धर्मकर्मासी ॥ किंवा मनासी नाणितील ॥ ६१ ॥ ते देहांतवेरि प्रपंचांत ॥ महादुःखें भोगितील सतत ॥ आणि शेवटीं कुंभीपाकांत ॥ पडोनियां पचतील पैं ॥ ६२ ॥ हा माझा पुरुषोत्तममास ॥ पुण्यतम श्रीमान् विशेष ॥ जयांचे अज्ञानें शून्य अशेष ॥ जाय तयांस सुख कैंचें ॥ ६३ ॥ पुरुषोत्तममासीं ज्या योषितां ॥ सौभाग्यादि सुखांकरितां ॥ स्नान दानादि कर्मे तत्वतां ॥ भक्तिभावें करितील ॥ ६४ ॥ तयां सौभाग्य पुत्रसंतान ॥ इत्यादि सर्व मी देईन ॥ आणि ज्या कोणी सत्कर्मेंविण ॥ मन्मास शून्य दवडतील ॥ ६५ ॥ तयांसी मी मासाधिनाथ ॥ प्रतिकूल होईन खचित ॥ पति

१ खोटें. २ नातवावर. ३ दुसऱ्याच्या भाग्यानें वांचणारे. ४ सशाच्या शिंगाप्रमाणें. ५ मरत तोंपर्यंत. ६ कुंभीपाक नांवाचे नरकांत. ७ स्त्रिया.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

पुत्र पौत्र बंधु वित्त ॥ इत्यादि समस्त निर्दाळीन ॥६६॥ तस्मात् ह्या अधिमासाठायीं ॥ सर्वात्मभावें सर्वांही ॥ स्नान पूजा जपादि कांहीं ॥ सत्कर्में सदाही करावींत ॥ ६७ ॥ आणि यत्किंचित् शक्त्यनुसार ॥ अवश्य दान द्यावें साचार ॥ तेणें मी साक्षात् परमेश्वर ॥ तयां प्रसन्न होईन ॥ ६८ ॥ जो कां मज पुरुषोत्तमासीं ॥ भावें पूजील अधिकमासीं ॥ तो भोगूनियां सर्व सुखांसी ॥ गोलोकवासी होईल ॥६९॥ आतां विष्णो आजपासून ॥ माझिये आज्ञें सकळ जन ॥ ह्या मम प्रिय मासाचें पूजन ॥ करितील जाण निश्चयें ॥ ७० ॥ हा सकळ मासांत आतां ॥ परम श्रेष्ठ केला तत्वता ॥ तरी ह्याविषयीं रमाकांता ॥ कांहीं चिंता करूं नको ॥ ७१ ॥ आतां तूं ह्यासी घेउनी ॥ सुखें जाईं वैकुंठभुवनीं ॥ ऐशी ऐकूनि भगवद्वाणी ॥ चक्रपाणि आनंदला ॥ ७२ ॥ आणि तयासी केला नमस्कार ॥ मग बैसोनि गरुडावर ॥ मलमासासह सत्वर ॥ स्वस्थाना चालता जाहला ॥ ७३ ॥ क्षणामाजी रमारमण ॥ वैकुंठीं पोंचला येऊन ॥ मलमासासी रहाया स्थान ॥ स्वसन्निध दीधलें ॥ ७४ ॥ तैं तो वैकुंठींची वसती ॥ पावोनियां हर्षला अती ॥ मग सर्व मासांचा निरुती ॥ मुख्याधिपती होउनियां ॥ ७५ ॥ विष्णुसह वैकुंठभुवनीं ॥ रमूं लागला रात्रंदिनीं ॥ पूर्वील दुःख मुळींहुनी ॥ देशधडी जाहलें ॥ ७६ ॥ जसो ऐसा तो मलमास ॥ पावला पुरुषोत्तमनामास ॥ सर्व मासांमाजी विशेष ॥ परमश्रेष्ठ जाहला ॥ ७७ ॥ भगवंताचे कृपेंकरून ॥ सर्व पुण्याचें झाला निधान ॥ त्रैलोक्यामाजीं सामर्थ्यवान ॥ तैसा अन्य नसे कोणी ॥ ७८ ॥ तयामाजीं सत्कर्में करिती ॥ तयांचीं सर्व दुःखें हरती ॥ आधि व्याधि जरा अपकीर्ती ॥ तयां न शिवती कधींच ॥७९॥ जे महामूढ जन कोणी ॥ नादरिती त्या मासालागुनी ॥ पुरुषोत्तमासी उद्देशुनी ॥ कर्म न करिती कांहींच ॥ ८० ॥ तयांवरी दुःखांचे पर्वत ॥ एकामागूनि एक पडत ॥ साक्षाद्भगवंताचें भाषित ॥ कैसें असत्य होईल ॥८१॥ श्रीकृष्ण म्हणे गा राजा ऐक ॥ तुम्हांसी येताति दुःखें अनेक ॥ ह्याचें कारण आहे एक ॥ तें मी सकळिक जाणतों ॥ ८२ ॥ तुम्हीं वनीं आल्यापासुनी ॥ पुरुषोत्तममासालागुनी ॥ स्नान दान पूजादि करूनी ॥

१ हा माझा महिना. २ ठेवा, स्थान.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

कधींच नाहीं सत्कारिलें ॥८३॥ तुम्हीं वना आल्यानंतर ॥ श्रीभगवंताचा प्रियकर ॥ तो पुरुषोत्तममास सुंदर ॥ द्वित्रिवार गेला येऊनीयां ॥ ८४ ॥ भीष्मद्रोणादिकांचें भय ॥ तेणें विकळ तुमचें हृदय ॥ आणि तयालागीं धनंजय ॥ इंद्रकीलासी गेला जो ॥ ८५ ॥ त्याचे वियोगें तुमचें मानस ॥ भांबावोनि गेलें विशेष ॥ तेणें योगें तो पुरुषोत्तमास ॥ नाहीं तुम्हांस समजला ॥ ८६ ॥ तयासी तुम्हीं काय करावें ॥ प्रारब्ध म्हणोनि स्वस्थ रहावें ॥ दैव असेल तैसें आघवें ॥ घडोन येतें सहजचि ॥ ८७ ॥ अदृष्टींचें फळ संपूर्ण ॥ अवश्य भोगावें लागे जाण ॥ सुख दुःख भय कल्याण ॥ दैवेंचि प्राप्त होतसे ॥८८॥ तरी तुम्हीं अदृष्टां भरंवसा ॥ ठेवूनि सदां स्वस्थ बैसा ॥ आणि दुजा प्रकार झाला कैसा ॥ तोहि सांगतों ऐकिजे ॥८९॥ ऐसें कृष्णें धर्मरायासी ॥ कथिलें असे प्रेमभरेंसी ॥ तेंचि नारायण नारदासी ॥ स्वयें कथिता जाहला ॥ ९० ॥ इतिश्री अधिकमासमाहात्म्यसार बृहन्नारदीय पद्माधार ॥ सज्जन श्रोते ऐकोत चतुर ॥ तृतीयोध्याय गोड हा ॥ ९१ ॥ इति तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥ ॥



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

॥ श्रीगणेशाय नमः ॥ ॥ पूर्वाध्यायामाजी उत्तम ॥ मलमासासी पुरुषोत्तम नाम ॥ कैसें लाभलें तें अनुपम ॥ कथानक कथियेलें ॥ १ ॥ आतां पुढें कथा सुरस ॥ श्रोतीं श्रवणा द्यावें मानस ॥ श्रीकृष्ण म्हणे धर्मरायास ॥ पूर्वेतिहास सांगतों ॥ २ ॥ अरे ही पांचाली पत्नी तुमची ॥ पूर्वजन्मामाजीं साची ॥ मेधावीनामक ब्राह्मणाची ॥ सुंदर कन्या जाहली ॥ ३ ॥ ती चंद्रकलेऐसी वाढतां ॥ दहा वर्षांची झाली तत्वतां ॥ सिंहकटी परमशोभिता ॥ शशिवंदना हरिणाक्षी ॥ ४ ॥ लावण्याची केवळ खाणी ॥ वाटे रंभाच आली मेदिनी ॥ पित्यासी ती एकलीच म्हणोनी ॥ अत्यंतचि प्रिय असे ॥ ५ ॥ पूर्वीं तियेच्या बाळपणांत ॥ माता पावली स्वर्गाप्रत ॥ तैंपासूनि पित्यानें सतत ॥ पोषण केलें तियेचें ॥ ६ ॥ तेणें योगें तियेवांचून ॥ मेधावीस न पडे चैन ॥ पुत्राप्रमाणें रात्रंदिन ॥ प्रेमें लालन करीतसे ॥ ७ ॥ ती साहित्यशास्त्रीं झाली कुशळ ॥ नीतिशास्त्र जाणे सकळ ॥ चातुर्यादि गुण विपुल ॥ तिजमाजीं वसिन्नले ॥ ८ ॥ असो ऐसी ती विप्रकन्या ॥ झाली सकळसद्गुणमान्या ॥ तियेच्या परम सख्या अन्या ॥ राहत होत्या शेजारीं ॥ ९ ॥ त्या पतिपुत्रादिकांसहित ॥ सुख भोगीत अहोरात ॥ तें पाहून तियेचे मनांत ॥ इच्छा तदर्थ उद्भवली ॥ १० ॥ मग अंतरीं तर्क करी ॥ मी कैं होईन यांचे पेरी ॥ गुणसभाग्यनिधि सत्वरीं ॥ पति कैसा मिळेल ॥ ११ ॥ परम सुखद ऐसे सुत ॥ मज कैसे होतील प्राप्त ॥ मी दुर्भागिणी असें खचित ॥ इच्छा व्यर्थ सकळ ही ॥ १२ ॥ अहा मी आतां करूं काय ॥ कोणा देवाचे धरूं पाय ॥ कीं कोण सेवूं ऋषिवर्य ॥ कीं कोणे तीर्था आश्रयूं ॥ १३ ॥ मज नाहीं कांहीं सुचत ॥ माझें भाग्य निजलें खचित ॥ पिता तोहि असोनि पंडित ॥ मूर्ख झाला मद्भाग्यें ॥ १४ ॥ विवाहकाळ गेला होऊन ॥ तरी माझें न केलें लग्न ॥ सखियांत मी मुख्य असोन ॥ कुमारिदुःख भोगिताहे ॥ १५ ॥ ह्या माझ्या सख्या समस्त ॥ सुख भोगिती दिवसरात ॥ मज तों पतीचेंहि यथार्थ ॥ सुख कांहीं मिळेना ॥ १६ ॥ अहा मन्माता भाग्यवती ॥ पूर्वींच गेली स्वर्गाप्रती ॥ दुःख भोगावया निरुती ॥ मज कैसें ठेविलें ॥ १७ ॥ ऐशी ती विप्रकन्या सतत ॥ चिंतानळें तळमळत ॥ व्यर्थ झाले मनोरथ ॥

१ द्रौपदी. २ खरोखर. ३ चंद्रवदना. ४ अलंकारशास्त्रांत. ५ पतिपुत्रादिकांविषयीं. ६ सारखी.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

शोकार्णव उचंबळला ॥ १८ ॥ तियेचा पिता मेधावीही ॥ कन्यादान करण्याविषयीं ॥ सदा फिरत भूतलाठायीं ॥ योग्य वर शोधीतसे ॥ १९ ॥ परी तैसा मिळेना कोण ॥ ठायींच इच्छा गेली मुरोन ॥ चित्तीं भडकला चिंताग्न ॥ दुःख दारुण सोसवेना ॥ २० ॥ म्हणे कन्येचें काय हें दैव ॥ त्याहूनही माझें अभिनव ॥ आतां न सुचे कांहीं उपाव ॥ कोण कीं देव उपासावा ॥ २१ ॥ ऐसा विचार करीत वहिला ॥ आपुल्या गृहासन्निध आला ॥ तों दैवाचा पडला घाला ॥ अंगीं भरला काळताप ॥ २२ ॥ खदिरांगारापरि दारुण ॥ ज्वाळा चालल्या देहांतून ॥ जळूं लागले दोन्ही नयन ॥ कपाळशूळ उद्भवला ॥ २३ ॥ फुटूं लागलें अंग सकळ ॥ श्वासोच्छ्वास चालले विपुल ॥ हात पाय पडलें विकळ ॥ पुढें पाऊल उचलेना ॥ २४ ॥ मदिरामत्ता ऐसा पडत ॥ संकटें पुढें जाय चालत ॥ मूर्छा येऊनि आरंबळत ॥ धरणीवरी पडियेला ॥ २५ ॥ पडतां पडतां कन्येलागुनी ॥ ओरडला बाळे धांव म्हणोनी ॥ तों पितृशब्द पडतां कर्णीं ॥ कन्या मनीं घाबरली ॥ २६ ॥ जेथें पडला होता तात ॥ तेथें वेगें आली धांवत ॥ तंव तो मेधावी अत्यंत ॥ मरणोन्मुख जाहला ॥ २७ ॥ कंपें व्यापिलें सर्व शरीर ॥ मस्तकीं सुटला घर्म फार ॥ हातपाय पडले गार ॥ नेत्रबुबुळें परतलीं ॥ २८ ॥ होऊं पाहे प्राणोत्क्रमण ॥ तंव झालें भगवत्स्मरण ॥ पूर्वी गार्हस्थ्यधर्माचरण[१] ॥ उत्तम केलें तयानें ॥ २९ ॥ तेणें तयाची अंतकाळीं ॥ प्रपंचींची वासना गेली ॥ भगवन्मूर्ति घनसांवळी ॥ यथास्थित ध्याऊनियां ॥ ३० ॥ म्हणे हे श्रीकृष्ण गोविंदा ॥ पुरुषोत्तमा आनंदकंदा ॥ सत्वर धांव धांव मुकुंदा ॥ आतां आपदा न करावी ॥ ३१ ॥ तूं दीननाथ मी दीन ॥ तव चरणीं असें लीन ॥ तरी मज ह्या भवाब्धींतून ॥ उद्धरूनियां रक्षावें ॥३२॥ तुजवांचूनि त्रिभुवनीं ॥ आतां रक्षिता नाहींच कोणी ॥ ऐसें बोलतां मेधावी मुनी ॥ प्राण सोडिता जाहला ॥ ३३ ॥ तों धांवले विष्णुदूत ॥ तदात्मा[२] घातिला विमानांत ॥ वैकुंठीं नेऊनियां त्वरित ॥ अखंड तेथ स्थापिला ॥ ३४ ॥ तों गतप्राण झाला पिता ॥ ऐसें पाहूनि विप्रसुता ॥ हंबरडा फोडूनि हा ताता ॥ म्हणोन रडूं लागली ॥ ३५ ॥ अंकीं घेतलें पित्याचें प्रेत ॥ आक्रोशें विलाप करी



१ गृहस्थ धर्माचें आचरण [ पंचमहायज्ञ करणें इत्यादि ]. २ त्या मेधावीचा आत्मा.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

बहुत ॥ म्हणे दयाळा तूं माझा तात ॥ आजि मज कां उबगलासी ॥ ३६ ॥ मजवर तुझी किती प्रीती ॥ न विसंबिसी दिनराती ॥ आतां कोणाचे अंकावरुती ॥ ठेवूनि मज गेलास ॥ ३७ ॥ मी पोरी पोरगी पितृहीन ॥ माझें करी कोण रक्षण ॥ स्वसा बंधु कीं आप्तजन ॥ कोणीच नाहीं मजलागीं ॥ ३८ ॥ महातपस्विनी होती माता ॥ ती तों पूर्वींच गेली ताता ॥ आतां भोजनाच्छादन चिंता ॥ माझी कोण करील ॥ ३९ ॥ हा तुझा आश्रम सगळा ॥ अरण्या ऐसा निर्जन झाला ॥ आतां ह्यांत मी तव बाळा ॥ कैशी राहूं एकली ॥ ॥ ४० ॥ तुजविण मी झालें दीन ॥ पुढें उपयोग काय वांचून ॥ खचित खचित देतें प्राण ॥ दुःख दारुण कंठवेना ॥ ४१ ॥ तूं कन्यावत्सल असोनी पिता ॥ विवाहविधि न करितां ॥ मज एकली टाकुनी ताता ॥ कोठें आतां गेलासी ॥४२॥ मी तों केवळ अज्ञान बाळी ॥ कांहीं आगळीक असेल केली ॥ म्हणोन काय कीं यावेळीं ॥ टाकूनियां गेलास ॥ ४३ ॥ तरी ऐसें न करीं बापा ॥ टाकून देईं सर्व कोपा ॥ बाळकालागीं करोनी कृपा ॥ सत्वर येईं परतोनी ॥ ४४ ॥ आतां सोडून देईं मौन ॥ अमृता ऐसें बोलें वचन ॥ बहुत वेळ झाला निजोन ॥ ऊठ ऊठ सत्वरीं ॥ ४५ ॥ ऐसें बोलूनियां कुमारी ॥ वारंवार विलाप करी ॥ रडतां रडतां अश्रुधारीं ॥ सर्वांग भिजलें तियेचें ॥ ४६ ॥ ऐशापरी बहुवेळ गेला ॥ तरी तो तैसाचि असे पडला ॥ ऐसें पाहूनि ती विप्रबाळा ॥ बहु दुःखार्त जाहली ॥ ४७ ॥ कुररी ऐसी दीर्घस्वरें ॥ रडूं लागली एकसरें ॥ तें ऐकोनि वनस्थ सारे ॥ विप्र रे रे बोलूनियां ॥ ४८ ॥ म्हणती कीं हें अति करुण ॥ आज ह्या वनीं रडतें कोण ॥ मग सकळीं स्तब्ध राहून ॥ स्पष्ट शब्द ऐकिला ॥ ४९ ॥ तैं ही मेधावीची बाळा ॥ रडते ऐसा निश्चय केला ॥ हा हा म्हणोन विप्रांचा मेळा ॥ धांविन्नला तत्काळ ॥ ५० ॥ विप्रकन्या होती रडत ॥ तेथें पावले ते समस्त ॥ तों तियेच्या अंकीं प्रेत ॥ मेधावीचें देखिलें ॥ ५१ ॥ तेणें दुःखें ते ब्राह्मण ॥ करिते झाले बहु रोदन ॥ मग कन्येचे अंकावरून ॥ प्रेत

१ कंटाळलास. २ मांडीवर. ३ बहिण. ४ अन्नवस्त्राची चिंता. ५ अपराध, चुकी. ६ एका जातीचा किडा आहे [ जो संध्याकाळीं बारीक व कर्कश शब्द करितो तो ] त्याच्यासारखी किंवा कुत्रीप्रमाणें.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

काढून घेतलें ॥ ५२ ॥ तैं ती अत्यंतचि झाली कष्टी ॥ तियेसी कथिल्या वेदांत गोष्टी ॥ प्रेत उचलोनि उठाउठी ॥ स्मशाना जाते जाहले ॥ ५३ ॥ शिवासन्निध यथाविधान ॥ प्रेतासी दिला मंत्राग्न ॥ नदीमाजी स्नान करून ॥ तिलांजली दीधले ॥ ५४ ॥ परत आले विप्राश्रमासी ॥ आश्वासिलें त्या कन्येसी ॥ तदनंतर स्वस्वगृहासी ॥ सर्वहि जाते जाहले ॥ ५५ ॥ मग विप्रात्मजा करी काय ॥ अंतरामाजीं धरिलें धैर्य ॥ यथाशक्ति करूनि व्यय ॥ उत्तरकार्य सारिलें ॥ ५६ ॥ तेरा दिवस झाले पूर्ण ॥ तातगृहींच वसे आपण ॥ पितृवियोग दुःख दारुण ॥ तियेलागुन सोसवेना ॥ ५७ ॥ जीवनाविणें मासोळी ॥ तैसी रात्रंदिन तळमळी ॥ हा हा दैवा म्हणोनि कपाळीं ॥ बैसे हात लावूनियां ॥ ५८ ॥ वारंवार स्मरून पित्यासी ॥ रडत राहे उक्साबुकसी ॥ निद्रा नाहीं कदा तियेसी ॥ शोकनिमग्न सर्वदा ॥ ५९ ॥ ऐसा लोटतां काळ बहुत ॥ एके दिनीं त्या शून्यगृहांत ॥ दुःखें टपटपां अश्रु गाळित ॥ चिंताक्रांत बैसली असे ॥ ६० ॥ तों दैवयोगें तये स्थानीं ॥ स्वेच्छें पातला दुर्वासमुनी ॥ जो केवळ कोपाची खाणी ॥ कीं शूलपाणी दूसरा ॥ ६१ ॥ मध्यान्हींचा सहस्रकर ॥ तैसें जयाचें तेज प्रखर ॥ माथां पिंगटजटांचा भार ॥ धरिला असे जयानें ॥ ६२ ॥ विरिंचादि देव समस्त ॥ जयाचे स्वभावा सदां भीत ॥ शापानुग्रहालागीं समर्थ ॥ ज्यासम दुजा नसेचि ॥ ६३ ॥ राया त्वन्मातेनें बाळपणीं ॥ उत्तम सेवा केली म्हणोनि ॥ तियेलागीं त्रिदशाकर्षिणी ॥ विद्या दीधली जयानें ॥ ६४ ॥ मी देवांचाहि देव असोन ॥ मज रुक्मिणीसहवर्तमान ॥ अश्वांपरि रथासी जुंपून ॥ रथी आपण जाहला ॥ ६५ ॥ मग आम्ही दंपती उभयतां ॥ मार्गें रथ ओढीत नेतां ॥ सुकुमार माझी रुक्मिणी कांता ॥ तृषाक्रांत जाहली ॥ ६६ ॥ सुकला कंठ वाळला ओंठ ॥ रथ ओढाया न चाले नेट ॥ तेव्हां तिणें ते आपुले कष्ट ॥ हळूच मज सांगितले ॥ ६७ ॥ तेणें मजला दया आली ॥ जातां जातां भूमी दाबिली ॥ पाताळींची गंगा काढिली ॥ धारा उडाली वेगानें ॥ ६८ ॥ ती रुक्मिणीच्या मुखांत ॥ जातांचि तृषा झाली शांत ॥ माझें कृत्य पाहूनि समस्त ॥ मुनि अत्यंत कोपला ॥ ६९ ॥ मज म्हणे रे चक्रपाणी ॥ ही रुक्मिणी तुझी पट्टराणी ॥ अति आवडती आहे म्हणोनी ॥ ऐसें हें कृत्य केलेंसी ॥ ७० ॥



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

स्वप्रियेच्या प्रेमाकरितां ॥ माझी मर्यादा न धरितां ॥ पाताळींची आणून सरिता ॥ प्रियेसी जळ पाजिलेंस ॥ ७१ ॥ तुवां आपुला पराक्रम ॥ दावाया हें केलेंस कर्म ॥ तरी याचें फळ अधम ॥ देतों घेईं समग्र ॥ ७२ ॥ तुम्हां दंपत्याचा घोर ॥ वियोग होईल खरोखर ॥ ऐसा आम्हां शाप दुर्धर ॥ दीधला असे जयानें ॥ ७३ ॥ तो दुर्वास महाऋषी ॥ येतां मेधावीच्या गृहासी ॥ तया पाहूनि विप्रकन्येसी ॥ परमानंद जाहला ॥ ७४ ॥ सर्वहि शोक टाकून ॥ धैर्यें वंदिले मुनीचे चरण ॥ आसनपाद्यादि समर्पून ॥ पूजन केलें यथाविधि ॥ ७५ ॥ कंदमूलफलादिक ॥ वन्य वस्तु अर्पिल्या अनेक ॥ मग ऋषीसी जोडुनि हस्तक ॥ विनयें बोले ऐसें कीं ॥ ७६ ॥ अहो महाभागा मुनिवरा ॥ अत्रिगोत्रदिवाकरा ॥ आजि ह्या दुर्भागणीचे घरा ॥ कोठूनि येणें जाहलें ॥ ७७ ॥ आजि माझा भाग्योदय ॥ झाला यांत नाहीं संशय ॥ नातरी हे आपुले पाय ॥ कोठूनि मज दिसते पैं ॥ ७८ ॥ अथवा माझ्या पितृपुण्यानें ॥ प्रेरिलें असेल याकारणें ॥ मत्कल्याणार्थ आपुलें येणें ॥ झालें असे साचार ॥ ॥ ७९ ॥ भवादृशांचें पादरज ॥ मम शरीरा लागलें आज ॥ आणि जें कां हें दर्शन सहज ॥ मजलागीं लाभलें ॥ ॥ ८० ॥ यार्णे माझी व्रतदानादिक ॥ कर्मे सफळ झालीं सकळिक ॥ आणि ह्या जन्माचें सार्थक ॥ आजि झालें निश्चयें ॥ ८१ ॥ ऐसें बोलुनि विप्रनंदिनी ॥ तटस्थ राहिली कर जोडुनी ॥ मग हास्यमुख दुर्वासमुनी ॥ तियेलागुनी बोलत ॥ ८२ ॥ म्हणे गे सगुणे द्विजबाळे ॥ तुवां सर्वोत्तम आचरिलें ॥ पितयाचें कुळ उद्धरिलें ॥ यांत संशय नसेचि ॥ ८३ ॥ मेधावी ऋषीची तपश्चर्या ॥ अनुपम असे म्हणोनियां ॥ तियेचें फळ तूं सुशीला तनया ॥ झालीस हेंचि असे पैं ॥ ८४ ॥ कैलासाहूनि येत असतां ॥ जाणिली तुझी धर्मशीलता ॥ म्हणोन मार्गें जातां जातां ॥ तव आश्रमा पातलों ॥ ८५ ॥ तुवां केलें माझें पूजन ॥ येणें पावलों समाधान ॥ बाळे तूं पितृकुलमंडन ॥ गुणनिधान आहेस ॥ ८६ ॥ आतां जातों बद्रिकाश्रमासीं ॥ तेथें साक्षान्नारायणऋषी ॥ लोकहितार्थ अहर्निशीं ॥ उग्र तप करिताहे ॥ ८७ ॥ तयाचें करूनियां दर्शन ॥ स्वस्थाना जाईन निघोन ॥ सुविचारें शोक टाकून ॥ स्वस्थ राहीं सुशीले ॥ ८८ ॥ तें ऐकूनि विप्रसुता ॥ म्हणे हो मुनिवरा समर्था ॥ तुमचें दर्शन होतांचि



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तत्वतां ॥ शोक नष्टला सर्वही ॥ ८९ ॥ आणि मज संमानिलें आपण ॥ येणें होणार मम कल्याण ॥ परी जें सांप्रत महाविघ्न ॥ दावाग्नि ऐसें उदेलेंसे ॥ ९० ॥ तें मज जाळितें सदाही ॥ हें तूं न जाणसी कीं कांहीं ॥ तरी दयाळा या समयीं ॥ कृपा करीं सत्वर ॥ ९१ ॥ सुविचारें पाहतां जगांत ॥ मज धैर्यदाता नाहीं दिसत ॥ माता पिता बंधु कीं आप्त ॥ नाहींच कोणी मजलागीं ॥ ९२ ॥ दुःखसागरीं निमग्न ऐशी ॥ पुढें जीवंत राहुं कैशी ॥ जिकडे पहावें तिकडे मजसीं ॥ सर्व वोस दिसताहे ॥ ९३ ॥ तरी दयाळा कृपा कर ॥ माझें दुःख निरसीं सत्वर ॥ पाणि-ग्रहणार्थ कोणीहि वर ॥ इच्छित नाहीं मजलागीं ॥ ९४ ॥ यापुढें मी होईन वृंषली ॥ ऐसी चिंता मज उद्भवली ॥ तेणें समूळ निद्रा गेली ॥ गोड न लागे भोजन ॥ ९५ ॥ यास्तव आतां देणार प्राण ॥ हा मम निश्चय झाला जाण ॥ ऐसें बोलुनि ती कन्या दीन ॥ उगाच राहती जाहली ॥ ९६ ॥ इति श्रीअधिकमासमाहात्म्यसार ॥ बृहन्नारदीयपद्माधार ॥ सज्जनश्रोते ऐकोत चतुर ॥ चतुर्थाध्याय गोड हा ॥ ९७ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

॥ इति चतुर्थोध्यायः ॥ ४ ॥

१ शूद्री. ( जातिभ्रष्ट ).





CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

श्रीगणेशायनमः ॥ ॥ पूर्वाध्यायीं अलौकिक ॥ विप्रकन्येनें आपुलें दुःख ॥ दुर्वासासी कथिलें सकळिक ॥ ऐसें कथानक जाहलें ॥ १ ॥ पुढें असे कथा सुरस ॥ श्रोतीं श्रवणा द्यावें मानस ॥ भगवान् कृष्ण द्वारकाधीश ॥ धर्मरायास सांगत कीं ॥ २ ॥ राया ती विप्रकन्येची वाणी ॥ ऐकूनियां दुर्वासमुनी ॥ म्हणे ग बाळे विप्रनंदिनी ॥ शोक कांहीं करूं नको ॥ ३ ॥ तव दुःखाचिये नाशार्थ ॥ अंतरीं विचारितां बहुत ॥ गुह्यापेक्षेंहि गुह्य अत्यंत ॥ ऐसें एक सुचलें असे ॥ ४ ॥ तें तुज सांगतों ऐकावें ॥ परी तूं कवणाही न सांगावें ॥ कथिल्या ऐसेंचि आचरावें ॥ दुःख आघवें हरेल ॥ ५ ॥ येथूनि येईल तृतीय मास ॥ पुरुषोत्तम नाम तयास ॥ त्यांत करितां सत्कर्मे विशेष ॥ पापें अशेष लोपती ॥ ६ ॥ मासांमाजी कार्तिकादिक ॥ पुण्यकारक असती अनेक ॥ परी यासम किंवा अधिक ॥ नसे आणिक कोणताही ॥ ७ ॥ मास पक्ष तिथि संक्रमणें ॥ सर्व पर्वें रविशशिग्रहणें ॥ आणि निगमोक्त नानासाधनें ॥ पुण्यदायक असतीं जीं ॥ ८ ॥ तीं ह्या पुरुषोत्तममासाची ॥ सोळावी कळाहि न पावती साची ॥ याहूनि इतर महात्म्याची ॥ गोष्ट काय तुज सांगूं ॥ ९ ॥ बारा सहस्र वर्षे पूर्ण ॥ नित्य करितां गंगास्नान ॥ किंवा सिंहस्थीं गोदांस्नपन ॥ करितां फळ मिळे जें ॥ १० ॥ तेंचि पुरुषोत्तममासांत ॥ कोणत्याही शुद्ध जळांत ॥ सविधि स्नान करितां यथार्थ ॥ प्राप्त होतें सकळही ॥ ११ ॥ हा पुरुषोत्तमाचा प्रिय मास ॥ पुरुषोत्तम नाम यास ॥ व्रतादिकीं सेवितां विशेष ॥ इच्छित अशेष लाभतें ॥ १२ ॥ मज अनुभव असे याचा ॥ असत्य नव्हे माझी वाचा ॥ यार्णेच माझे प्रतापाचा ॥ जगीं झेंडा झळकताहे ॥ १३ ॥ तस्मात् बाळे तूं सत्वरीं ॥ येत्या अधिकमासामाझारीं ॥ पुरुषोत्तम व्रत करीं ॥ त्वदिच्छा सारी पुरेल ॥ १४ ॥ श्रीकृष्ण म्हणे गा धर्मराया ॥ ऐसी दुर्वासें करूनि दया ॥ मेधाविऋषीची ती तनया ॥ दीन म्हणोनी संमानिली ॥ १५ ॥ प्रेमभरें तियेलागुन ॥ कथिलें दुःखमोचनसाधन ॥ परी प्रारब्धगति गहन ॥ समर्थ कोण जाणावया ॥ १६ ॥ आदिं जाते बुद्धि सकळ ॥ नंतर जातें भांडवल ॥ ऐसें बोले विद्वन्मंडळ ॥ तैसेंचि तत्काळ जाहलें ॥ १७ ॥ दैव लाभतां सुधेचा घडा ॥

१ अनुपम. २ ब्राह्मणकन्ये. ३ सगळें. ४ पुरुषोत्तमासारखा. ५ दुसरा. ६ संक्रांति. ७ गोदावरीचें स्नान. ८ कन्या. ९ अमृताचा.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

वेगें ओतूनि द्यावा उकिरडां ॥ कीं चिंतामणी फोडून रोकडा ॥ अभाग्यें लाविजे पायरीस ॥ १८ ॥ कीं सुरभी चालून येतां घरा ॥ ताडून दवडिजे माघारां ॥ कीं द्वारीं उदेतां कल्पद्रुम बरा ॥ तोडून लाविजे चुलीस ॥ १९ ॥ तैशीच तिणें केली परी ॥ मुढबुद्धि उदेली अंतरीं ॥ सकळगुणांची झाली सुरी ॥ दुर्दैव पुढें सरसावलें ॥ २० ॥ तेणें ती विप्रकन्या मनांत ॥ क्रोधावूनियां अत्यंत ॥ त्या महाकोपिष्ठ दुर्वासाप्रत ॥ बोलूं लागली असूयें ॥ २१ ॥ म्हणे मुने त्वां कथिलें यथार्थ ॥ परी तें मज नाहीं रुचत ॥ माघादिक मास ते समर्थ ॥ कांहींच करित नाहींत कीं ॥ २२ ॥ कार्तिकमास महाश्रेष्ठ ॥ तयासी कसा म्हणसी कनिष्ठ ॥ वैशाखमास सेवितां स्पष्ट ॥ काय इच्छित न देतो ॥ २३ ॥ सदाशिवादिकदेवांसी ॥ सेवितां अनन्यभावेंसी ॥ ते आपल्या सेवकांसी ॥ सुफल देत नाहींत कीं ॥ २४ ॥ अथवा हा प्रत्यक्ष दर्शन ॥ आकाशीं फिरतो चंडकिरण ॥ यासी सेवितां संपूर्ण ॥ इच्छा पुरवीत नाहीं कीं ॥ २५ ॥ किंवा सेवितां अंबिकादेवी ॥ ती काय कामना न पुरवी ॥ कीं गणेशाचे सेवें आधवी ॥ इच्छा पुरत नाहीं कीं ॥ २६ ॥ व्यतीपातादि महायोगांसी ॥ आणि शिवादि सर्व देवांसी ॥ उल्लंघूनि बोलतां तुजसी ॥ लाज कैसी वाटेना ॥ २७ ॥ जया तूं म्हणसी पुरुषोत्तम ॥ तो मलमास अति अधम ॥ त्यांत नाहीं रविसंक्रम ॥ सर्व कर्मा निंद्य असे ॥ २८ ॥ ऐसें असतां तूं तयासी ॥ सर्वांत श्रेष्ठ कैसा करिसी ॥ तुझें धार्ष्ट्य पाहूनि मजसी ॥ बहु आश्चर्य वाटतें ॥ २९ ॥ सर्व दुःखांचा नाशक ॥ ब्रह्मांडामाजीं हरिच एक ॥ तयावांचूनि तैसा आणिक ॥ मज ना दिसे कोणीही ॥ ३० ॥ सीतापति रामाविण ॥ कीं उमापति शिवावांचून ॥ माझें दुःख हरील संपूर्ण ॥ ऐसा देव ना कोणीही ॥ ३१ ॥ ऐसें असतां सोडून यांसी ॥ कैसा स्तविसी मलमासासी ॥ भास्करा त्यजूनि खद्योतासी ॥ वानावें तैसें केलेंस ॥ ३२ ॥ ऐसी ती विप्रसुतेची वाणी ॥ ऐकूनियां दुर्वासमुनी ॥ कोपें खवळला तत्क्षणीं ॥ नेत्र आरक्त जाहले ॥ ३३ ॥ तथापि शापिलें नाहीं तियेस ॥ हीच कृपा केली

१ कामधेनु. २ कल्पवृक्ष. ३ प्रकार. ४ निंदेनें. ५ सूर्य. ६ महालक्ष्मी. ७ सर्व. ८ सूर्यसंक्रांति. ९ उद्धटपणा. १० दुसरा. ११ काजव्यास.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

विशेष ॥ अंतरामाजीं झाला उदास ॥ विचार केला ऐसा कीं ॥ ३४ ॥ ही तो मम मित्राची सुता ॥ नाहीं जाणत स्व हिताहिता ॥ अपुरी बुद्धि मूढ तत्वतां ॥ म्हणोनि ऐसें बोलली ॥ ३५ ॥ पुरुषोत्तमाचें महिमान ॥ पंडितांसहि दुर्ज्ञेय पूर्ण ॥ मग ऐशा ह्या मूढेलागुन ॥ कोठून पैं समजणार ॥ ३६ ॥ ही कुमारी पितृहीन बाळा ॥ दुःखाग्निभर्जितवेल्हाळा ॥ माझ्या अत्युग्र शापाला ॥ कैसी सहन करील ॥ ३७ ॥ ऐशा कृपें तो दुर्वासमुनि ॥ ठायींच सर्व कोप निरवुनी ॥ पुनश्च विप्रकन्येलागुनी ॥ बोलता झाला साक्षेपें ॥ ३८ ॥ बाळे तूं महाअपराधीनी परी ॥ माझ्या मित्राची आहेस कुमारी ॥ म्हणोन आतां मी तुजवरी ॥ कोप न करी कांहींच ॥ ३९ ॥ जैसें तुझ्या येईल मनांत ॥ तैसेंचि करी तूं समस्त ॥ तथापि मी भविष्य किंचित ॥ सांगतों ऐकें दुर्भाग्ये ॥ ४० ॥ त्वां पुरुषोत्तममासाप्रत ॥ निंदिलें त्याचें फळ खचित ॥ इहजन्मीं वा अन्यजन्मांत ॥ तुज भोगणें असेचि ॥ ४१ ॥ आतां बदरी वनालागुन ॥ येथूनि मी जातों जाण ॥ तूं मम मित्राची कन्या म्हणोन ॥ तुज नाहीं शापिलें ॥ ॥ ४२ ॥ आतां तूं केवळ बाळभावेंसीं ॥ आपलें हिताहित नेणसी ॥ शुभ किंवा अशुभ तुजसी ॥ कोठूनि पैं समजेल ॥ ४३ ॥ आतां मी करितों गमन ॥ सदा असो तव कल्याण ॥ अवश्यंभावि शुभाशुभ जाण ॥ कोणाचेन उल्लंघवे ॥ ४४ ॥ ऐसें बोलूनि दुर्वासमुनि ॥ शीघ्र निघोनि गेला तेथुनी ॥ पुरुषोत्तमाच्या हेळणें तत्क्षणीं ॥ निःप्रभ झाली मुनिकन्या ॥ ४५ ॥ मग तिणें चिरकाळवर ॥ अंतरीं करूनियां विचार ॥ शीघ्रफलदाता शंकर ॥ आहे ऐसें आठविलें ॥४६॥ आणि त्याचें करितां आराधन ॥ सर्व कामना होतील पूर्ण ॥ तरी आतां तपाचरण ॥ करावें हेंचि योग्य असे ॥ ४७ ॥ ऐसा निश्चय करूनि मनीं ॥ ती मेधावीऋषीची नंदिनी ॥ अति दुष्कर तपाचरणीं ॥ प्रवृत्त झाली तत्काळ ॥ ४८ ॥ जो जगदीश्वर पंचवदन ॥ दशभुजदिव्यत्रिनयन ॥ अनाथनाथ दीनरक्षण ॥ उमारमण जगद्गुरु ॥ ४९ ॥ तयालागीं अंतरीं ध्यात ॥ तयाच्याच उद्देशें सतत ॥ भजनपूजनादिक करित ॥ कष्ट बहुत चालविले ॥ ५० ॥ ग्रीष्मामाजीं ऊष्मा दारुण ॥ तेव्हां करी पंचाग्निसाधन ॥ हेमंत शिशिरीं

---

१ कन्या. २ दुःखाग्नीनें भाजलेली. ३ अवश्य होणारें. ४ बहुकाळपर्यंत. ५ कन्या.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

थंडी कठिण ॥ तेव्हां निमग्न शीतोदकीं ॥५१॥ वर्षर्तुमाजीं वृष्टि बहुत ॥ तैं ती उघडी पर्जन्यांत ॥ दर्भशय्येवरी सतत ॥ अनावृत[1] निजतसे ॥ ५२ ॥ प्रातःसायं नित्यनेमान ॥ अधोमुख करी धूम्रपान ॥ आहार विहार गमनागमन ॥ निद्रादि संपूर्ण त्यागिलें ॥ ५३ ॥ कृश झालें सर्व शरीर ॥ चित्तीं आठवी श्रीशंकर ॥ ती तियेची तपस्या उग्र ॥ पाहून इंद्र घाबरला ॥ ५४ ॥ माझें पद ही घेईल आतां ॥ म्हणोन तया पडली चिंता ॥ बहुत विघ्नें केलीं तत्वतां ॥ परी तीं व्यर्थ जाहलीं ॥ ५५ ॥ एवं प्रकारें विप्रबाळी ॥ तप आचरती वहिली ॥ नवसहस्र वर्षें लोटलीं ॥ केवळ उरली जिवंत ॥ ५६ ॥ तेव्हां भगवान गौरीरमण ॥ श्रीशंकर झाला प्रसन्न ॥ स्वस्वरूप प्रगट करून ॥ तिजपुढें ठाकला ॥ ५७ ॥ शुद्धस्फटिकसमान[2] वर्ण ॥ तेज फांके सूर्यासमान ॥ दशभुज पंचवदन ॥ नीलकंठ साजिरा ॥ ५८ ॥ माथां पिंगट जटांचा भार ॥ माजीं झुळझुळ वाहे नीर ॥ तृतीय नेत्रींचा वैश्वानर ॥ तेज प्रखर तयाचें ॥ ५९ ॥ मस्तकीं मिरवे चंद्रकला ॥ गळां नरमुंडांची माळा ॥ हस्तीं त्रिशूळ तेजागळा ॥ व्याघ्रचर्म नेसलासे ॥ ६० ॥ भस्मचर्चित सर्व शरीर ॥ नागयज्ञोपवीत सुंदर ॥ ऐसा भगवान श्रीशंकर ॥ प्रत्यक्ष पुढें पातला ॥ ६१ ॥ तें दिव्यस्वरूप विलोकून ॥ विप्रकन्या उठली तत्क्षण ॥ शरीरामाजीं येतां प्राण ॥ प्रेत उठे तत्काळ ॥६२॥ परमानंदीं निमग्न झाली ॥ जयजय शिवा चंद्रमौळी ॥ म्हणोनि तयाचे पदकमळीं ॥ प्रेमें मस्तक ठेविलें ॥६३॥ सर्वेचि दोन्ही हस्त जोडून ॥ मानसोपचारीं केलें पूजन ॥ मधुरपणीं प्रेमें स्तवून ॥ स्तब्ध उभी राहिली ॥ ६४ ॥ तैं तो भगवान् पार्वतीवर ॥ प्रियकन्येसी बोले सादर ॥ बाळे मी साक्षात् श्रीशंकर ॥ तुज प्रसन्न झालोंसें ॥ ६५ ॥ तरी मागें वरप्रदान ॥ तवेच्छा सर्व पुरवीन ॥ तें शिवाचें ऐकूनि वचन ॥ विप्रकन्या आनंदली ॥ ६६ ॥ आणि म्हणे पार्वतीरमणा ॥ प्रसन्न झालासी दयाघना ॥ तरी माझी मनकामना ॥ पूर्ण करीं सत्वर ॥ ६७ ॥ पति दे पति दे पति दे मजसीं ॥ पति दे पति मी मागत्यें तुजसी ॥ तयावांचूनि मम मानसीं ॥ इच्छा नाहीं कांहींच ॥ ६८ ॥ तें विप्रकन्येचें भाषण ॥ ऐकूनि बोले उमारमण ॥ बाळे तूं स्वमुखें



१ आच्छादनरहित, उघडी. २ शुद्धस्फटिकाप्रमाणें पांढरा, गौरवर्ण.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

वचन ॥ बोललीस तैसेंचि होईल ॥ ६९ ॥ पति दे पति दे मजप्रती ॥ ऐसें पांचवेळ बोललीस निरुती ॥ म्हणोनि तुजला पांच पती ॥ अत्युत्तम होतील ॥ ७० ॥ ते सर्व धर्मज्ञ महाशूर ॥ सत्य प्रतिज्ञा प्रतापी थोर ॥ नानायज्ञकर्ते परिकर ॥ क्षत्रियजाति असोनियां ॥ ७१ ॥ जितेंद्रिय साधु सत्कीर्ती ॥ गुणविख्यात होतील जगतीं ॥ तुजवर करितील बहु प्रीती ॥ संशय चित्तीं धरूं नको ॥ ७२ ॥ ऐशी शिवाची ऐकूनि वाणी ॥ अति दुःखित विप्रनंदिनी ॥ म्हणे देवा तूं शिव असुनी ॥ कां हें अशिव बोलतोसी ॥ ७३ ॥ करुणाघना गिरिजापती ॥ नको नको ही विरुद्ध स्थिती ॥ एके नारीसी एकचि पती ॥ हाच असे सदाचार ॥ ७४ ॥ आजपर्यंत जगाभीतर ॥ कदाहि कोठेंहि साचार ॥ एके नारीसी पांच भ्रतार ॥ दृष्ट वा श्रुत नाहींत पैं ॥ ७५ ॥ पुरुषासी मात्र पांच भाजा ॥ कथिल्या असती वृषभध्वजा ॥ ऐसें असतां हा तूं तिजा ॥ पंथ कैसा बोलतोसी ॥ ७६ ॥ मी तों केवळ तुझी असूनी ॥ कैशी होऊं पांचांची कामिनी ॥ मजविषयीं ऐशी वाणी ॥ बोलण्या योग्य नाहींस ॥ ७७ ॥ तथापि तैसी करिशील मज ॥ तरी समर्था सांगतें तुज ॥ तुझी मी आहें म्हणोनि सहज ॥ तुलाचि लाज होईल पैं ॥ ७८ ॥ ती तियेचि ऐकूनि भारती ॥ शिव म्हणे गे तुज पांच पती ॥ या जन्मीं न होतां निश्चितीं ॥ पुढिले जन्मीं होतील ॥ ७९ ॥ तूं स्वतपाच्या बळें निरुतें ॥ अयोनिसंभव होशी तेथें ॥ सदा भोगूनि भर्तृसुखातें ॥ मोक्षपदातें पावशील ॥ ८० ॥ दुर्वास ऋषि महाकोपन ॥ तो माझीच प्रिय प्रतिमा जाण ॥ तयाचा तूं पूर्वीं महान ॥ अपमान केलासी ॥ ८१ ॥ त्या ऋषीचें सामर्थ्य अद्भुत ॥ मूखें काय सांगूं तुजप्रत ॥ जरी कां तो कोपेल किंचित ॥ तरी त्रैलोक्य जाळील पैं ॥ ८२ ॥ परी त्याणें शापिलें नाहीं ॥ दयाच केली तुजविषयीं ॥ तथापी त्वां जें त्यासमयीं ॥ ब्रह्मतेज मर्दिलेंस ॥ ८३ ॥ तयाचें फळ अति दारुण ॥ अवश्य भोगणें असे जाण ॥ तें साक्षाद्देववाचेन ॥ निवारण नव्हेचि ॥ ८४ ॥ आणि जो पुरुषोत्तम नाम ॥ सर्व मासांत मास उत्तम ॥ भगवंताचा प्रिय परम ॥ तो त्वां पूर्वीं निंदिलास ॥ ८५ ॥ जयासी साक्षाद्भगवंतानें ॥ स्वप्रिय म्हणोनी बहुप्रेमानें ॥ आपुलें ऐश्वर्य पूर्णपणें ॥ अर्पिलें असे साचार ॥ ८६ ॥ मी आणि ब्रह्मादि देव ॥ सिद्ध चारण यक्ष गंधर्व ॥ आणि नारदादि

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तपस्वी सर्व ॥ मानिताहों सर्वदा ॥ ८७ ॥ तो भगवत्प्रिय मास निंदिला ॥ आणि कदापि त्वां नाहीं पूजिला ॥ म्हणोन बाळे पुढें तुजला ॥ पांच पति होतील ॥८८॥ हें अन्यथा न होय निरुती ॥ पुरुषोत्तमातें जे निंदिती ॥ तयांसी नाना दुःखें होती ॥ अंतीं पडती रौरवांत ॥८९॥ पुरुषोत्तमाची भक्ती करित ॥ ते पुत्रपौत्र धनन्वित होत ॥ इह परलोकीं अखंडित ॥ सुख होय तयांसी ॥ ९० ॥ अस्मदादि देवहि सर्व ॥ मासासी सेवितों सदैव ॥ जया सेवितां पुरुषोत्तम देव ॥ प्रसन्न होतो सत्वरीं ॥ ९१ ॥ तरी तया कैसें न भजावें ॥ सर्वीही सदैव सेवावें ॥ महर्षींचें वचन मानावें ॥ असत्य नव्हे म्हणोनियां ॥ ९२ ॥ आणि सदसद्वादी महामुनी ॥ सत्कारावेंचि वचन सर्वजनीं ॥ ऐसें बोलत पिनाकपाणी ॥ गुप्त तत्क्षणीं जाहला ॥ ९३ ॥ तैं यूथभ्रष्ट हरिणीपरी ॥ चकित झाली विप्रकुमरी ॥ महाभीति उदेली अंतरीं ॥ पुढें कांहीं सुचेना ॥ ९४ ॥ मुखींचें सर्व तेज पळालें ॥ दीर्घ निःश्वास उद्भवले ॥ नेत्रांतून अश्रु चालले ॥ तप्त झालें सर्वांग ॥ ९५ ॥ चिंताग्नीच्या भडकल्या ज्वाळा ॥ तेणें करपली विप्रबाळा ॥ दावाग्नि दग्धलता कोमळा ॥ तैसी झाली विव्हळ ॥ ९६ ॥ ऐसें दुःख भोगतां सतत ॥ संवत्सर लोटले बहुत ॥ कृतांत पातला अवचित ॥ प्राण तियेचे हरियेले ॥ ९७ ॥ प्रावृत्कालीं समेधगगनीं ॥ जैसी लोपे सौदामिनी ॥ तैशीच ती विप्रनंदिनी ॥ स्वाश्रमीं नष्ट जाहली ॥ ९८ ॥ तपोयोगें पाप जळालें ॥ कलेवर आश्रमीं पडलें ॥ वनस्थ विप्र मिळोन सगळे ॥ अग्नी दीधला तयास ॥ ९९ ॥ श्रीकृष्ण म्हणे गा नृपाळा ॥ जैं ती निमाली विप्रबाळा ॥ द्रुपदरायें तेचवेळां ॥ यज्ञ केला उत्तम ॥ १०० ॥ त्या यज्ञकुंडांतून कुमारी ॥ अग्निवर्ण उदेली गोजिरी ॥ तीच ही पांचाली म्हणोन भूवरी ॥ सर्वप्रसिद्ध झाली असे ॥ १ ॥ पूर्वीची जी ऋषिकन्या ॥ तीच ही सांप्रत सर्वमान्या ॥ अयोनीसंभव ऐशी धन्या ॥ द्रुपदकन्या जाहली ॥ २ ॥ पूर्वजन्मामाजी इयेतें ॥ तुज पांच पति होतील निरुतें ॥ ऐसें शिवें जें कथिलें होतें ॥ तैसेंचि येथें घडलेंसे ॥ ३ ॥ तुम्ही महापुरुषार्थी ॥ इयेचे झालेति पांच पती ॥ आणि ही द्रौपदी महासती ॥ मजला अति प्रिय आहे ॥ ४ ॥ ही मजविषयीं स्नेह करते ॥ मजवरीच प्राण ठेविते ॥ मत्परायण ऐशी वर्तते ॥



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

मजचि भजते सर्वदा ॥ ५ ॥ स्वप्राणापेक्षेंहि अधिक ॥ हिजवर माझें प्रेम सकळिक ॥ ही मम सखी अलौकिक ॥ मीच रक्षक इयेचा ॥ ६ ॥ परी हिणें पुरुषोत्तमाची ॥ पूर्वी हेळणा केली साची ॥ म्हणोन सांप्रत म्यां इयेची ॥ उपेक्षा केली सर्वथा ॥ ७ ॥ पुरुषोत्तमातें तिरस्कारित ॥ तयां मी लोटितों नरकांत ॥ ही मम सखी प्रिय अत्यंत ॥ म्हणोन तैसें ना केलें ॥ ८ ॥ अरे पुरुषोत्तमाची योग्यता ॥ तुज काय सांगूं नृपनाथा ॥ हा मुनिदेवांसीहि सर्वथा ॥ सेव्य असे साचार ॥ ९ ॥ मग केवळ मानवां एक ॥ सेव्य असेल यांत काय अधिक ॥ सर्वां सर्वार्थ फलदायक ॥ ऐसा आणिक नसेचि ॥ ११० ॥ तरी सांडुनि अन्य कृत्यांसी ॥ येत्या पुरुषोत्तममासासी ॥ स्नानदान जपादिकेंसी ॥ आराधीं तूं सादर ॥ ११ ॥ तेणें तुमचें सर्वप्रकारें ॥ कल्याण होईल निर्धारें ॥ चवदावें वर्ष होतां पुरें ॥ दुःख समग्र निरसेल ॥ १२ ॥ अरे ह्या कृष्णेचें केशाकर्षण ॥ पाहूनियां जे हर्षले पूर्ण ॥ तयांचे स्त्रियांचें केशवपन ॥ करीन जाण निश्चयें ॥ १३ ॥ सुयोधनादि सर्व भूपांसी ॥ धाडीन मी यमसदनासी ॥ संहारूनियां स्वशत्रूंसी ॥ चक्रवर्ती होशील तूं ॥ १४ ॥ क्षीराब्धि तनया माझी कांता ॥ कीं प्रद्युम्न कीं हलायुध भ्राता ॥ सात्यकी किंवा देवकी माता ॥ हीं मज प्रिय असती पैं ॥ १५ ॥ परी मज जैसे माझे भक्त ॥ केवळ आवडती अत्यंत ॥ तैसे ह्या सर्व ब्रह्मांडांत ॥ अन्य कोणाच नावडती ॥ १६ ॥ जेणें दुखविले माझे भक्त ॥ तेणें मजचि पीडिलें सतत ॥ आणि त्यासम ह्या सर्व जगांत ॥ द्वेष्य नसे कोणीहि ॥ १७ ॥ त्या दुष्टातें सूर्यनंदन ॥ मदाज्ञें देतो फल दारुण ॥ मी तयाचें मुखावलोकन ॥ दंडार्थही न करींच ॥ १८ ॥ तुम्हीं माझे परम भक्त ॥ दुष्टीं तुम्हां गांजिलें बहुत ॥ तयांचा करीन निःपात ॥ चिंता मनांत करूं नका ॥ १९ ॥ येत्या पुरुषोत्तममासासी ॥ आराधा अनन्यभावेंसी ॥ सर्व प्रकारें तुमच्या सुखासी ॥ पार नाहींसा होईल ॥ १२० ॥ स्वस्थ रहा चिंता न करा ॥ आतां मी जातों द्वारकापुरा ॥ तेथींचा जनसमूह सारा ॥ विरहातुर झालासे ॥ २१ ॥ वसुदेव देवकी रोहिणीतनय ॥ प्रद्युम्न सांब गदादि तनय ॥ आहुकादि यादववर्य ॥ आणि रुक्मिण्यादि स्त्रिया ज्या ॥ २२ ॥ तीं सर्वहि माझीं निरुती ॥ मार्गप्रतीक्षा करीत असती ॥ राया आतां मजप्रती ॥ निरोप देईं

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

सत्वर ॥ २३ ॥ तें कृष्णाचें ऐकतां वचन ॥ पांडव झाले बहु खिन्न ॥ दुःखाश्रू ढाळित तयालागुन ॥ सद्गदवाणी बोलत ॥ २४ ॥ हे देवदेव जगन्नायक ॥ तूंच आमुचें जीवन एक ॥ जलजंतूसी जैसें उदक ॥ तैसाचि रक्षक तूं आम्हां ॥ २५ ॥ तुजविण नाहीं आम्हां कोणी ॥ तूंच आमुचा कैवारी धनी ॥ तरी पुनश्च आम्हां लागुनी ॥ शीघ्र देईं दर्शन ॥ २६ ॥ पांडवांचा स्वामी कृष्ण ॥ ऐसें बोलती सर्वजन ॥ तयाचा धरूनि अभिमान ॥ सदा रक्षीं आम्हांस ॥ २७ ॥ देवा आम्हीं पांडव सकळ ॥ तुझेचि दास असो केवळ ॥ तरी तूं आम्हां कदाकाळ ॥ विसरूं नको दयाळा ॥ २८ ॥ अस्मच्चित्तभ्रमरालागुन ॥ तव पादाब्ज असो जीवन ॥ हेंचि देवा कर जोडून ॥ पुनः पुनः प्रार्थितों ॥ २९ ॥ ऐसे ते पांडव सादर ॥ प्रार्थित असतां वारंवार ॥ कृष्णासी लोटला गहिंवर ॥ परी सर्व जिरविला ॥ १३० ॥ मग रथावरी आरुढोन ॥ द्वारके चालिला जगज्जीवन ॥ पोंचवित जातां पांडुनंदन ॥ तयें मार्गें फिरविले ॥ ३१ ॥ मनोवेगें हांकूनि रथासी ॥ श्रीकृष्ण गेला द्वारकेसी ॥ हिकडे पांडव वनवासी ॥ दुःख भोगिती सर्वदा ॥ ३२ ॥ श्रीकृष्णाचें वचन स्मरत ॥ नाना तीर्थयात्रा करित ॥ ऐसा लोटतां काळ बहुत ॥ पुरुषोत्तम मास पातला ॥ ३३ ॥ तेव्हां तयीं यथाविधान ॥ उत्तम केलें व्रताचरण ॥ तेणें शत्रुक्षय होऊन ॥ पूर्ववत् राज्य लाभलें ॥ ३४ ॥ पुढें पुरुषोत्तमाच्या कृपेसी ॥ येथें भोगुनी सर्व सुखांसी ॥ अंतीं पावोनी परमपदासी ॥ अखंड तेथेंचि राहिले ॥ ३५ ॥ आणि पूर्वीं दृढधन्वानामक ॥ सूर्यवंशीं नृपनायक ॥ तेणें पुरुषोत्तममासास देख ॥ यथाविधी सेविला ॥ ३६ ॥ तेणें पुण्यें तो आसमास ॥ भोगूनियां सुखभोगास ॥ अंतीं पावोनि गोलोकास ॥ भगवद्रूप जाहला ॥ ३७ ॥ ऐसा पुरुषोत्तमाचा महिमा ॥ अनुपम असे गा मुनिसत्तमा ॥ म्हणोनि मानवीं अन्यकामा ॥ सोडुनि तयासी भजावें ॥ ३८ ॥ तेणें सकळ दुःखें लोपुनी ॥ सुटतील जन्ममरणांपासुनी ॥ ऐसें स्वयें नारायणमुनी ॥ नारदासी कथिता जाहला ॥ ३९ ॥ इति श्री अधिकमासमाहात्म्यसार ॥ बृहन्नारदीयपाद्माधार ॥ सज्जन श्रोते ऐकोत चतुर ॥ पंचमोध्याय गोड हा ॥ ५ ॥ इति पंचमोऽध्यायः ॥ ५ ॥



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

॥ श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ऐका श्रोते कथा पावन ॥ सूत सांगे शौनकांलागुन ॥ नारायणाचें पूर्वोक्त वचन ॥ ऐकूनि नारद प्रश्नित ॥ १ ॥ म्हणे हो नारायणा आपण ॥ जो कथिला दृढधन्वा म्हणून ॥ तयाचें कथानक संपूर्ण ॥ मजलागुन सांगावें ॥ २ ॥ तें ऐकूनि नारायणमुनी ॥ म्हणे नारदा पुरातनी ॥ गंगेपरी कथा पावनी ॥ सांगतों ऐकें समग्र ॥ ३ ॥ पूर्वी हैहयदेशाचा नृपती ॥ महापराक्रमी शुद्धमती ॥ चित्रधर्मानामें जगतीं ॥ प्रसिद्ध असता जाहला ॥ ४ ॥ तयासी झाला एक पुत्र ॥ महातेजा विशालनेत्र ॥ दृढधन्वा ऐसें पवित्र ॥ नाम तयाचें ठेविलें ॥ ५ ॥ जैसा वाढे अनुदिन ॥ तैसे अंगीं भरत सद्गुण ॥ कदा न बोले मिथ्या वचन ॥ धर्मपरायण सर्वदा ॥ ६ ॥ चतुःषष्ठि कळा सांग ॥ स्वबुद्धीं आकळिल्या सवेग ॥ चतुर्दश विद्या यथासांग ॥ गुरूपासून अभ्यासिल्या ॥ ७ ॥ सर्वलक्षणीं सुसंपन्न ॥ राजनीतींत झाला प्रवीण ॥ शौर्योदार्यादि राजगुण ॥ अंगीं संपूर्ण संचरले ॥ ८ ॥ पुढें पावला यौवनासी ॥ पुत्रवत् मानी सर्व प्रजांसी ॥ स्ववर्तनें सकळ जनांसी ॥ सुख देई सर्वदा ॥ ९ ॥ ऐसें पाहूनि तयाचा तात ॥ चित्रधर्मा विचारी मनांत ॥ प्रजापालनालागीं सुत ॥ आतां समर्थ झाला हा ॥ १० ॥ इतःपर ह्या संसारांत ॥ व्यर्थ काळ दवडावा किमर्थ ॥ सर्वसंग त्यागूनि सतत ॥ श्रीहरिभजन कीजिये ॥ ११ ॥ पूर्वज महाराजांची रीती ॥ आपणही अनुसरावी निरुती ॥ एवं निश्चय केला चित्तीं ॥ स्नेहपाश तोडिले ॥ १२ ॥ पुत्रासी राज्यीं बैसवून ॥ पुलहाश्रमीं[1] गेला आपण ॥ अंतरीं करीत कृष्णस्मरण ॥ तप दारुण चालविलें ॥ १३ ॥ निराहार राहिला सतत ॥ निद्रा वर्जिली दिनरात ॥ ऐसें तप करितां बहुत ॥ मोक्षा जाता जाहला ॥ १४ ॥ ऐकूनि पित्याच्या सद्गतीसी ॥ हर्षशोक झाले दृढधन्व्यासी ॥ पितृभक्त्या द्विजवचनेंसीं ॥ और्ध्वदैहिकं[2] संपादिलें ॥ १५ ॥ गोभूहिरण्यादि नाना दानें ॥ पित्रुद्देशें दीधलीं तयानें ॥ गज रथ वाजी शिबिका यानें ॥ देऊनि अर्थी[3] तोषविले ॥ १६ ॥ ऐसें उरकिलें पितृकाज ॥ पुढें तो दृढधन्वा महाराज ॥ पुष्करावर्तनगरीं राज्य ॥ धर्मन्यायें करीतसे ॥ १७ ॥ तयाची कांता

१ पुलह ऋषीच्या आश्रमांत. २ उत्तरक्रिया. ३ याचक.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

सुशीला उत्तम ॥ विदर्भकन्या गुणसुंदरी नाम ॥ महासती रूपें अनुपम ॥ त्रैलोक्यामाजीं सुंदर ॥ १८ ॥ तियेपोटीं दृढधन्व्यापासून ॥ सुंदर झाले चार नंदनें ॥ चित्रवाक चित्रवाह मणिमान ॥ आणि चित्रकुंडल चतुर्थ ॥ १९ ॥ तैशीच चारुमतीनामक ॥ पांचवी झाली कन्या एक ॥ मातापितरांसम तीं सकळिक ॥ सर्वलक्षणीं सुसंपन्न ॥२०॥ ऐसें कुटुंब वाढलें परिकरं ॥ स्वयें तो राव रूपसुंदर ॥ शांत दांत परम उदार ॥ प्रतापी शूर असूनियां ॥ २१ ॥ वेदवेदांगवेत्ता सुजाण ॥ धनुर्विद्येंत कुशल पूर्ण ॥ क्षमेविषयीं पृथ्वीसमान ॥ गांभीर्यें जैसा सागर ॥ २२ ॥ साम्याविषयीं पितामहैसा ॥ प्रसादकर्ता गिरीशौं ऐसा ॥ उग्रवीर्य कार्तवीर्य जैसा ॥ दिसे तैसा शत्रुंसी ॥२३॥ एकपत्निव्रतधारी ॥ राघवा ऐसाच निर्धारीं ॥ शत्रुसंघविदारणकारी ॥ जैसा दैत्यारि केवळ ॥ २४ ॥ सर्व राजे देत करभार ॥ चरण वंदिती वारंवार ॥ कीर्तिध्वज विराजे थोर ॥ शीतकरें नभीं जैसा ॥ २५ ॥ शुक्लपक्षींचा जैसा हेमांशॅ ॥ तैसें ऐश्वर्य वाढलें विशेष ॥ परी तो दुर्बुद्धी दासीस ॥ न करी स्पर्श कदापि ॥ २६ ॥ सुखानुभव घेत अनुदिनीं ॥ तों एकदां रात्रीं शयनीं ॥ निजला असतां तयाचे मनीं ॥ विचार ऐसा उद्भवला ॥ २७ ॥ हें माझें अतुल वैभव ॥ याचा कैसा झाला उद्भव ॥ कवण्या पुण्याचा हा प्रभाव ॥ उदया सर्व आला असे ॥ २८ ॥ मीं आजवरी जन्माठायीं ॥ तपाचरण केलें नाहीं ॥ दान जप कीं होमादिकही ॥ सत्कर्म कांहीं नाचरिलें ॥ २९ ॥ तथापि हा भाग्योदय महान ॥ याचें कोणा पुसावें कारण ॥ ऐसें अंतरीं करितां मनन ॥ रात्र संपूर्ण लोटली ॥ ३० ॥ ब्राह्ममुहूर्तीं उठला राव ॥ नित्यकर्में सारिलीं सर्व ॥ नाना दानें देऊनि अभिनव ॥ विप्रचरण वंदिले ॥ ३१ ॥ मग अश्वावरी आरूढोनी ॥ मृगयार्थ गेला घोरवनीं ॥ सर्वें सेना चतुरंगिणी ॥ शस्त्रंसन्नद्ध धांवली ॥ ३२ ॥ निबिड झाडी वृक्ष विशाळ ॥ तेथें पातला तो नृपाळ ॥ नरांचा ऐकूनी पायचळ ॥ पशु पळत चालले ॥ ३३ ॥ परी रायाचें अचुक संधान ॥ बाण सोडी

१ पुत्र. २ सुंदर. ३ ब्रह्मदेवासारखा. ४ शिवाऐसा. ५ विष्णु. ६ चंद्र. ७ आकाशांत. ८ चंद्र. ९ पहांटे. १० शस्त्रें घेऊन तयार.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

मर्म लक्षून ॥ व्याघ्र वराह गवे हरिण ॥ असंख्य मारून पाडित ॥ ३४ ॥ तों एक मोठा हरिण देखिला ॥ रायें तीक्ष्णबाणें विंधिला ॥ परी तो न पडतां त्या शराला ॥ घेऊनी पळाला वनांतरीं ॥ ३५ ॥ तद्रक्तबिंदु गेले पडत ॥ तोचि मार्ग अनुलक्षित ॥ राजेश्वर घोडा फेंकित ॥ धांवला त्वरित एकलाचि ॥ ३६ ॥ दूरदेश अतिक्रमिला ॥ निबिडवनीं मृग लपला ॥ रायें सर्वत्र धुंडाळिला ॥ परी कोठें सांपडेना ॥ ३७ ॥ मध्यान्हा आला सूर्यदेव ॥ आंतपें तापलें अंग सर्व ॥ कासावीस झाला जीव ॥ तृषा बहुत लागली ॥ ३८ ॥ सवें नाहीं सेवक कोणी ॥ स्वयेंचि राव शोधी पाणी ॥ तंव त्या वनीं सागरावाणी ॥ सरोवर मोठें देखिलें ॥ ३९ ॥ तेथें जाऊनियां तत्क्षण ॥ यथेच्छ केलें उदकपान ॥ आणि अश्वासही जळ पाजून ॥ तीरीं घेऊन ठाकला ॥ ४० ॥ तों तेथें गगनचुंबित ॥ वटवृक्ष देखिला विस्तृत ॥ जयाची छाया परमाद्भुत ॥ घनदाट पसरलीसे ॥ ४१ ॥ तेथें बांधूनियां अश्वासी ॥ राजेंद्र बैसला छायेसी ॥ तों सुंदर एक शुकपक्षी ॥ अवचित तेथें पातला ॥ ४२ ॥ आणि मनुष्यवाचें अलोलिक[३] ॥ रायासी संबोधी सुरेख ॥ पुनः पुनः एकचि श्लोक ॥ पढता झाला ऐसा कीं ॥ ॥ ४३ ॥ श्लोक ॥ विद्यमानातुलसुखमालोक्यातीव भूतले ॥ न चिंतयसि तत्त्वं त्वं तत्कथं पारमेष्यसि ॥ १ ॥ भूतळींच्या दृश्य सुखासी ॥ अनुपम मुख्य ऐसें मानिसी ॥ परी न विचारितां तत्त्वासी ॥ पार पावसी कैसा तूं ॥ ४४ ॥ ऐसा तो शुकोक्त श्लोक ॥ ऐकतांचि नरनायक[४] ॥ अंतरामाजीं मोह हरिख ॥ पावूनि विचार करी कीं ॥ ४५ ॥ हा शुकपक्षी वारंवार ॥ काय हें पद्य[५] बोलतो मधुर ॥ याचा अर्थ दुर्बोध फार ॥ केवळ सार भरलेंसे ॥४६॥ श्रीकृष्णसेवक परीक्षित ॥ निमग्न होतां भवाब्धींत ॥ तया सांगूनियां भागवत ॥ श्रीशुकदेवें उद्धरिलें ॥ ४७ ॥ तयापरी मज उद्धराय ॥ हा शुकरूपें व्यासतनय[६] ॥ सद्बोधकर्ता सदय ॥ शुकचि[७] आला नसेल कीं ॥ ४८ ॥ त्याविण ऐशी कोठूनि वाणी ॥ ऐसें राव विचारी मनीं ॥ तों तेथें त्याची आली वाहिनी[८] ॥ कीर[२] गुप्त जाहला ॥४९॥ मग त्या सर्व सैन्यासहित ॥ राजेंद्र आला स्वपुराप्रत ॥ परी कीराचें वाक्य स्मरत ॥ न बोले किंचित कोणाशीं

१ उन्हानें. २ कीर पक्षी. ३ अनुपम. ४ राजा. ५ श्लोक. ६ व्यासांचा पुत्र. ७ शुकदेव. ८ सेना.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

॥ ५० ॥ कोणीं कांहीं पुशिलें तथापि ॥ तया उत्तर न दे कदापि ॥ खानपान निद्रादिरूपी ॥ सकळ भोग त्यागिले ॥ ५१ ॥ आणि झाला भ्रमिस्थावाणी ॥ ऐसें पाहूनि पट्टराणी ॥ गुणसुंदरी तयालागुनी ॥ हस्त जोडूनी विनवित ॥ ५२ ॥ म्हणे हो मम प्राणनाथा ॥ आज ही ऐशी काय अवस्था ॥ तुम्हां नसतां कांहीं न्यूनता ॥ आली खिन्नता कोठून ही ॥ ५३ ॥ खानपान सर्व त्यजून ॥ ऐसें कां धरिलेंति मौन ॥ तुमची ही स्थिति विलोकून ॥ मज दारुण दुःख होय ॥ ५४ ॥ तरी उठाउठा हो प्राणेश्वरा ॥ मजवरी आतां दया करा ॥ भोजन सारूनियां सत्वरां ॥ कांहीं बोला मजपाशीं ॥ ५५ ॥ ऐसें तिणें विनविलें बहुत॥परी राव न बोले किंचित ॥ शुकवाक्याचा विचार करित ॥ तैसाचि निवांत बैसला ॥ ५६ ॥ राणीस झालें दुःख अपार ॥ पुढें सुचेना कांहीं विचार ॥ पतीचे चिंतेचें साचार ॥ कारण कांहीं समजेना ॥ ५७ ॥ तेणें बहु तळमळे सती ॥ असो ऐसा तो दृढधन्वा नृपती ॥ विचार करीत असतां पुढती ॥ कांहीं काळ लोटला ॥ ५८ ॥ पुढें एकदां वाल्मीकऋषी ॥ अवचित आला राजगृहासी ॥ जेणें स्वयें मधुरवाचेंसी ॥ रामायण रचियेलें ॥ ५९ ॥ तया दुरुनि पाहतां क्षण ॥ राव उठोन धांवला आपण ॥ भक्तिभावें ऋषीचे चरण ॥ उभयहस्तीं धरियेले ॥ ६० ॥ दंडवत केला नमस्कार ॥ अर्पिले सर्व पूजोपचार ॥ परमासन देऊनि सुंदर ॥ ऋषीश्वर बैसविला ॥ ६१ ॥ विप्रपादक्षा[1]लनजीवन ॥ आनंदें केलें शिरीं धारण ॥ स्वांकीं[2] घेऊनि मुनीचे चरण ॥ स्वकरीं चुरीत हळुहळू ॥ ६२ ॥ शुकवाक्य मनीं स्मरत ॥ मधुरवाणी राजा बोलत ॥ हे भगवन् मुने मी सांप्रत ॥ कृतकृत्य खचित जाहलों ॥ ६३ ॥ माझें जन्म सफळ झालें ॥ सर्वही अर्थ आज लाभले ॥ श्रुतां[3]दिकही आज वहिलें ॥ फळासी आलें साचार ॥ ६४ ॥ जगत्पावनपावन आपण ॥ तयीं मज हें दिधलें दर्शन ॥ तस्मात मी महाभाग्यवान ॥ काय वर्णन करूं आतां ॥ ६५ ॥ मजसम धन्य आज ना कोणी ॥ ऐसी रायाची विनम्रवाणी ॥ ऐकूनियां श्रीवाल्मीकिमुनी ॥ संतोषोनी बोलत ॥ ६६ ॥ राया तूं धन्य खरोखर ॥ माझा उत्तम केलासी आदर ॥ आणि जें बोललासि मधुर ॥ तें तुज योग्यचि असे पां ॥ ६७ ॥ परी चिंतातुर कां असशी ॥ मनोगत सर्व सांग



[1] ब्राह्मणाचे पाय धुतलेलें पाणी ( तीर्थ ). [2] स्वतःचे मांडीवर. [3] कथादिकांचें केलेलें श्रवणही.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

मजसी ॥ जें कांहीं बोलाया इच्छिसी ॥ तेंही बोलें सकळिक ॥ ६८ ॥ ऐशीं मुनीचीं ऐकतां वचनें ॥ राव बोले बहुविनयानें ॥ आपुलिया पदाब्जकृपेनें ॥ मज ना उणें कांहींच ॥ ६९ ॥ सर्व सुख असे परिपूर्ण ॥ परी हृदयीं संशय महान् ॥ शल्यवत् एक उदेला दारुण ॥ तो तूं घालवी सत्वर ॥ ७० ॥ मी एकदां मृगयार्थ ॥ गेलों होतों गहन वनांत ॥ तेथें फिरतां फिरतां अवचित ॥ महत्कासारें[1] देखिलें ॥ ७१ ॥ तयाचें केलें जळ प्राशन ॥ मग विश्रांति घ्यावी म्हणून ॥ तीरीं वटवृक्ष होता महान् ॥ तयाचे छाये बैसलों ॥ ७२ ॥ तंव हृदयानंदकारक[2] ॥ ऐसा पातला कीर एक ॥ बैसोनियां मम सन्मुख ॥ ऐसा श्लोक बोलला ॥ ७३ ॥ विद्यमानातुलसुखमालोक्यातीव भूतले ॥ न चिंतयसि तत्त्वं त्वं तत्कथं पारमेष्यसि ॥ १ ॥ ऐसें शुकाचें ऐकूनि भाषित ॥ मज आश्चर्य झालें बहुत ॥ परी काय बोलला तें हृद्गत ॥ कांहींच नाहीं समजलें ॥ ७४ ॥ आणि मज राज्यसुख अपार ॥ उत्तम पुत्र आहेत चार ॥ पत्नी पतिव्रता सुंदर ॥ ममानुकूल वर्तताहे ॥ ७५ ॥ आणि गजाश्व रथ पदाती ॥ इत्यादि सर्व अतुल संपत्ती ॥ हीं कोणें पुण्यप्रभावें निरुतीं ॥ मज लाभलीं आहेत ॥ ७६ ॥ हें सर्वहि विचार करून ॥ मज सांगावें विस्तारून ॥ आपण सर्वज्ञ ज्ञानघन ॥ संशयछेदन कीजिये ॥ ७७ ॥ ऐसें रायाचें ऐकूनि भाषित ॥ मुनिवर्य प्राणायाम करित ॥ ध्यान लावूनि एक मुहूर्त[3] ॥ विश्व समस्त पाहिलें ॥ ७८ ॥ अंतरीं जाणोनि सर्व वृत्तांत ॥ वाल्मीकि म्हणे भूपतीप्रत ॥ राया तुझें प्राग्जन्मचरित[4] ॥ सांगतों समस्त ऐक पैं ॥ ७९ ॥ अगा तूं पूर्वजन्मीं सुजाण ॥ द्रविडदेशस्थ होतासि ब्राह्मण ॥ तयाचें सुदेव नामाभिधान ॥ सर्वलोकीं विख्यात असे ॥ ८० ॥ तो ताम्रपर्णी तीरीं वसत ॥ वेदाध्ययन करी सतत ॥ सत्यवादी स्वधर्मरत ॥ यथालाभें संतोषी ॥ ८१ ॥ तयाची भार्या सर्वमान्या ॥ गौतमीनामें गौतमकन्या ॥ सद्गुणखाणी जीसम अन्या ॥ जगीं नसे कोणीही ॥ ८२ ॥ ती महासती प्रेमें सतत ॥ भ्रतारासी अनुसरोन वर्तत ॥ जैशी भवानी शंकराप्रत ॥ अनुसरत सर्वदा ॥ ८३ ॥ तये भार्येसह तो ब्राह्मण ॥ करित गृहस्थधर्माचरण ॥ बहुत

१ मोठें सरोवर. २ मनाला आनंद करणारा. ३ दोन घटिका. ४ पूर्वजन्मींचें चरित्र.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

झालें कालक्रमण ॥ परी संतति नाहीं जाहली ॥ ८४ ॥ तेणें योगें तो अति दुःखित ॥ रात्रंदिन चरफडत ॥ एकदां भार्या पाद सेवित ॥ बैसली होती आनंदें ॥ ८५ ॥ तैं तो सुदेव गहिंवरोनी ॥ तियेसी म्हणे गे प्रिय-करिणी ॥ संसारामाजीं पुत्राहुनी ॥ अधिक सुख अन्य नसे ॥ ८६ ॥ तपोदानादि पुण्यें सकळिक ॥ लोकांतरीं देताति सुख ॥ इहपरलोकीं सुखदायक ॥ सुपुत्रचि एक असे पैं ॥ ८७ ॥ तरी तो तैसा सुखद[१] सुत ॥ मज झाला नाहीं येथ ॥ यास्तव माझें सर्व जीवित ॥ निष्फळ असे साचार ॥ ८८ ॥ अगे म्यां पुत्रा नाहीं लालिलें[२] ॥ वेदार्थतत्व नाहीं बोधिलें ॥ तन्मुखहि नाहीं देखिलें ॥ व्यर्थचि गेलें मम जन्म ॥ ८९ ॥ मी केवळ दैवहीन ॥ जळो जळो हें उद्विग्नपण ॥ आतां व्यर्थ काय वांचून ॥ शीघ्र मरण मज येवो ॥ ९० ॥ ऐकूनि गौतमी सुंदरी ॥ अत्यंत खिन्न झाली अंतरीं ॥ पतीचे समाधाना सत्वरीं ॥ सौम्यवचनें बोलत ॥ ९१ ॥ म्हणे नका नका हो प्राणनाथा ॥ ऐसें अभद्र न बोला आतां ॥ तुम्हांऐसे ज्ञाते तत्वतां ॥ मोह न पावत कदापि ॥ ९२ ॥ तुम्ही सत्यधर्मपरायण ॥ स्वर्गहि जिंकिलाति संपूर्ण ॥ तुम्हां ज्ञानियां पुत्राचेन ॥ सुखाप्ति कैसी होणार ॥ ९३ ॥ पुत्राचेनि दुःख अपार ॥ पूर्वीं चित्रकेतु राजेश्वर ॥ पुत्रशोकें झाला आतुर ॥ नारदें येऊनि उद्धरिला ॥ ९४ ॥ तैसाचि अंगराजा महान ॥ तया दुःपुत्र झाला वेन[३] ॥ तयाचे त्रासें तो रात्रीं उठोन ॥ गेला पळून वनासी ॥ ९५ ॥ ऐसे आजवर ह्या जगांत ॥ पुत्रें दुःखित झाले बहुत ॥ तैसा तुम्हांहि कदाचित ॥ प्रसंग प्राप्त होईल पैं ॥ ९६ ॥ यास्तव आपणां पुत्र नाहीं ॥ हें मज बरें वाटतें पाहीं ॥ तथापि जर कीं आपल्या हृदयीं ॥ सत्पुत्रलालसा[४] असेल ॥ ९७ ॥ तरी सर्वार्थदात्या श्रीहरीसी ॥ आराधिजे अनन्यभावेंसीं ॥ जयाचे आराधनें कर्दमासी ॥ कपिलपुत्र जाहला ॥ ९८ ॥ तें प्रियेचें ऐकूनि वचन ॥ विप्र पावला समाधान ॥ हरीच्या आराध-नेलागुन ॥ निश्चय केला तत्काळ ॥ ९९ ॥ आणि भार्येसह ताम्रपर्णींत ॥ स्नान सारिलें यथास्थित ॥ मग जाऊनि विरजवनांत ॥ तपाचरणीं बैसला ॥ १०० ॥ अनन्यभावें श्रीहरीसी ॥ अंतरीं ध्यात अहर्निशीं ॥



१ सुख देणारा पुत्र. २ खेळविलें. ३ वेन नामक. ४ चांगल्या पुत्राची इच्छा.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

शुष्कपर्णजलाहारासी ॥ पांचवे पांचवे दिनीं करी ॥ १ ॥ ऐसें चतुःसहस्र संवत्सर ॥ तप आचरिलें निरं-
तर ॥ तेणें योगें त्रैलोक्य समग्र ॥ थर्थर कांपूं लागलें ॥ २ ॥ तें अत्युग्र तप विलोकून ॥ भक्तवत्सल हरि
झाला प्रसन्न ॥ गरुडावरी आरूढोन ॥ तेथें येऊन प्रगटला ॥ ३ ॥ चतुर्भुज घनसांवळा ॥ प्रसन्न मुख पुढें
ठाकला ॥ ऐसें पाहूनि तये द्विजाला ॥ आनंद झाला अत्यंत ॥ ४ ॥ करूनि साष्टांग नमस्कार ॥ विप्र स्तुती
करित अपार ॥ म्हणे हे प्रभु जगदोद्धार ॥ हेंचि आतां विनवितों ॥ ५ ॥ तूं भक्त वत्सल दीनोद्धरण ॥ शरणां-
गताचें करिसी अवन[1] ॥ ऐसें बोलती त्वद्भक्तजन ॥ म्हणोन शरण आलों असें ॥ ६ ॥ तरी दयाळा कृपा करीं ॥
रक्षीं रक्षीं मज सत्वरीं ॥ बुडतों दुःखसागरीं ॥ शीघ्र उद्धरीं दयार्णवा ॥ ७ ॥ ऐसें विनवूनियां बहुत ॥
सुदेव द्विज स्वस्त्रीसहित ॥ भगवंतापुढें जोडूनि हात ॥ उभा निवांत राहिला ॥ ८ ॥ एवं श्रीवाल्मीकिमुनीनीं ॥
कथिलें दृढधन्व्यालागुनी ॥ ऐसें श्रीनारायणमुनी ॥ नारदासीं कथिते जाहले ॥ ९ ॥ इति श्रीअधिकमासमा-
हात्म्यसार ॥ बृहन्नारदीयपद्माधार ॥ सज्जन श्रोते ऐकोत चतुर ॥ षष्ठाध्याय गोड हा ॥ ११० ॥ ॥ छ ॥ ॥

॥ इति षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥

---

१ रक्षण.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

॥ श्रीगणेशाय नमः ॥ पूर्वाध्यायांतीं सुदेव ब्राह्मण ॥ श्रीहरीची स्तुति करून ॥ उभा राहिला ह
ऐसें वर्णन जाहलें ॥ १ ॥ पुढें कथा वर्तली कैसी ॥ सांगतों ऐका एकचित्तेंसीं ॥ आदिकवि श्रीवाल्मि
दृढधन्व्यासी सांगत ॥ २ ॥ राया तें विप्राचें स्तुतिवचन ॥ ऐकूनि तोषला भगवान ॥ मेघगंभीरवाचें
तंयाप्रती बोलत ॥ ३ ॥ अगा सुदेवा त्वां उत्तम ॥ तप संपादिलें अप्रतिम ॥ पूर्वीं एतादृश महत्कर्म ॥
कोणींही ॥ ४ ॥ ह्या तुझ्या अत्युग्रतपेंसी ॥ प्रसन्न झालों असें तुजसी ॥ तरी तूं जें इच्छित असशी ॥ त
सांग मज ॥ ५ ॥ मागसील तें तुज देऊन ॥ सर्व मनोरथ पुरवीन ॥ वत्सा तूं महाभाग्यवान ॥ म्हणोन
दीधलें ॥ ६ ॥ ऐसी हरीची ऐकूनि वाणी ॥ सुदेव म्हणे गा रमाजांनी ॥ दयासागर कैवल्यंदानी ॥ जर
प्रसन्न झालास ॥ ७ ॥ तरी तूं मज सत्पुत्र देईं ॥ राज्यादिक अन्य नको कांहीं ॥ पुत्रेंविण शून्य सर्वही ॥ ग
नाहीं मज रुचत ॥ ८ ॥ ऐसें विप्राचें ऐकूनि भाषण ॥ श्रीहरि बोले तयालागुन ॥ अगा वत्सा तंनयाविण
मागून पाहिजे तें ॥ ९ ॥ पुत्रावांचून जें कां आणिकं ॥ अदेय तेंही देईन सकळिक ॥ विधात्रें तुजला पुत्रसु
निर्मियेलें नसेचि ॥ १० ॥ तव भाळींचीं अक्षरें समस्त ॥ वाचून पाहिलीं तों तयांत ॥ तुज पुत्रसुख सप्तज
नाहीं ऐसें स्पष्ट असे ॥ ११ ॥ यास्तव तूं न मागें नंदनँ ॥ तुज पुत्रसुख नाहीं जाण ॥ ऐसें हरीचें वज्रास
निष्ठुर वचन ऐकूनियां ॥ १२ ॥ तो सुदेव द्विज तत्क्षणीं ॥ विकळ झाला हृदय फुटोनी ॥ विच्छिन्नमूलद्रुमाव
पडला धरणीं मूर्च्छित ॥ १३ ॥ ती पतीची अवस्था पाहून ॥ गौतमी दुःखें करित रुदन ॥ मागुती किंचि
धरून ॥ पतीसन्निध बोलत ॥१४॥ उठा उठा हो प्राणेश्वरा ॥ व्यर्थ नका दुखवूं स्वांतंरा ॥ मम वाक्याचें
करा ॥ पूर्वींच म्यां कथिलेंसे ॥ १५ ॥ जें जें कपाळीं लिहिलें विधातें ॥ तेंचि सुखासुख प्राप्त होतें ।
भोगित पूर्वार्जितातें ॥ हरि तेथें करील काय ॥ १६ ॥ मुंमुर्षूसी औषध देतां ॥ जेंवीं निष्फळ होय

१ सुदेव ब्राह्मणाप्रत. २ हे लक्ष्मीपते ( विष्णो ) ! ३ मोक्षदात्या. ४ पुत्रावांचून. ५ दुसरें. ६ ब्रह्मदेवानें. ७
तोडलेल्या वृक्षाप्रमाणें. ९ पुन्हां. १० आपल्या अंतःकरणास. ११ मरणाऱ्यास.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तेवींच अभाग्याचे सर्वथा ॥ उद्योग निष्फळ होतात ॥ १७ ॥ जयाचें दैव अनुकूळ नाहीं ॥ तयाचें सर्वही ॥ यज्ञतपदानादिकांहूनही ॥ श्रीहरिसेवा श्रेष्ठ असे ॥ १८ ॥ ऐसें बोलती देव सकळ ॥ परी दैव प्रबळ ॥ सूर्यापुढें खद्योत[1] विकळ ॥ तैसी सेवा दैवापुढें ॥ १९ ॥ तस्मात् सर्वत्रींच्या विश्वासा उठाहो प्राणेशा ॥ एके दैवींच ठेवा भरंवसा ॥ हरीचें प्रयोजन काय ॥ २० ॥ ऐसें तीव्रशोकसंयुक्त ॥ ऐकूनि भाषित ॥ वैनतेय[2] क्षोभे कांपत ॥ विष्णूसी बोलता जाहला ॥ २१ ॥ देवा ही गौतमी अति शोकसागरीं झाली निमग्न ॥ तैसाचि हा तापसी ब्राह्मण ॥ शोकें रडत पडलासे ॥ २२ ॥ ह्यांसी नाहीं रक्षिता ॥ यांची असह्य दुःखावस्था ॥ तूं प्रत्यक्ष पाहात असतां ॥ कैसा स्वस्थ राहिलासी ॥ २३ ॥ तूं दयासागर ॥ स्वजनालागीं भयंकर ॥ भक्तदुःखसहिष्णु[3] ईश्वर ॥ ऐसा साचार असोनियां ॥ २४ ॥ अ दया काय झाली ॥ ब्रह्मण्यताहि[4] कोठें लोपली ॥ दीनबंधुता कैसी संपली ॥ क्रूरता धरली कोठून ॥ २ सायुज्यादि चतुर्विध मुक्ती ॥ त्वद्भक्तांचे करतळीं वसती ॥ तथापि त्यागूनि तव भक्ती ॥ मुक्तीस इच्छित न ॥ २६ ॥ तव भक्तांचे अग्रभागीं ॥ अष्टमहासिद्धि येऊनि वेगीं ॥ किंकरीपरी[5] सेवेलागीं ॥ तत्पर राहातात ॥ २७ ॥ ऐसें तव भक्तीचें माहात्म्य ॥ सर्वविश्रुत असे उत्तम ॥ तरी ह्या विप्राचा पुत्रका पुरवाया श्रम तुज काय ॥ २८ ॥ पुत्रावांचून सर्वहि यासी ॥ द्यावया उद्युक्त झालासी ॥ तरी गजेंद्र पुरुषासी ॥ अंकुश देण्या श्रम काय ॥ २९ ॥ जरी तूं ह्या विप्राच्या कामा ॥ नाहीं पुरविलें सर्वोत्त तरी इतःपर त्वत्पादपद्मा ॥ कोणीच नाहीं सेविणार ॥ ३० ॥ अदृष्टीं असेल तेंचि मिळेल ॥ ऐसें जरी होईल ॥ तरी मग तुझी भक्ति सकळ ॥ लया जाईल निश्चयें ॥ ३१ ॥ कर्तुमकर्तुं तूं समर्थ ॥ ऐसें सर्व विश्रुत ॥ परी ह्यासी न देसी सुत ॥ तरी तें आज नष्टेल पैं ॥ ३२ ॥ यास्तव देवा ऐसें न करीं ॥ य

१ काजवा. २ गरुड. ३ भक्तांचें दुःख सहन न करणारा. ४ ब्राह्मणाविषयीं दयालुता. ५ दासीप्रमाणें. ७ पुत्रेच्छा. ८ मनोरथास. ९ तुझ्या चरणकमलास. १० प्रसिद्ध.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

देईं सत्वरीं ॥ आजपर्यंत नानाप्रकारीं ॥ भक्तकामना पुरविल्यास ॥ ३३ ॥ गजेंद्रें करितां तुझा धा
तत्काळ रक्षिलें देवा ॥ अनन्यशरण होतांचि ध्रुवा ॥ अक्षय पद दीधलेंस ॥ ३४ ॥ तूं भक्तेच्छापूरक
ऐशी ब्रह्मांडीं गाजे कीर्ति ॥ म्हणोनि पुत्रार्थी हीं दंपती ॥ तुजला शरण पातलीं ॥ ३५ ॥ आतां उपे
सील तरी ॥ तव अपकीर्ति होईल पुरी ॥ ऐशी वैनतेयाची वैखरी ॥ ऐकूनि हरि बोलत ॥ ३६ ॥ ब
विनतानंदना ॥ तुज अंतरीं आली करुणा ॥ तरी ममाज्ञें ह्या ब्राह्मणा ॥ सत्वर देईं पुत्र एक ॥ ३७
हरीचें स्वानुकूल वचन ॥ ऐकूनि हर्षला पन्नगाशन ॥ सवेंचि तया ब्राह्मणालागुन ॥ वरदान देता जाह
॥ ३८ ॥ म्हणे द्विजेंद्रा सप्तजन्मवरी ॥ तुज पुत्रसुख ना निर्धारीं ॥ ऐसें जें कां बोलिला हरी ॥ तें सर्वहि
असे ॥ ३९ ॥ तथापि हरीनें मजलागुन ॥ आज्ञापिलें असे म्हणोन ॥ तुजकरितां कृपा करून ॥ एक
देतों मी ॥ ४० ॥ मदंशसंभूत ऐसा त्वरित ॥ तुजला होईल एक सुत ॥ तयाचेनि तूं गौतमीसहित ॥ सुपु
होशील पैं ॥ ४१ ॥ परी तया पुत्रापासून ॥ तुम्हां दुःख होईल दारुण ॥ तथापि चित्तीं विचार करून ॥
भजन न सोडावें ॥ ४२ ॥ श्रीहरिचरणीं जडली मती ॥ म्हणोन धन्य आहेस जगतीं ॥ निष्काम किंवा
महि भक्ति ॥ हरीसी अति प्रिय असे ॥ ४३ ॥ पांचभौतिक सर्व शरीर ॥ अळवावरचें जैसें नीर ॥ कीं
बुडबुदवत् साचार ॥ क्षणभंगुर असे पैं ॥ ४४ ॥ त्याचा न धरितां अभिमान ॥ अंतरीं चिंतीं हरीचे चर
तो नर जगीं सर्वमान्य ॥ आणि धन्यहि होय साचार ॥ ४५ ॥ दुस्तर भवसागरांतूनी ॥ तारील ऐ
त्रिभुवनीं ॥ शोधितां एक हरिवांचुनी ॥ इतर नाहीं कोणीच ॥ ४६ ॥ हरीच्या कृपालेशेंकरून ॥
पुत्र दीधला जाण ॥ आतां करीत हरिचिंतन ॥ सर्वदा सुखें वर्ते तूं ॥ ४७ ॥ आणि प्रपंचामाजीं सर्व
उदारतेनें राहूनि केवळ ॥ संसारजन्मफळ सकळ ॥ मिळेल तैसें भोगीं तूं ॥ ४८ ॥ असो ऐसा गरुड

१ नवरा व स्त्री. २ गरुडाची. ३ वाणी. ४ पक्ष्यांचा राजा. ५ विनतेच्या पुत्रा गरुडा. ६ सर्पास खाणारा गरुड. ७
उत्पन्न. ८ पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश ह्या पंचमहाभूतांनीं झालेलें. ९ पाण्यावरच्या बुडबुड्याप्रमाणें. १० क्षणांत ना

७

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

वर देऊनि सुदेवासी ॥ मग तो भगवान् वैकुंठासी ॥ गमन करिता जाहला ॥ ४९ ॥ आणि सुदेवा
हित ॥ इष्ट वर लाभतांचि त्वरित ॥ स्वगृहा जाऊनि पूर्ववत् ॥ गार्हस्थ्यं[1] भोगित आनंदें ॥ ५० ॥ पु
कित्येक दिन ॥ विप्रपत्नी झाली गर्भिण ॥ नवमास होतांचि पूर्ण ॥ पुत्ररत्न प्रसवली ॥ ५१ ॥ सुलक्ष
सुरेख ॥ ऐसें देखतां पुत्रमुख ॥ गौतमीस झाला हरिख ॥ प्रसूतिदुःख लोपलें ॥ ५२ ॥ सुदेवविप्रहि आन
द्विजसमूह पाचारिला ॥ जातकर्मसंस्कार वहिला ॥ संपादिला यथाविधि ॥ ५३ ॥ सकळ द्विजवरांका
यथाशक्ति दिधलीं दानें ॥ याचकजनां बहु सन्मानें ॥ वस्त्रें पात्रें अर्पिलीं ॥ ५४ ॥ ज्योतिर्वेत्त्या[2] ब्राह्मणांक
जातक[3] वर्तविलें तत्क्षण ॥ शुकदेव ऐसें नामाभिधान ॥ पुत्रालागुन ठेविलें ॥ ५५ ॥ पुढें तो सुदेवाचा कु
दिवसेंदिवस वाढे सुंदर ॥ शुक्लपक्षींचा रोहिणीवर[4] ॥ जैसा वाढत अनुदिनीं ॥ ५६ ॥ पक्ष मास ऋतु अय
जैसें होय कालक्रमण ॥ तैसे तैसे सद्गुणगण ॥ अंगीं भरत बाळकाचे ॥ ५७ ॥ बाळक्रीडा अनेकरीतीं ॥ 
असे दिवसारातीं ॥ पाहूनियां पित्याचे चित्तीं ॥ आनंद अती होतसे ॥ ५८ ॥ ऐशीं वर्षें लोटलीं सा
आठवें वर्ष होतां प्राप्त ॥ सुदेव सुताच्या उपनयनार्थ ॥ हर्षें उद्युक्त जाहला ॥ ५९ ॥ द्विजवरांसी पाचारू
आधीं केलें पुण्याहवाचन ॥ सुमुहूर्तीं यथाविधान ॥ मौंजीबंधन संपादिलें ॥ ६० ॥ गायत्रीमंत्र उपदेशिल
शुकदेव ब्रह्मचारी झाला ॥ सूर्यापरि तेजें आगळा ॥ शोभूं लागला तत्काळ ॥ ६१ ॥ मग मातापित
वंदून ॥ आरंभिलें वेदाध्ययन ॥ स्वबुद्धीनें गुरुलागुन ॥ तोषवीत सर्वदा ॥ ६२ ॥ अरे तो अष्टवर्षांचा कुम
परी केवळ बुद्धीचा सागर ॥ गुरुनें कथितां एकवार ॥ पाठ होय तयासी ॥ ६३ ॥ ऐसें करूनि वेदाध्य
शास्त्रेंहि शिकला संपूर्ण ॥ स्वपुत्र झाला विद्वान ॥ म्हणोन सुदेव आनंदला ॥ ६४ ॥ आणि आप
मानित ॥ सुखें वर्ततां पुत्रसहित ॥ एकदां तयाचे सदनाप्रत[5] ॥ देवलमुनि पातला ॥ ६५ ॥ तया पाह
तत्क्षण ॥ प्रेमें केलें साष्टांगनमन ॥ आसनपाद्यादि समर्पून ॥ यथाविधि पूजिलें ॥ ६६ ॥ तों

१ गृहस्थाश्रमसंबंधीं सुख. २ ज्योतिषशास्त्र जाणणाऱ्या. ३ जन्मपत्रिका. ४ चंद्र. ५ मुं...करितां. ६ गृहाप्रत.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

ब्रह्मचारी ॥ शुकदेव तेथें आला सत्वरी ॥ देवलमुनीचे चरणांवरी ॥ प्रेमें मस्तक ठेविले
सुंदर कुमारा पाहुनी ॥ मुनि बोलत सुदेवालागुनी ॥ बा द्विजेंद्रा तूं त्रिभुवनीं ॥ धन्य ध
अरे हा दुर्लभ गुणसागर ॥ तुज लाभला पुत्र सुंदर ॥ तस्मात् भगवान् लक्ष्मीवर ॥
लागीं ॥ ६९ ॥ ह्या तव पुत्रासमान जगांत ॥ वेदाध्ययन कर्ता विनीत[1] ॥ बुद्धिमान् बोलका ए
कोठेंहि नाहीं देखिला ॥ ७० ॥ ऐसें बोलूनि ते समयीं ॥ शुकासी म्हणे रे बाळा येईं ॥ तव हस्तीं हें
काई ॥ दिसत आहे पाहातों ॥ ७१ ॥ रेखांकित हें सुंदर छत्र ॥ दोन चामरें[2] विलसत विचित्र ॥ वर्तुल कम
सहस्रपत्र ॥ हस्तीं पवित्र शोभताहे ॥ ७२ ॥ अंगुष्ठीं सुंदर यवाकृती ॥ आजानुलंबित[3] हात शोभती ॥ आकर्ण[4]
नयन विराजती ॥ बुबुळें तळपती पिंगट ॥ ७३ ॥ अतिगोंडस सर्व शरीर ॥ सस्मित[5] वदन दिसतें मधुर ॥
वलित्रयानें भूषित उदर ॥ भाग्यलक्षणें किती सांगूं ॥ ७४ ॥ ऐसें बोलूनि कुमाराप्रत ॥ पुनश्च बोले विप्रा-
प्रत ॥ अगा सुदेवा हा तव सुत ॥ गुणसागर केवळ ॥ ७५ ॥ ह्याचीं लक्षणें कैशीं देख ॥ शंखा ऐसा कंठ
सुरेख ॥ स्निग्ध कुरळ केश सकळिक ॥ वक्षःस्थळ उंच बहु ॥ ७६ ॥ पृथु[6] ग्रीवँ[7] सुहास्यवदन ॥ वृषस्कंधवत्[8]
स्कंध[9] महान ॥ दोन्ही कर्ण समसमान ॥ आकर्णनयन सुरेख ॥ ७७ ॥ हा सर्वलक्षणीं संपन्न कुमार ॥ सौभा-
ग्याचा होय सागर ॥ परि एकच दोष आहे थोर ॥ तेणें समग्र व्यर्थ केलें ॥ ७८ ॥ ऐसें बोलूनि शिर
हालवित ॥ सुस्कारा टाकूनि मुनि म्हणत ॥ आदीं आयुष्य पाहूनि यथार्थ ॥ मग लक्षणें सांगावीं ॥ ७९ ॥
आयुष्यहीन कुमाराचीं ॥ लक्षणें काय करायाचीं ॥ बुबुळेंविण नेत्रगोलांची ॥ गरज काय साचार ॥ ८० ॥
सुदेवा हा तव नंदन ॥ बारावे वर्षीं जळीं बुडोन ॥ अवचित पावेल पैं मरण ॥ परी तूं शोक करूं नको
॥ ८१ ॥ अवश्य होणारें तें पाहीं ॥ आपेंआप होतें सर्वही ॥ तयालागीं प्रतिकार नाहीं ॥ मुमूर्षूसी क

१ नम्र नीतिमान्. २ चवऱ्या. ३ गुडघ्यांपर्यंत लोंबणारे. ४ कानापर्यंत विशाळ नेत्र. ५ किंचित् हास्यानें युक्त. ६
७ मान. ८ बैलाच्या खांद्याप्रमाणें. ९ खांदा.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

औषध ॥ ८२ ॥ ऐसें बोलूनि देवलऋषी ॥ निघोनि गेला ब्रह्मलोकासी ॥ गौतमीसह तो द्विज ता
दुःखें धरणीसी पडियेला ॥ ८३ ॥ देवलाचें वचन स्मरत ॥ भूमीसी लोळे विलाप करित ॥ कांहीं वेळें गो
त्यांत ॥ उठली धैर्य धरूनियां ॥ ८४ ॥ स्वांकांवरी घेतला नंदन ॥ प्रेमें चुंबिलें तयाचें वदन ॥ तदनं
हस्त जोडून ॥ पतीलागून विनवित ॥ ८५ ॥ म्हणे हो द्विजेंद्रा प्राणनाथा ॥ धैर्य धरा उठा समर्था ॥ पुढें
घडोन येणाऱ्या अर्था ॥ भिऊं नये कदापि ॥ ८६ ॥ न होणारें तें कदाही ॥ जगत्रयीं होणार नाहीं ॥
अवश्य होणारें तेंचि पाहीं ॥ घडोन येईल निश्चयें ॥ ८७ ॥ शंकरादिक महादेव ॥ तेहि दुःख पावले सर्व ॥
असुरेश्वर बलीराव ॥ तोहि बंधन पावला ॥ ८८ ॥ हिरण्याक्ष पावला मरण ॥ वृत्रासुराचें झालें निधन ॥
कार्तवीर्य आणि रावण ॥ तेहि शिरच्छेद पावले ॥ ८९ ॥ तरी अवश्यभावि तें यथार्थ ॥ घडोनि येतेंचि पैं
समस्त ॥ यास्तव आपण उठावें त्वरित ॥ श्रीहरिलागुन भजावें ॥ ९० ॥ एवंप्रकारें सुदेवपत्नी ॥ कथिती
झाली पतीलागुनी ॥ ऐसें श्रीमद्वाल्मीकिमुनी ॥ रायासी कथिता जाहला ॥ ९१ ॥ इति श्रीअधिकमासमाहा-
त्म्यसार ॥ बृहन्नारदीयपद्माधार ॥ सज्जन श्रोते ऐकोत चतुर ॥ सप्तमाध्याय गोड हा ॥ ९२ ॥

॥ इति सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥

१ स्वतःच्या मांडीवर.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

॥ श्रीगणेशाय नमः ॥ ॥ सप्तमाध्यायाचिये अंतीं ॥ सुदेवपत्नी गौतमी सती[1] ॥ शोकग्रस्त सुदेवाप्रती ॥ बोध करिती जाहली ॥ १ ॥ पुढें काय वर्तलें कौतुक ॥ तें वर्णितों ऐका सकळिक ॥ आदिकवि मुनि वाल्मीक ॥ दृढधन्व्यासी सांगती ॥ २ ॥ राजेश्वरा तें सुधेसमान ॥ गौतमीचें ऐकूनि वचन ॥ सुदेव पावला समाधान ॥ शोक संपूर्ण टाकिला ॥ ३ ॥ धैर्य धरूनि उठला त्वरित ॥ श्रीहरिवरी ठेविलें चित्त ॥ अवश्यंभावि[2] तें समस्त ॥ तैसेंचि खचित होईल पैं ॥ ४ ॥ होणारें तें न चुके कांहीं ॥ ऐसा निश्चय केला हृदयीं ॥ मग पूर्ववत् कार्यें सर्वही ॥ सदारें[3] करूं लागला ॥ ५ ॥ ऐसे लोटतां कांहीं दिन ॥ एकदां तो सुदेव ब्राह्मण ॥ समित्कुशाद्याहरणा[4]-लागुन ॥ वनासी जाता जाहला ॥ ६ ॥ तेच दिनीं तयाचा नंदन[5] ॥ जलक्रीडार्थ गेला आपण ॥ सवें घेतले वयस्यगण[6] ॥ वापिकेमाजीं[7] प्रवेशला ॥ ७ ॥ ग्रीष्मकाळींचा ऊष्मा अती ॥ परमानंदें क्रीडा करिती ॥ परस्परांच्या अंगांवरुती ॥ जळ उडविती एकसरें ॥ ८ ॥ एकमेकांचे हस्त धरूनी ॥ मज्जन करिती तये जीवनीं ॥ मत्स्यमगरांपरि पोहणी ॥ प्रतिक्षणीं घालित ॥ ९ ॥ एक पुढें पोहत पळत ॥ दुजे तयां धरूं धांवत ॥ तंव तिजीं बुडोन अकस्मात ॥ पुढच्यास खालीं ओढावें ॥ १० ॥ वारंवार येऊनि तीरासी ॥ लोटूनि द्यावें एकमेकांसी ॥ मी मी म्हणोनी कुदत त्वरेंसी ॥ अंत घेऊन वर येत ॥ ११ ॥ पुनः पुनः जळीं बुडोन ॥ परस्परां काढिती शोधून ॥ अगाध नीरीं स्थिर राहून ॥ एकमेकां मर्दित ॥ १२ ॥ मार चुकवाया बुडोनि पळती ॥ एक तळीं जाऊनि लपती ॥ एक तीरासी अवलंबिती ॥ आनंद चित्तीं न समाये ॥ १३ ॥ ऐसें क्रीडती मिळोनि मित्र ॥ प्रारब्ध वोढवलें विचित्र ॥ सुदेव द्विजाचा तो पुत्र ॥ शिथिलगात्र जाहला ॥ १४ ॥ मित्रवर्गाचे भयें तत्क्षण ॥ तया वंचूनि पळावें म्हणून ॥ आपुला श्वास निरोधून ॥ अगाधनीरीं प्रवेशला ॥ १५ ॥ निमिषामाजीं गेला तळीं ॥ तेथें सर्व शक्ति लोपली ॥ सकळ अंगें विकळ झालीं ॥ पुढें उपाय चालेना ॥ १६ ॥ उदरामाजीं शिरलें पाणी ॥

---

१ पतिव्रता. २ अवश्य होणारें. ३ स्त्रीसहित. ४ समिधा, दर्भ इत्यादि आणण्याकरितां. ५ पुत्र. ६ बरोबरीच्या संवगड्यांचे समुदाय. ७ पुष्करणींत.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तत्काळ प्राण गेला निघोनी ॥ कलेवर जड होउनी ॥ तळींच लागोन राहिलें ॥ १७ ॥ बहुत वेळ झाला तरी ॥ शुकदेव आला नाहीं वरी ॥ ऐसें पाहूनि ते अवसरीं ॥ वयस्य अंतरीं घाबरले ॥ १८ ॥ आणि महाशब्दें आक्रोशत ॥ धांवत आले गौतमीप्रत ॥ म्हणती गे माये तव सुत ॥ वापिकाजळांत बुडाला ॥ १९ ॥ ती वज्राऐसी कठोर वाणी ॥ कर्णामाजीं पडतां क्षणीं ॥ हा हा पुत्रा म्हणोनि ब्राह्मणी ॥ निश्चेष्ट पडली धरणीस ॥ २० ॥ तितुक्यांतचि सुदेव ब्राह्मण ॥ स्वाश्रमा आला वनांतून ॥ पुत्राचें ऐकूनियां मरण ॥ मरणोन्मुख जाहला ॥ ॥ २१ ॥ विच्छिन्नमूलद्रुमापरी ॥ अवचित पडला भूमीवरी ॥ पुनश्च मूर्च्छा सांवरूनि सत्वरी ॥ दंपती उठलीं उभयतां ॥ २२ ॥ पुत्रा पुत्रा हांक फोडित ॥ धांवत गेलीं वापिकेप्रत ॥ तंव पुत्राचें फुगोनि प्रेत ॥ तरंगत वर आलें ॥ २३ ॥ तयासी लौगवेगें काढुनी ॥ आलिंगिलें घट्ट धरोनी ॥ नंतर स्वांकावरी घेउनी ॥ मुख चुंबित पुनः पुनः ॥ २४ ॥ हस्तें कुर्वाळीत वदन ॥ वारंवार पाहती न्याहाळून ॥ रडतां रडतां कंठ दाटून ॥ सुदेव वचन बोलत ॥ २५ ॥ म्हणे गा वत्सा तान्हया बाळा ॥ सत्वर ऊठ ऊठ वेल्हाळा ॥ मजशीं बोलूनि शुभबोला ॥ दुःख निरसीं सकळिक ॥ २६ ॥ नेत्र उघडोनियां मज पाहीं ॥ मनालागीं आनंद देईं ॥ तुजविण आम्ही उभयतांही ॥ परदेशी आतां जाहलों ॥२७॥ आम्हां वृद्धांसी टाकूनि जाणें ॥ योग्य नव्हे तुजकारणें ॥ तुजवांचून आमचें जिणें ॥ व्यर्थ जाण गुणवंता ॥ २८ ॥ बा हे तुझे मित्र समस्त ॥ पाचारिती अभ्यासार्थ ॥ उपाध्यायहि अध्यापनार्थ ॥ हांक मारितो पाहें हा ॥ २९ ॥ तूं सर्वगुणनिधान बाळ ॥ आतां व्यर्थ न दवडीं काळ ॥ निजून झाली वाढ वेळ ॥ ऊठ ऊठ सत्वरी ॥ ३० ॥ तुज टाकूनि मी जात नाहीं ॥ आम्हां गृहाचें प्रयोजन काई ॥ तुजविण आतां गृह सर्वही ॥ शून्य वनापरि झालें ॥ ३१ ॥ वनींहि मी न करी गमन ॥ तयाचें काय प्रयोजन ॥ तुजविण आतां आम्हांलागुन ॥ प्रिय नाहीं कांहींच ॥ ३२ ॥ आजपर्यंत म्यां कदाही ॥ निंद्य कर्म नाचरिलें कांहीं ॥

१ मित्र. २ मूळ तुटलेल्या वृक्षाप्रमाणें. ३ स्त्री व पति ( सुदेव व गौतमी ). ४ सत्वर. ५ गुरु. ६ शिकविण्याकरितां.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

ब्रह्महत्या महापापही ॥ केलें नसे साचार ॥ ३३ ॥ ऐसें असतां माझा नंदनं ॥ आज कां हा पावला निधनं ॥ कोणत्या कर्मविपाकाचेन ॥ दुःख दारुण पातलें ॥ ३४ ॥ अहो विधात्यां हें काय केलें ॥ मृतपुत्रधन कोठें नेलें ॥ यार्णे तुजला मोठें चांगलें ॥ फळ मिळालें काय सांगें ॥ ३५ ॥ अरे मी वृद्ध अतिदीन ॥ माझा एकुलता एकचि नयन ॥ तोहि त्वां बळेंचि आकर्षून ॥ नाहींसा केला निर्दया ॥ ३६ ॥ आम्ही दंपती अति निर्धन ॥ आमुचा बाळ तोचि एक धन ॥ तया हरितां तुजलागुन ॥ लज्जा कैसी वाटेना ॥ ३७ ॥ तूं सर्वत्र असोनि सदय ॥ मजवर कां झालासि निर्दय ॥ विपरीत माझें भाँगधेय ॥ म्हणोन ऐसा वर्तसी कीं ॥ ३८ ॥ आतां माझे बाळा-लागुन ॥ शोधीत हिंडूं कोठें म्हणून ॥ तान्ह्या तुझें चारुलोचन ॥ वदन कोठें दिसेलरे ॥ ३९ ॥ पर्जन्यापासूनि जळ मिळतें ॥ भूमी प्रसवते धान्यातें ॥ पर्वत नाना रत्नजातीतें ॥ सागरीं मोत्यें सांपडतीं ॥ ४० ॥ परी मृत-पुत्र मिळेल जेथ ॥ ऐसें स्थान नाहींच दिसत ॥ पुत्रावाणी दुर्लभ वस्त ॥ ब्रह्मांडीं नसे कांहींही ॥ ४१ ॥ ज्याचें शरीर आलिंगून ॥ हृद्गत ताप जाईल पूर्ण ॥ तये माझे बाळाचें वदन ॥ मजला कोठें दिसेल ॥ ४२ ॥ बा वत्सा तान्हया दया करीं ॥ एकवार कांहीं बोल सत्वरीं ॥ ही तव माता कुररींपरी ॥ अति विलाप करितसे ॥ ४३ ॥ इयेसी पाहूनि वेल्हाळा ॥ दया येईना कैसी तुजला ॥ न कथितां मातापित्यांला ॥ कधींहि कोठें न गेलासी ॥ ॥ ४४ ॥ आजि तूं आम्हां पुसिल्याविण ॥ कोठें केलेंसि दीर्घप्रयाण ॥ आतां मधुर वेदाध्ययन ॥ श्रवण करूं कोणाचें ॥ ४५ ॥ वत्सा मी निष्ठुर दारुण ॥ तुजलागीं स्मरत असून ॥ माझें हृदय कठिण म्हणोन ॥ फुटोन प्राण जाईना ॥ ४६ ॥ धन्यधन्य तो दशरथराव ॥ वनासी जातां श्रीराघव ॥ जेणें आपुलें त्यागूनि वैभव ॥ प्राणहि तत्काळ सोडिला ॥ ४७ ॥ तयाचें किती धन्यपण ॥ धिक्कार असो मजलागुन ॥ प्रत्यक्ष पाहूनि सुताचें मरण ॥ जो मी अद्यापि वांचलों ॥ ४८ ॥ मी दुर्भागी हीन केवळ ॥ मज भाजितो शोकानळं ॥ आतां किती

---

१ पुत्र. २ मरण. ३ हे ब्रह्मदेवा. ४ दैव. ५ सुंदर आहेत नेत्र ज्याचे असें. ६ राळकी नांवाच्या किव्याप्रमाणें. ७ शोकरूप अग्नि.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

करूं तळमळ ॥ सर्वांग विकळ जाहलें ॥ ४९ ॥ हे देवदेवा अनाथनाथा ॥ दीनांनुकंपिन[1] रमाकांता ॥ वैकुंठेशा तुजविण आतां ॥ नाहींच त्राता कोणीही ॥ ५० ॥ तरी धांवगा श्रीहरी ॥ मज दीनातें रक्षीं सत्वरीं ॥ पुत्र शोकानळ अंतरीं ॥ मज निर्धारीं जाळिताहे ॥ ५१ ॥ मजसमान ह्या त्रिभुवनीं ॥ शठ होणार नाहींच कोणी ॥ भगवद्वाक्यातें उल्लंघुनी ॥ पुत्रीं दुराशा धरिली म्यां ॥ ५२ ॥ हें मी अनुचित केलें पहिलें ॥ अदृष्टीं जें नसे लिहिलें ॥ तदर्थ इच्छा करितां बळें ॥ कोणासी तें लाभेल ॥ ५३ ॥ एवंरीतीं तो विप्र बहुत ॥ विलाप करी पत्नीसहित ॥ तंव नभामाजीं अकस्मात ॥ अकालजलद[2] पातला ॥ ५४ ॥ झाकोळला चंडकिरण ॥ गर्जना होय अति दारुण ॥ चपळा पडत कडकडोन ॥ दिगंतरें कोंदाटलीं ॥ ५५ ॥ खरस्पर्श सुटला वात ॥ पर्वतही तेणें कांपत ॥ महावृक्ष उन्मळोनि पडत ॥ जीव समस्त घाबरले ॥ ५६ ॥ एक महिनापर्यंत जाण ॥ बलाहक[3] वर्षेला दारुण ॥ धरित्रीमंडळ संपूर्ण ॥ जळपरिपूर्ण जाहलें ॥ ५७ ॥ ऐसा पर्जन्य पडला सतत ॥ परी सुदेवासी नाहीं विदित ॥ पुत्रशोकानळें अत्यंत ॥ तापोनि भ्रमिष्ट जाहला ॥ ५८ ॥ दिवस उगवे मावळे केव्हां ॥ तेंहि नाहीं समजलें तेव्हां ॥ शोक करितां करितां आघवां[4] ॥ मास गेला निघोनियां ॥ ५९ ॥ पुनः पुनः ऐसें वदत ॥ खानपानहि सोडिलें समस्त ॥ विलाप करितां पर्जन्यांत ॥ भिजत मास लोटला जो ॥ ६० ॥ तो हरीचा प्रियपरम ॥ मास होता पुरुषोत्तम ॥ नेणूनही तयाचें उत्तम ॥ सेवन घडलें साहजिक ॥ ६१ ॥ प्रभातकालीं अभ्रस्नान ॥ आणि नित्य घडलें उपोषण ॥ तेणें भगवान् सुप्रसन्न ॥ होऊन प्रगट जाहला ॥ ६२ ॥ नवनीरदश्यामशरीर[5] ॥ पीतांबर[6] द्विभुज मुरलीधर ॥ वनमालाभूषित सुंदर ॥ पुढें उभा राहिला ॥ ६३ ॥ तंव ओसरला सर्व पर्जन्य ॥ विप्रें देखिला भगवान ॥ अंकींचें[7] पुत्रप्रेत तत्क्षण ॥ मेदिनीवरी ठेविलें ॥ ६४ ॥ आणि पत्नीसहित आनंदेंसी ॥ दंडवत् नमन केलें तयासी ॥ श्रीहरिच शरण आम्हांसी ॥ ऐसें मानसीं चिंतित ॥ ६५ ॥ जोडूनियां उभय

१ दीनावर दया करणाऱ्या. २ अकालीन मेघ. ३ मेघ. ४ सर्व. ५ नव्या ( पाण्यानें भरलेल्या ) मेघाप्रमाणें श्यामवर्ण. ६ पीतांबरधारी. ७ मांडीवरील.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

पाणी ॥ पुढें उभा राहिला क्षणीं ॥ भगवान् कैवल्यंदानी ॥ तयालागुनी बोलत ॥ ६६ ॥ सुदेवा तूं भाग्यवान ॥ आणि धन्य धन्य आहेसि जाण ॥ तव भाग्याचें कराया वर्णन ॥ त्रैलोकीं कोण समर्थ ॥ ६७ ॥ वत्सा आतां तुजलागुन ॥ भविष्य सांगतों करीं श्रवण ॥ द्वादश सहस्रवर्षें पूर्ण ॥ हा तव पुत्र वांचेल ॥ ६८ ॥ इतःपर तुजला सतत ॥ पुत्रसुख होईल खचित ॥ प्रसन्न होऊनि म्यां सांप्रत ॥ तुज हा सुत दीधलासे ॥ ६९ ॥ तव पुत्रसुख विलोकून ॥ सस्पृंह होतील देवादि जन ॥ हँठप्राप्तपुत्रापासून ॥ सुख नव्हे हें खरेंचि ॥ ७० ॥ परी स्वयें वैनतेयांनें ॥ हा सुत दिला तुजकारणें ॥ म्हणोनि तूं पुत्रवान्पणें ॥ सर्वप्रसिद्ध होशील ॥ ७१ ॥ आणि मी होऊनि प्रसन्न ॥ सुंचिर स्थापिला तव नंदन ॥ आतां द्विजा हा तुजलागुन ॥ सदा सुखद होईल ॥ ७२ ॥ ह्या तव पुत्रासह सतत ॥ गार्हस्थ्यसुख भोगूनि येथ ॥ अंतीं स्वयें ब्रह्मलोकाप्रत ॥ अनायासें पावोनियां ॥ ७३ ॥ दिव्यसहस्रवर्षें तेथें ॥ भोगूनि तत्रस्थ भोगांतें ॥ पुनश्च ह्या भूतळीं निरुंतें ॥ मनुष्यजन्मातें येशील ॥ ७४ ॥ दृढधन्वानामें विख्यात जगतीं ॥ राजा होशील चक्रवर्ती ॥ बल वाहन धन संपत्ती ॥ अपार तेथें वाढेल ॥ ७५ ॥ इंद्रपदाहूनहि अधिक ॥ ऐश्वर्य वाढेल सकळिक ॥ अयुंत वर्षेंपर्यंत सुरेख ॥ राज्यसुख भोगशील ॥ ७६ ॥ हीच गौमती तव पत्नी ॥ तेथेंहि होईल तुझी राणी ॥ गुणसुंदरीनामें भुवनीं ॥ महासती प्रसिद्ध ॥ ७७ ॥ राजनीतीमाजीं निपुण ॥ ऐसे होतील चार नंदन ॥ तैसेंचि एक कन्यारत्न ॥ सुशील सुंदर होईल ॥ ७८ ॥ सुरासुरांसी दुर्लभ अती ॥ ऐसे भोग भोगूनि निरुतीं ॥ कृतकृत्य मी असें जगतीं ॥ ऐसें चित्तीं मानिशील ॥ ७९ ॥ संसारींचे विषय दारुण ॥ तयांमाजीं होऊनि निमग्न ॥ भवतारक हरीचें स्मरण ॥ तुज नाहींसें होईल ॥ ८० ॥ तेव्हां तुझा हा शुकदेवसुत ॥ कीर होऊनियां वनांत ॥ वटवृक्षीं बैसोनि यथार्थ ॥ बोध करील तुजलागीं ॥ ८१ ॥ वैराग्योत्पादक श्लोक ॥ वारंवार म्हणेल एक ॥ तो ऐकूनियां तूं साशंक ॥ होऊनि गृहा जाशील ॥ ८२ ॥ मग

१ दोन्ही हात. २ मोक्ष देणारा. ३ पुत्रेच्छावंत. ४ बलात्कारानें मिळालेल्या पुत्रापासून. ५ गरुडानें. ६ बहुत काळपर्यंत. ७ खरोखर. ८ दहा हजार वर्षेंपर्यंत.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

विषयसुखासी त्यागून ॥ चिंतार्णवीं होशील निमग्न ॥ तेव्हां तेथें वाल्मीकि येऊन ॥ तुजलागुनी बोधील ॥ ८३ ॥
तेणें सर्व संदेह जाउनी ॥ आपल्या पत्नीसह तूं क्षणीं ॥ अच्युतकैवल्यपदालागुनी ॥ जाशील जाण निश्चयें ॥
॥८४॥ ऐसें बोलत भगवान ॥ तंव अग्निपरि दैदीप्यमान ॥ अवचित उठला द्विजनंदन ॥ श्रीहरिचरण वंदिले ॥
॥८५॥ तया पाहूनि मातापितरें ॥ आनंद पावलीं एकसरें ॥ हर्षाश्रु ढाळित प्रेमभरें पुत्रालागीं आलिंगिती ॥८६॥
सकळहि देव आनंदले ॥ पुष्पवृष्टि बहु वर्षले ॥ तंव मातापित्यांचीं पाउलें ॥ शुकदेवें वंदिलीं ॥ ८७ ॥ द्विजसुतासी
विलोकून ॥ गरुडहि आनंदला तत्क्षण ॥ अति चकित झाला ब्राह्मण ॥ श्रीहरिचरण वंदिले ॥ ८८ ॥ आणि
जोडूनियां करद्वयासीं ॥ सुदेव म्हणे गा हृषीकेशी ॥ मम हृदयस्थ संशयासी ॥ दूर करी सत्वर ॥ ८९ ॥ चारस-
हस्र वर्षें सतत ॥ मी दुष्कर तप तपिलें बहुत ॥ तैं तूं प्रत्यक्ष येऊन तेथ ॥ निष्ठुर वचन कथिलें जें ॥ ९० ॥ कीं
वत्सा तुज प्रारब्धीं पाहीं ॥ पुत्रसुख नाहींच कदाही ॥ तें तव वाक्य सर्वथाही ॥ अन्यथा कैसें जाहलें ॥ ९१ ॥
आणि हा माझा मृत नंदन ॥ कैसा उठला जिवंत होऊन ॥ याचें असे काय कारण ॥ तें मजलागुन सांग देवा ॥
॥ ९२ ॥ एवं सुदेवें श्रीहरीसी ॥ प्रश्निलें बहु विनयेंसी ॥ ऐसें वाल्मीकि दृढधन्व्यासी ॥ कथन करिता जाहला ॥
॥ ९३ ॥ इति श्रीअधिकमासमाहात्म्यसार ॥ बृहन्नारदीयपद्माधार ॥ सज्जन श्रोते ऐकोत चतुर ॥ अष्टमाध्याय
गोड हा ॥ ९४ ॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥ इति अष्टमोऽध्यायः ॥ ८ ॥



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

॥ श्रीगणेशाय नमः ॥ अष्टमाध्यायाचिये अंतीं ॥ सुदेवें प्रश्निलें श्रीहरीप्रती ॥ मम मृत पुत्र उठाया निरुती ॥ काय कारण मज सांग ॥ १ ॥ तें तयाचें ऐकूनि वचन ॥ हरि म्हणे द्विजा ऐक संपूर्ण ॥ त्वां केलें तें तुजवांचून ॥ अन्याचेन नच होय ॥ २ ॥ आणि काय केलेंसी विशेष ॥ तेंही तूं जाणत नाहींस ॥ जेणें मी साक्षाद्ब्रह्मांडेश ॥ बहु संतोष पावलों ॥ ३ ॥ जो कां माझा प्रिय परम ॥ हा गत मास पुरुषोत्तम ॥ ययाची सेवा अत्युत्तम ॥ तुजपासून घडलीसे ॥ ४ ॥ तूं आपल्या पत्नीसहित ॥ निमग्न असतां पुत्रशोकांत ॥ खानपानादि भोगरहित ॥ मासपर्यंत राहिलासी ॥ ५ ॥ पुरुषोत्तममासामाझारीं ॥ एकहि जो उपवास करी ॥ तयाच्या सकळ पापांची भूरी ॥ होऊनियां तत्काळ ॥ ६ ॥ विमानामाजीं आरूढोनी ॥ वेगें जातो वैकुंठभुवनीं ॥ विप्रा सहज तुजपासोनी ॥ अद्भुत करणी घडलीसे ॥ ७ ॥ मासमात्र निरंतर ॥ सहज राहिलासी निराहार ॥ अकालमेघें प्रतिवासर ॥ त्रिकाळ स्नानें जाहलीं ॥ ८ ॥ पुत्रशोकें नेणतपणें ॥ अखंड घडलीं स्नानोपोषणें ॥ परी पुरुषोत्तमाची सेवा तेणें ॥ अत्युत्तम जाहली ॥ ९ ॥ इतर सर्व साधनांहून ॥ तुज हें घडलें श्रेष्ठ साधन ॥ याचें कराया परिमाण ॥ त्रिजगीं कोण समर्थ ॥ १० ॥ पुरुषोत्तमाच्या सेवनापरी ॥ श्रेष्ठ नाहींच जगाभीतरीं ॥ वेदोक्तसाधनें तींही सारीं ॥ तुच्छ निर्धारीं यापुढें ॥ ११ ॥ अरे प्रत्यक्ष ब्रह्मदेवानें ॥ पुरुषोत्तम आणि अनन्य साधनें ॥ सर्व देवांसमक्ष तुळेनें[1] ॥ तुळूनि पाहतां साचार ॥ १२ ॥ अन्य साधनें हळुवट ॥ पुरुषोत्तम झाला सघट[2] ॥ म्हणोनि भूमिस्थ लोक निपट[3] ॥ भक्तिभावें पूजिती ॥ १३ ॥ आणि पुरुषोत्तममास तो पाहीं ॥ यद्यपि असे सर्वही ॥ तथापि पूजितां भूतळाठायीं ॥ सफळ होतो तत्काळ ॥ १४ ॥ ऐसा हा मास पुण्यपावन ॥ यांत त्वां केलें तपाचरण ॥ म्हणोनि वत्सा हा तव नंदन[5] ॥ पुनश्च जिवंत जाहला ॥ १५ ॥ आणि तूं सर्व जगामाजीं ॥ कृतार्थही झालासि सहजीं ॥ ब्रह्मांडीं धुंडाळितां आजी ॥ त्वत्सम पुण्यात्मा नाहींच ॥ १६ ॥ मानवजन्म पावोनि पाहीं ॥ पुरुषोत्तममासाठायीं ॥ स्नानदानादि सत्कर्मे कांहीं ॥ नाचरती कदापि जे ॥ १७ ॥ ते केवळ अधम होत ॥

१ खरोखर. २ तागडीनें ( कांट्यानें ). ३ जड, मोठा. ४ केवळ. ५ पुत्र.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तयांसी जन्मोजन्मीं सतत ॥ दारिद्र्यादि दुःखें बहुत ॥ भोगावीं लागत निश्चयें ॥ १८ ॥ तस्मात् मत्प्रिय पुरुषोत्तमासी ॥ सेवावें अनन्यभावेंसी ॥ तेणें मी भगवान् गोलोकवासी ॥ सुप्रसन्न होतसें ॥ १९ ॥ आणि तो पुरुषोत्तमसेवकजन ॥ मज आवडता होय म्हणोन ॥ तयासी महाभाग्यवान ॥ आणि धन्य करितों तत्काळ ॥ २० ॥ पुरुषोत्तममासाचा महिमा ॥ काय सांगूं गा विप्रोत्तमा ॥ वर्णितां साक्षाचतुर्मुख ब्रह्मा ॥ कुंठित झाला साचार ॥ २१ ॥ ऐसें बोलूनि घननीळ ॥ अदृश्य झाला तत्काळ ॥ पुढें वर्तलें तें सकळ ॥ सांगतों ऐके राजेंद्रा ॥ २२ ॥ तों संदार सुदेव ब्राह्मण ॥ पुरुषोत्तमसेवनेंकरून ॥ मृत स्वपुत्र उठला पाहून ॥ अत्यानंदें डवरला ॥ २३ ॥ आणि म्हणे मजपासून ॥ नेणतां घडलें पुरुषोत्तमसेवन ॥ तेंचि सफळ झालें पूर्ण ॥ उठला माझा मृतपुत्र ॥ २४ ॥ अहो ऐसा मास कदाही ॥ देखिला किंवा ऐकिला नाहीं ॥ ज्याचे प्रभावें लोकोत्तरंही[2] ॥ कामना होती परिपूर्ण ॥ २५ ॥ ऐसा विस्मयाविष्ट होत ॥ पुरुषोत्तममास मानवित ॥ तये पुत्रें स्वपत्नीसहित[1] ॥ परमानंदित जाहला ॥ २६ ॥ मग सर्वें घेऊनि तनयासी ॥ पत्नीसह पावला गृहासी ॥ शुकदेवही सत्कृतीसी ॥ करूनि पितरां[3] तोषवित ॥२७॥ पुढें सुदेव द्विजवर ॥ तये मासासी स्तवित सादर ॥ श्रीविष्णुपूजन परिकर[4] ॥ सर्वदा करूं लागला ॥ २८ ॥ कर्ममार्गाची स्पृहा[5] त्यागिली ॥ भक्तिमार्गाची इच्छा धरिली ॥ सर्वदुःखतप्तां साउली ॥ एक असे पुरुषोत्तम ॥ ॥ २९ ॥ ऐसा भाव धरूनि मनांत ॥ प्रतिपुरुषोत्तममासांत ॥ जपहोमादि सत्कर्मीं सतत ॥ हरीसी भजता जाहला ॥ ३० ॥ तेणें येथें सहस्रवर्षें ॥ सर्वभोग भोगूनि हर्षें ॥ अंतीं सदार दिव्यवेषें ॥ वैकुंठासी पावला ॥ ३१ ॥ तत्रत्य सुख भोगूनि मागुती ॥ सपत्नीक आला भूतळाप्रती ॥ तोचि तूं दृढधन्वा भूपती ॥ प्रसिद्ध आहेस राजेंद्रा ॥ ३२ ॥ पुरुषोत्तमाच्या सेवनेंसी ॥ सर्वसमृद्धिमान् झालासी ॥ पूर्वीची जी तुझी महिषी[6] ॥ गौतमी महापतिव्रता ॥ ३३ ॥ तीच ही गुणसुंदरी येथ ॥ तुझी राणी झाली सांप्रत ॥ पूर्वजन्मींचा जो तव सुत ॥ शुकदेवनामें विख्यात पैं ॥ ३४ ॥ पुरुषोत्तमाच्या प्रभावानें ॥ जिवंत केला जो हरीनें ॥ द्वादशसहस्रवर्षायु जेणें ॥

१ पत्नीसहवर्तमान. २ जनांत प्रसिद्ध नाहींत ( लोकांना दुर्लभ ). ३ आई–बापांस. ४ सुंदर. ५ इच्छा. ६ स्त्री.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

भोगूनियां पृथ्वीवरी ॥ ३५ ॥ अंतीं पावला वैकुंठाप्रत ॥ तोचि शुकदेव अरण्यांत ॥ सरोवरतीरीं वटीं सांप्रत ॥ शुकरूपें बैसला ॥ ३६ ॥ तूं तयाचा पूर्वजन्मींचा पिता ॥ अवचित वनामाजीं येतां ॥ तुज पाहूनियां तत्वतां ॥ ऐशी चिंता उद्भवली ॥ ३७ ॥ कीं हें माझें प्रत्यक्ष दैवत ॥ सर्व हितोपदेष्टें सतत ॥ दुस्तर प्रपंचसागरांत[1] ॥ सांप्रत निमग्न झालें असे ॥ ३८ ॥ यांतील दुर्धर विषयव्याळ[2] ॥ यासी डंखित सर्वकाळ ॥ तेणें हा होऊनि व्याकुळ ॥ पतनीं[3] पडेल निश्चयें ॥ ३९ ॥ यास्तव यास बोध करून ॥ जरी का मी न उद्धरीन ॥ तरी मजही भवबंधन ॥ प्राप्त होईल साचार ॥ ४० ॥ पुन्नामनरकापासून ॥ पित्यासी सुत रक्षितो म्हणोन ॥ पुत्र हें सुतासी अभिधान ॥ श्रुत्युक्त मान्य असे जें ॥ ४१ ॥ तेंहि मदर्थ[4] होईल वृथा ॥ हा मम पूर्वजन्मींचा पिता ॥ तस्मात यासी बोधूनि आतां ॥ कीजे सर्वथा उपकार ॥ ४२ ॥ ऐसा कीं रे निश्चय केला ॥ आणि त्वद्बोधार्थ[5] श्लोक बोलला ॥ राया त्वां जें पुसिलें मजला ॥ तें तुज सर्व सांगितलें ॥ ४३ ॥ अखंड असो तव कीर्ति ॥ आतां मी जातों शरयूप्रती ॥ जियेच्या दर्शनमात्रें निरुती ॥ पापें लोपतीं तत्काळ ॥ ४४ ॥ ऐसें बोलूनि वाल्मीकऋषी ॥ उद्युक्त झाला गमनासी ॥ तंव तो राजेश्वर तयासी ॥ हस्त जोडूनि विनवित ॥४५॥ म्हणे हो ऋषिवर्य आपण ॥ पुरुषोत्तमनामा पावन ॥ जो कथिला मास म्हणोन ॥ तयासी कैसें सेवावें ॥ ४६ ॥ कशी कोणाची पूजा करावी ॥ कोणतीं कधीं दानें द्यावीं ॥ कोणतीं कर्मे आचरावीं ॥ आणि विधि कैसा तयांचा ॥ ४७ ॥ हें सर्व परोपकारार्थ ॥ विवरूनियां सांगा मजप्रत ॥ भवादृश[6] मुनि महंत ॥ लोकहितार्थ संचरती ॥ ४८ ॥ ऐसी रायाची प्रश्नवाणी ॥ ऐकूनि बोले वाल्मीक मुनी ॥ राजेश्वरा त्वां मजलागुनी ॥ जैसें आजि प्रश्निलेंस ॥ ४९ ॥ ऐसेंच पूर्वी रँमेनें[7] हरीतें ॥ परमप्रीतीं प्रश्निलें होतें ॥ तेव्हां हरीनें कथिलें तियेतें ॥ तेंचि सांगतों राजेंद्रा ॥ ५० ॥ एके समयीं वैकुंठविहारी ॥ सुखें बैसला असतां मंदिरीं ॥ प्राणप्रिया क्षीराब्धिकुमारी[8] ॥ हस्त जोडुनी विनवित ॥

१ प्रपंचरूप समुद्रांतले. २ विषयरूपी सर्प. ३ नरकांत ( दुःखांत. ) ४ मजविषयीं. ५ तुला बोध करण्याकरितां. ६ तुमच्यासारखे. ७ लक्ष्मीनें. ८ क्षीरसागराची कन्या, लक्ष्मी.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

॥ ५१ ॥ म्हणे हो देवा वैकुंठनाथा ॥ प्रीतिपात्र मी तुमची कांता ॥ म्हणूनि चरणीं ठेवूनि माथा ॥ तुम्हालागीं प्रश्निताहें ॥ ५२ ॥ तरी होऊनियां प्रसन्न ॥ माझें करावें समाधान ॥ अधिकमास तो पुण्यपावन ॥ सुखदायक असे पैं ॥ ५३ ॥ तयामाजीं स्नानदान ॥ पूजादि सत्कर्मे करितां क्षण ॥ अक्षय सुख लाभतें म्हणून ॥ बहुवार ऐकिलेंसे ॥ ५४ ॥ तरी ती कोणाची पूजा करावी ॥ कोणतीं कैशीं दानें द्यावीं ॥ कोणतीं व्रतें आचरावीं ॥ आणि विधि कैसा तयांचा ॥५५॥ हें सकळहि विवरून[1] ॥ मज सांगावें कृपा करून ॥ ऐसें रमेचें[2] ऐकूनि वचन ॥ श्रीहरी पूर्ण आनंदला ॥५६॥ आणि म्हणे हे प्रिये कमळे ॥ तुवां उत्तम मज प्रश्निलें ॥ तरी याचें उत्तर सगळें सांगतों ऐकें सावध ॥५७॥ सूर्यसंक्रांतिहीन जो मास ॥ तयासी म्हणती अधिकमास ॥ तयाचा स्वामी गोलोकेश ॥ पुरुषोत्तम स्वयें असें ॥ ५८ ॥ म्हणोन त्या मासीं अनुदिन[3] ॥ पुरुषोत्तमासी उद्देशून ॥ स्नान दान जप तर्पण ॥ देवार्चनादि आचरावीं ॥ ५९ ॥ आणि तैलत्याग भूशयन ॥ एकजातिपत्रावलिभोजन ॥ अपूपदान नखकेशधारण ॥ एकान्न भोजन तैसेंचि ॥ ६० ॥ दीपदानव्रत सांग ॥ दंपत्यभोजन उपानहत्याग[4] ॥ धान्य वर्जन नियम अभ्यंग ॥ धात्रीस्नान[5] नियमानें ॥ ६१ ॥ फलत्याग लवणवर्जन ॥ तिलतांबूलधान्यादिदान ॥ हेम रौप्य सौभाग्यवायन ॥ गोप्रदान सवत्स ॥ ६२ ॥ उपोषण अयाचित नक्त ॥ धारणापारणा एकभुक्त ॥ हविष्याशन कीं मौनव्रत ॥ मासपर्यंत करावें ॥ ६३ ॥ एकहि कर्म केल्याशिवाय ॥ अधिकमास जयाचा व्यर्थ जाय ॥ तया दरिद्र्यादि दुःखें अतिशय ॥ प्राप्त होत निश्चयें ॥ ६४ ॥ जे कोणी पुरुषोत्तममासीं ॥ स्वल्प किंवा बहुदानेंसी ॥ भावें पूजिती ब्राह्मणांसी ॥ तयां अखंड सुख होय ॥ ६५ ॥ रविसंक्रांतिरहित मास ॥ पुरुषोत्तम नाम तयास ॥ तयामाजीं नियम विशेष ॥ भक्तिभावें आचरावे ॥ ६६ ॥ प्रथम प्रातःकालीं उठोन ॥ शौच मुखमार्जन करून ॥ दंतधावनपूर्वक स्नान ॥ आचरावें यथाविधि ॥ ६७ ॥ मग शुद्ध वस्त्र नेसुनी ॥ शुचि-



१ उघड करून, स्पष्ट करून. २ लक्ष्मी. ३ दर दिवशीं. ४ पायांत जोडा न घालणें. ५ आवळ्याचा कल्क आंगास लावून स्नान करणें.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

भूतपणें गृहीं येऊनी ॥ अन्यकथा[1]लाप सोडुनी ॥ हस्तपाद प्रक्षाळिजे ॥ ६८ ॥ त्यावरी आचमन करावें ॥
संध्या देवार्चनादिक भावें ॥ नित्यकर्म सर्व सारावें ॥ अंतरीं ध्यावें पुरुषोत्तमा ॥ ६९ ॥ मग उपवास नक्त
एकभुक्त ॥ इत्यादिक जीं व्रतें बहुत ॥ त्यांतूनि इष्टव्रतांचा यथार्थ ॥ नियम घ्यावा यथाविधि ॥ ७० ॥ आणि
पूजादिसंपादनालागुन ॥ वेदशास्त्रांमाजीं निपुण ॥ शुद्ध ब्राह्मण पाचारून ॥ आचार्य जाण करावा ॥ ७१ ॥
मंगलवाद्यगर्जन करित ॥ पूजा[2]संभार घ्यावा समस्त ॥ संकल्प करोनि यथोचित ॥ शुचिर्भूत[3] पैं व्हावें ॥ ७२ ॥
मग उपलिप्त[4] जें शुद्ध स्थळ ॥ पूजार्थ कल्पिलें तेथें निर्मळ ॥ चतुरस्र किंवा वर्तुळ ॥ गोमयें मंडळ करूनियां ॥
॥७३॥ तयावरी अष्टदळ एक ॥ तंडुलांचें करावें सुरेख ॥ भोंवतीं भरूनि रंग अनेक ॥ सुशोभित कीजिये ॥७४॥
त्यावरी यथाशक्ति सौवर्ण ॥ रजत ताम्र किंवा मृन्मय पूर्ण ॥ नूतन दृढ कलश अव्रण[5] ॥ यथाविधि स्थापावा ॥
॥७५॥ आणि तये कलशाचें पूजन ॥ सर्वोपचारीं करावें जाण ॥ पीतांबरावृत ताम्रभाजन तयावरी ठेवावें ॥
॥७६॥ मग त्यामाजीं स्वर्णनिर्मित ॥ सुलक्षणी राधिकासहित ॥ पुरुषोत्तमाची मूर्ति यथोक्त ॥ ठेवूनियां साचार
॥ ७७ ॥ तियेची प्राणप्रतिष्ठा प्रीतीं ॥ श्रुतिस्मृतिपुराणोक्तरीतीं ॥ अग्न्युत्तारणपूर्वक निरुती ॥ करावी जाण
इंदिरे ॥ ७८ ॥ मग भगवन्मूर्ति साजिरी ॥ ध्याऊनियां शुद्ध स्वांतरीं ॥ नानामंत्रीं सर्वोपचारीं ॥ पूजन ऐसें
कीजिये ॥७९॥ ऐसें बोलूनि पूजाप्रकार ॥ हरीनें कथिला सविस्तर ॥ तो येथें वर्णितां समग्र ॥ ग्रंथविस्तार होईल
॥ ८० ॥ यास्तव तो सर्व सोडून ॥ आतां वर्णितों पुढील कथन ॥ तरी श्रोतीं मजलागुन ॥ क्षमाचि पूर्ण कीजिये
॥८१॥ असो सर्वोपचारीं साची ॥ पूजा करितां पुरुषोत्तमाची ॥ जरी कां कित्येक पदार्थांची ॥ दुर्लभता होईल ॥
॥ ८२ ॥ तरी शुद्धोदकेंचि संपूर्ण ॥ उपचार कल्पावे जाण ॥ यस्यस्मृत्येति मंत्र म्हणून ॥ न्यून तें पूर्ण करावें ॥
॥८३॥ पुरुषोत्तमाच्या प्रीत्यर्थ ॥ तयासन्निध मासपर्यंत ॥ घृतदीप लावावा अखंडित ॥ तेणें सर्वार्थ लाभती ॥

१ इतर गोष्टी बोलणें. २ पूजा सामुग्री. ३ भूतशुद्धिपूर्वक न्यासादि शुद्ध करून घेणें. ४ सारविलेलें. ५ स्वच्छ.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

॥८४॥ पूजा झाल्यानंतर देख ॥ नमः पुरुषोत्तमाख्यं ॥ ह्या सप्तश्लोकस्तोत्राचा एक ॥ पाठ सुरेख करावा ॥ ८५ ॥ मग अन्य कथालाप सांडून ॥ जितेंद्रियपणें शुद्ध राहून ॥ भावें करीत पुराण श्रवण ॥ दिवस संपूर्ण दवडावा ॥ ॥ ८६ ॥ ऐसें अधिकमासीं अनुदिन ॥ पूजी पुरुषोत्तमालागुन ॥ तयाचीं सर्व पापें जळून ॥ मनोरथ पूर्ण होतात ॥ ८७ ॥ आणि इहलोकीं पावोनि सुखासी ॥ अंतीं जाय मोक्षपदासी ॥ ऐसें श्रीहरी आनंदेंसी ॥ रमेसी कथिता जाहला ॥ ८८ ॥ इति श्रीअधिकमासमाहात्म्यसार ॥ बृहन्नारदीयपद्माधार ॥ ऐकोत सज्जन श्रोते चतुर ॥ नवमाध्याय गोड हा ॥ ८९ ॥ इति नवमोऽध्यायः ॥ ९ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

१ सप्तश्लोकस्तोत्रम्—नमः पुरुषोत्तमाख्याय नमस्ते विश्वभावन ॥ नमस्तेऽस्तु हृषीकेश महापुरुषपूर्वज ॥ १ ॥ येनेदमखिलं जातं यत्र सर्वं प्रतिष्ठितम् ॥ लयमेष्यति यत्रैतत् तं प्रपन्नोऽस्मि केशवम् ॥ २ ॥ परेशः परमानंदः परात्परतरः प्रभुः ॥ चिद्रूपश्चित्परिज्ञेयो स मे कृष्णः प्रसीदतु ॥ ३ ॥ कृष्णं कमलपत्राक्षं रामं रघुकुलोद्भवम् ॥ नृसिंहं वामनं विष्णुं स्मरन् याति परां गतिम् ॥ ४ ॥ वासुदेवं वराहं च कंसकेशिनिषूदनम् ॥ पुराणपुरुषं यज्ञपुरुषं प्रणतोस्म्यहम् ॥ ५ ॥ अनादिनिधनं देवं शंखचक्रगदाधरम् ॥ त्रिविक्रमं हलधरं प्रणतोऽस्मि सनातनम् ॥ ६ ॥ य इदं कीर्तयेन्नित्यं स्तोत्राणामुत्तमोत्तमम् ॥ सर्वपापविनिर्मुक्तो विष्णुलोके महीयते ॥ ७ ॥ इति श्रीपद्मपुराणोक्त पुरुषोत्तमस्तोत्रं संपूर्णम् ॥



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ नवमाध्यायामाजीं पूर्ण ॥ पुरुषोत्तमपूजाविधान ॥ हरीनें कथिलें रमेलागुनं ॥ ऐसें वर्णन जाहलें ॥ १ ॥ आतां पुढील कथानक ॥ श्रोतीं ऐकिजे सकळिक ॥ श्रीहरी म्हणे प्रिये आणिक ॥ सांगतों ऐक एकचित्तें ॥ २ ॥ मेषादिसंक्रांति संयुक्त ॥ चैत्रादिक जे मास समस्त ॥ तयांचा स्वामी दिवसनाथ[2] ॥ असे निश्चित जाण पां ॥ ३ ॥ आणि जो रविसंक्रांतिहीन ॥ तोचि अधिक मास जाण ॥ तयाचा स्वामी नारायण ॥ पुरुषोत्तम असे पैं ॥ ४ ॥ म्हणोनि तये मासीं पूर्ण ॥ पुरुषोत्तमासी उद्देशून ॥ स्वल्प किंवा बहुत फळ दान ॥ ब्राह्मणालागून अर्पिजे ॥ ५ ॥ आणि त्या मासीं जपादि विपुळ ॥ कर्में करितां अति निर्मळ ॥ स्वल्पायासें बहुत फळ ॥ प्राप्त तत्काळ होतसे ॥ ६ ॥ ऐसें त्या मासाचें महिमान ॥ म्हणोनि सकळीं भावेंकरून ॥ नाना सत्कर्में आचरून ॥ भगवंतालागुन तोषवावें ॥ ७ ॥ पुरुषोत्तममासीं जे कोणी ॥ स्वशक्त्यनुरूप व्रतदानीं ॥ नाराधिती पुरुषोत्तमालागुनी ॥ अधःपतनीं पडती ते ॥ ८ ॥ मासांमाजीं पुरुषोत्तम ॥ पुण्यफलद असे परम ॥ म्हणोनि जनीं व्रत उत्तम ॥ कीजे तेंचि सांगतों ॥ ९ ॥ शुद्धप्रतिपदेपासून ॥ अमापर्यंत कीजे उपोषण ॥ किंवा साधावें नक्तभोजन ॥ कीं एकभुक्त असावें ॥ १० ॥ अथवा साधावें अयाचित[3] ॥ शुचिर्भूत असावें सतत ॥ होमहवनपूजादि यथार्थ ॥ सत्कर्में समस्त आचरावीं ॥ ११ ॥ नानाप्रकारें दानधर्म ॥ करितां होत सफळ नेम ॥ हेंचि जाणोनि अंतरीं वर्म ॥ सदा सत्कर्म कीजिये ॥ १२ ॥ दानव्रताचरणाविषयीं ॥ शक्ति नसे जयासि काहीं ॥ तयालागीं उत्तम सोई ॥ सुलभ एक सांगतों ॥ १३ ॥ सर्वकाळ शरीर शोषुनी ॥ तत्पर असावें तीर्थसेवनीं ॥ भावें विप्रांची सेवा करुनी ॥ काळक्रमण करावें ॥ १४ ॥ ऐसा आचरे जो तयासी ॥ ब्राह्मणवचनें तत्काळेंसीं ॥ व्रतफळ प्राप्ति विशेषीं ॥ निश्चयेंसीं होईल ॥ १५ ॥ ऐसें ऐकूनि अब्धिबाळा ॥ म्हणे हे भगवंता घननीळा ॥ जे मानव निर्धन कृपाळा ॥ दुराचारी शक्तिहीन ॥ १६ ॥ दुज्यापासूनि उपजीवन ॥ सर्वकाळ बुद्धिहीन ॥ विद्याविनयविवेकहीन ॥ नसे ज्ञान जयासी ॥ १७ ॥ पशू ऐसे सर्वकाळ ॥ बुद्धिहीन वागती केवळ ॥ तयांलागीं तराया सोज्वळ ॥ साधन

१ लक्ष्मीप्रत. २ सूर्य. ३ मागितल्यावांचून कोणीं आणून दिलें असतां तेवढेंच एकवेळ खाऊन राहाणें.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

असे कोणतें ॥ १८ ॥ तूं दीनानाथ करुणाघन ॥ मजवरी तुझी कृपा पूर्ण ॥ म्हणोनि केला हा प्रश्न ॥ समाधान करीं तूं ॥ १९ ॥ ऐसें प्रियेचें भाषित ॥ ऐकूनियां वैकुंठनाथ ॥ उपोषण नक्त एकभुक्त ॥ आणि अयाचितसाधन ॥ २० ॥ नाना व्रतें नाना दानें ॥ कायशोषण तीर्थ सेविणें ॥ इत्यादि अनेक जीं पैं साधनें ॥ तयाकारणें असमर्थ जे ॥ २१ ॥ तयीं भावें विप्र पूजावा ॥ तैसाचि संतसंग करावा ॥ मग दानें व्रतें तीर्थसेवा ॥ कासया जीवा पाहिजेत ॥ २२ ॥ गंगादितीर्थसेवनफळें ॥ प्राप्त होती बहुत काळें ॥ साधुसंगमें तरी तत्काळ ॥ होय लाभ सुफळांचा ॥ २३ ॥ साधुजनांचें स्पर्शन दर्शन ॥ किंवा करितां नामस्मरण ॥ सकळ पातकें दग्ध होऊन ॥ सनातन सुख प्राप्त होय ॥ २४ ॥ ऐसा सत्संगमहिमा उत्तम ॥ म्हणोनि कीजे साधुसंगम ॥ संतकृपेनें पुरोनि काम ॥ वैकुंठधाम लाभतें ॥ २५ ॥ कल्याणेच्छु जे कां जन ॥ तयीं करावें हेंचि साधन ॥ अधिकमासामाजीं भगवान ॥ संतुष्ट पूर्ण होतसे ॥ २६ ॥ आणि विशेषें गोविप्रांलागुनी ॥ प्रत्यहीं पूजावें भावेंकरूनी ॥ ऐसी ऐकूनि हरीची वाणी ॥ चंद्रभगिनी[1] बोलत ॥ २७ ॥ इंदिरा[2] म्हणे हो श्रीमुरारी ॥ तुम्हांपासून नानापरी ॥ धर्म ऐकिले परी अंतरीं ॥ तृप्ति निर्धारीं नव्हेचि ॥ २८ ॥ तरी आतां गोविप्रपूजन ॥ कैसें करावें यथाविधान ॥ तेंचि नाथा मजलागुन ॥ निवेदन करीं पां ॥ २९ ॥ ऐसी श्रींची प्रश्नवैखरी[3] ॥ ऐकूनि बोले श्रीमुरारी ॥ प्राणप्रिये समुद्रकुमारी ॥ धन्य निर्धारीं जगीं तूं ॥ ३० ॥ उत्तम प्रश्न केलासि मातें ॥ म्हणोनि आतां प्रथम तूतें ॥ धेनुपूजनविधान निरुतें ॥ सानंदचित्तें सांगतों ॥ ३१ ॥ तरी तूं आतां सावधचित्त ॥ राहूनि ऐकें सकळ वृत्त ॥ सर्व ब्रह्मांडामाजीं निश्चित ॥ धेनुदैवत श्रेष्ठ असे ॥ ३२ ॥ तियेच्या शरीरीं सतत ॥ चतुर्दश भुवनें वास करित ॥ सकळ दैवताहूनि यथार्थ ॥ सामर्थ्य अद्भुत असे पां ॥ ३३ ॥ स्पर्श करितां शरीरासी ॥ बोहरी होय सर्व पापांसी ॥ दर्शनमात्रें मंगलराशी ॥ निश्चयेंसीं प्राप्त होय ॥ ३४ ॥ तेवींच पुच्छीं करितां स्पर्श ॥ तत्काळ होऊनि दुरितनाश[4] ॥ दारिद्र्यदुःख रोगादि क्लेश ॥ सर्वही विनाश पावती ॥ ३५ ॥ तापत्रय निरसूनि जाय ॥ ब्रह्मांडोदरीं

१ चंद्राची बहीण, लक्ष्मी. २ लक्ष्मीची. ३ प्रश्नवाणी. ४ पापांचा नाश.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

कीर्ति होय ॥ गृहधन दारा[1] दुहिता[2] तनय[3] ॥ होत अव्यय[4] निश्चयें ॥ ३६ ॥ धेनूची होतां कृपा पूर्ण ॥ काय अलभ्य जनांलागून ॥ ब्रह्मा विष्णु महेश्वर तीन ॥ असती आपण धेनुरूप ॥ ३७ ॥ गोमयामाजीं सूर्यतनया[5] ॥ आणि मूत्रामाजीं नर्मदा आर्या[6] ॥ तैशीच दुग्धीं श्रीशिवभार्या ॥ भागीरथी वसतसे ॥ ३८ ॥ रोमकूपांभीतरीं जाण ॥ सकळ तीर्थें वसतीं आपण ॥ सर्वांगामाजीं दैवतावांचून ॥ रितें स्थान नाहींच ॥ ३९ ॥ ऐसी धेनू जगन्मय ॥ ब्रह्मरूपचि निश्चयें होय ॥ यास्तव तियेवांचून काय ॥ दुजें वरिष्ठ जगीं असे ॥ ४० ॥ वेदशास्त्रपुराणें इतिहास ॥ धेनूच्या अंगीं करिती वास ॥ आब्रह्मस्तंबपर्यंतास ॥ नाहीं आधार दूसरा ॥ ४१ ॥ गाईच्या दधिदुग्धघृतीं ॥ यज्ञयागादि कर्में होतीं ॥ म्हणोनि यज्ञादि कर्मांसि निगुती[7] ॥ मुख्य कारण धेनूच ॥ ४२ ॥ सकळ जगामाजीं जाण ॥ अतिपवित्र वस्तु दोन ॥ एक धेनू दुजा ब्राह्मण ॥ यांहूनि अन्य व्यर्थ सर्व ॥ ४३ ॥ आणि गोब्राह्मणांमध्येंहि देख ॥ धेनूच असे श्रेष्ठ अधिक ॥ तियेवांचून जगीं आणिक ॥ नाहींच प्रमुख निश्चयें ॥ ४४ ॥ सर्वपापनाशाचें हें मूळ ॥ गोविप्रांचें एकचि कुळ ॥ ऐसें असतां अज्ञानी सकळ ॥ द्विभाग केवळ मानिती ॥ ॥ ४५ ॥ यज्ञाचीं अंगें असतीं दोन ॥ गव्य[8] आणि वेद संपूर्ण ॥ गव्य होय धेनूपासून ॥ वेदस्थान विप्रमुख ॥ ॥ ४६ ॥ होमशाळा देवायतनें ॥ संमार्जितां गोविष्ठेनें ॥ पवित्र होत याकारणें ॥ धेनूसी अति श्रेष्ठत्व ॥ ४७ ॥ धेनु म्हणजे यज्ञाचें मुख ॥ तसेचि उभय नेत्र देख ॥ गोक्षीरापुढें अमृतसुख ॥ असे अल्पक निश्चयें ॥ ४८ ॥ गोक्षीरामृतासमान ॥ दुजें अमृत नसे जाण ॥ एवंप्रकारें चतुरानन ॥ मुखें आपण बोलिला ॥ ४९ ॥ तरी स्वर्लोकसुखभोगाविषयीं ॥ इच्छा असेल जयांच्या हृदयीं ॥ धेनुसेवा नानाउपायीं ॥ सर्वदा तयीं करावी ॥ ५० ॥ जे कोणी पुरुषोत्तममासीं ॥ विधीनें पूजूनियां धेनूसी ॥ प्रदक्षिणा करितील तयांसी ॥ अत्यंत लाभ होईल ॥५१॥ सप्तद्वीपापृथ्वीप्रत ॥ प्रदक्षिणा करितां जें फल प्राप्त ॥ तेंचि गोप्रदक्षिणें त्वरित ॥ होय निश्चित जाण पां ॥ ५२ ॥ धेनु ही रविकन्या असून ॥ सर्व जनांच्या कल्याणालागून ॥ आणि यज्ञसिद्धि व्हावी म्हणोन ॥ झाली उत्पन्न

१ स्त्री. २ कन्या. ३ पुत्र. ४ अक्षय. ५ यमुना. ६ श्रेष्ठ. ७ खरोखर. ८ गाईचें दूध तूप, वगैरे गाईपासून होणारे पदार्थ.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

 

भूलोकीं ॥ ५३ ॥ जैसी भागीरथी निर्मळ ॥ स्नानें उद्धरी जन सकळ ॥ तैसीच धेनु पवित्र सोज्वळ ॥ करी पावन जगातें ॥ ५४ ॥ ऐसी धेनु कल्याणदायिनी ॥ प्रत्यक्ष असे या भुवनीं ॥ म्हणोनि सकळ पुण्येच्छूंनीं ॥ तियेलागुनी भजावें ॥ ५५ ॥ भावें करितां पूजन सेवा ॥ सुपुण्यफळ मानवां ॥ सर्व पूर्वज पावोनि त्रिदिवां ॥ सुखानुभवा घेतील ॥ ५६ ॥ ऐसा गोपूजनाचा महिमा ॥ न कळे तयाची कोणास सीमा ॥ वर्णन करितां प्रत्यक्ष ब्रह्मा ॥ बहुत श्रम पावत ॥ ५७ ॥ म्हणोनि धेनूतें भक्तिभावेंसी ॥ विशेषें भजावें अधिकमासीं ॥ गोदानाची पुण्यराशी ॥ मम वाणीसी न वर्णवे ॥ ५८ ॥ परी कमळे[1] तुजवरुती ॥ विपुल असे माझी प्रीती ॥ म्हणोनि संक्षेपें मुख्यार्थाप्रती ॥ सांगतों निरुती ऐक पां ॥ ५९ ॥ सुशीला आणि सुलक्षण ॥ बहु दुग्धवती अति तरुण ॥ निरोगी वत्ससंपन्न ॥ चतुःस्तनी सुंदर ॥ ६० ॥ शुभ्रवर्णी बहु साजिरी ॥ न्यायार्जिता पुष्ट शरीरी ॥ स्वर्णशृंगी रौप्यखुरी ॥ वस्त्रालंकारीं सुभूषित ॥ ६१ ॥ ऐशा अत्युत्तम धेनूसी ॥ पूजूनि यथाविधानेंसी ॥ बाहूनि[3] सुपात्र ब्राह्मणासी ॥ दान भावेंसी दीजिये ॥ ६२ ॥ अधिकमासामाजीं गोप्रदान ॥ करितां होय दुरितनाशन[4] ॥ पूर्वजांलागीं स्वर्गभुवन ॥ निश्चयें जाण लाधतें ॥ ६३ ॥ धेनुदानासमान पुण्य ॥ त्रिलोकामाजीं नसे अन्य ॥ गोदानकर्ता सर्वत्र मान्य ॥ होतो धन्य ब्रह्मांडीं ॥ ६४ ॥ गोदानाचें सुपुण्यफल ॥ किती सांगूं तुज निर्मळ ॥ श्रवणमात्रें मानव सकळ ॥ पवित्र तत्काळ होती पां ॥ ६५ ॥ आबालवृद्ध उद्धरोन ॥ वेगें पावती मोक्षसदन ॥ गोप्रदानें श्रीभगवान ॥ होतो प्रसन्न निश्चयें ॥ ६६ ॥ पुरुषोत्तमासी प्रिय भक्त ॥ परी गोदानकर्ता श्रेष्ठ सर्वांत म्हणोनि जनीं अधिकमासांत ॥ सुपात्रीं दान दीजिये ॥ ६७ ॥ आतां सुपात्र म्हणसी कोण ॥ तरी सांगतों तुजलागून ॥ सर्वदा बोले सत्यवचन ॥ लोभहीन तपस्वी ॥ ६८ ॥ दानाध्ययन यजनादिक ॥ षटकर्मे करी जो आणिक ॥ शांत दांत दयाळू अधिक ॥ शुद्ध सात्विक शील ज्याचें ॥ ६९ ॥ स्वधर्मेंसी नित्य वागून ॥ न्यायें करी कुटुंबपोषण ॥ जगदीशाचे पवित्र चरण ॥ रात्रंदिन चिंती जो ॥ ७० ॥ आणि जयाच्या घरीं अग्नि-



१ स्वर्गलोकाला. २ हे लक्ष्मी. ३ बोलावून. ४ पापांचा नाश.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

होत्र ॥ तोचि विप्र जाण सुपात्र ॥ तया देतां गोदान पवित्र ॥ इह परत्र सुखप्राप्ति ॥७१॥ म्हणोनि विशेषें अधिक-मासीं ॥ सुशील सवत्स धेनूसी ॥ धर्मशास्त्रोक्त विधानेंसी ॥ भक्तिभावेंसी पूजूनियां ॥ ७२ ॥ नानाविध वस्त्रालंकार ॥ घालूनि गौच्या अंगावर ॥ एकाग्रचित्तें जोडुनी कर ॥ संकल्प सुंदर करावा ॥ ७३ ॥ श्रीपुरुषोत्तमप्रीत्यर्थ ॥ मान्य सुपात्र ब्राह्मणाप्रत ॥ गोदान करितों मी यथार्थ ॥ म्हणोनि उदक सोडावें ॥ ७४ ॥ मग पाद्यार्घ्यादि उपचारेंसी ॥ आणि नानावस्त्रालंकारेंसी ॥ यथाविधि भक्तिभावेंसी ॥ ब्राह्मणासी पूजूनियां ॥ ७५ ॥ गोपुच्छ देउनी विप्रहस्तीं ॥ तांबूल दक्षिणा ठेविजे वरुती ॥ ह्या गोप्रदानें गोलोकपती ॥ चित्तीं होवो संतुष्ट ॥ ७६ ॥ ऐसें बोलूनियां वचन ॥ विप्रहस्तीं सोडूनि जीवन[1] ॥ चरणांप्रती साष्टांग नमन ॥ भावें जाणा करावें ॥ ७७ ॥ सत्पात्र नसेल समयासी ॥ अथवा हस्तीं न घे तो दानासी ॥ तरी तया उद्देशूनि मानसीं ॥ उदकीं उदक सोडावें ॥ ७८ ॥ ऐसें करितां ब्राह्मणास ॥ न लागतां प्रतिग्रहदोष[2] ॥ सुपात्रदानाचें फल विशेष ॥ दानकर्त्यास लाभतें ॥ ७९ ॥ भावें करितां दान सुपात्रीं ॥ पूर्वज पावती सुख परत्रीं[3] ॥ गोदानासम पाहतां जगत्रीं ॥ नसेचि पुण्य दुसरें ॥८०॥ परी अपात्रीं देतां दान ॥ देता घेता दोघेहि जाण ॥ शतपूर्वजांसहित आपण ॥ निरयीं[4] पतन पावती ॥ ८१ ॥ आणि दुग्धहीना अतिकृशांगी ॥ अथवा वंध्या[5] विकलांगी[6] ॥ कीं वृद्धा अंधा एकशृंगी ॥ किंवा त्रिस्तनी मृतवत्सा ॥ ८२ ॥ कीं एकनेत्र पादहीना ॥ ऐशी धेनु देतां ब्राह्मणा ॥ पूर्वजांसहित सदा आपणां ॥ नरकयातना प्राप्त होय ॥ ८३ ॥ म्हणोनि जियेनें ब्राह्मणाचें ॥ सानंद चित्त होईल साचें ॥ भक्तिभावें दान तियेचें ॥ यथाविधि कीजिये ॥ ८४ ॥ आणि ऐसें दान करितां ॥ अनंत पुण्य लागतें हाता ॥ गोदानाची उत्तम योग्यता ॥ किती म्हणोनि वर्णावी ॥ ८५ ॥ किती गोड म्हणावा सुधारस[7] ॥ किती वाड[8] म्हणावें आकाश ॥ तेजस्वी परम चंडांशु[9] ॥ किती म्हणोनी सांगावा ॥ ८६ ॥ पृथ्वीसी उपमा काय द्यावी ॥ पाताळा खोली किती वर्णावी ॥

१ पाणी. २ दान घेतल्याचा दोष. ३ मेल्यानंतर परलोकीं. ४ नरकांत. ५ वांझ. ६ विकळ झालीं आहेत अंगें जिचीं अशी. ७ अमृत. ८ विस्तृत, मोठें. ९ सूर्य.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

मेरूची उंची किती सांगावी ॥ नामाची पदवी अपार ॥ ८७ ॥ किती वर्णावा विष्णूचा प्रताप ॥ काय वर्णावें शिवाचें तप ॥ रतिकांताचें[1] दिव्यरूप ॥ किती म्हणून वानावें ॥ ८८ ॥ असो ऐसें गोदानफल ॥ कथिलें असे प्रिये सकल ॥ श्रवणमात्रें दुरितजाल ॥ जाय तत्काळ निरसोनी ॥ ८९ ॥ इति श्रीअधिकमासमाहात्म्यसार ॥ बृहन्नारदीयपद्माधार ॥ सज्जन श्रोते ऐकोत चतुर ॥ दशमाध्याय गोड हा ॥ ९० ॥ श्रीपुरुषोत्तमार्पणमस्तु ॥

॥ इति दशमोऽध्यायः ॥ १० ॥

१ मदनाचें.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

श्रीगणेशाय नमः ॥ दशमाध्यायामाजीं वहिला ॥ गोदानाचा प्रकार कथिला ॥ आतां ब्राह्मणपूजेचा भला ॥ प्रकार सर्व सांगतों ॥ १ ॥ तरी तुम्हीं श्रोतीं सतत ॥ सावध असावें श्रवणार्थ ॥ क्षीराब्धितनया श्रीविष्णूप्रत ॥ जोडूनि हस्त विनवी कीं ॥ २ ॥ अहो स्वामी पूर्वीं आपण ॥ स्वर्गेच्छू नरीं यथाविधान ॥ अधिकमासीं विप्रपूजन ॥ करावें ऐसें कथियेलें ॥ ३ ॥ तरी तो विप्र असावा कैंवी[2] ॥ तयाची पूजा कैसी करावी ॥ आणि तियेपासूनि मानवां बरवी ॥ कोणती फलप्राप्ति होय ॥ ४ ॥ हें मज सांगिजे समस्त ॥ ऐसें लक्ष्मीचें ऐकूनि भाषित ॥ श्रीविष्णु म्हणे गे प्रिये यथार्थ ॥ सांगतों संपूर्ण ऐक पां ॥ ५ ॥ तप अहिंसा सत्यवचन ॥ अनुदिनीं षट्कर्माचरण ॥ आणि सर्व कर्में कलालोपाविण ॥ करी तो ब्राह्मण योग्य होय ॥ ६ ॥ तयासी अधिकमासीं अनुदिनीं ॥ गंधाक्षतापुष्पधूपदीपांनीं ॥ नानोपहार[3] भक्ष्य भोज्य आणि ॥ तांबूलादिकांनीं पूजावें ॥ ७ ॥ आणि सर्वलक्षणसंयुक्त असून ॥ जो सर्वशास्त्रपारंगत सुज्ञ ॥ मत्परं[4] मद्भक्तिजाणता पूर्ण ॥ शांत दांत[5] साचार ॥ ८ ॥ तेवींच जो लोभरहित ॥ इतिहासपुराणज्ञ यथार्थ ॥ तयालागींच अधिकमासांत ॥ विशेषेंकरून पूजावें ॥ ९ ॥ कां कीं पुराणवक्ता ब्राह्मण ॥ हरिरूपचि असे आपण ॥ तयासी पूजूनि देतां दान ॥ अनंत फल प्राप्त होय ॥ १० ॥ जो भक्तीनें पुराणार्थ ॥ जाणूनि आत्मार्थ आणि परार्थ ॥ निरंतर कथी तो यथार्थ ॥ श्रीहरिच जाण पां ॥ ११ ॥ पुराणवक्ता जो ब्राह्मण ॥ तो व्यासरूपी हरिच आपण ॥ तयाची भक्ति करितां अनुदिन ॥ गंगास्नान फल लाभे ॥ १२ ॥ संसारसागरमग्नजनांसी ॥ जो पुराणधर्मनिवेदनेंसी ॥ उद्धरितो पैं क्षणमात्रेंसी ॥ तो श्रीहरिच साचार ॥ १३ ॥ म्हणोन अधिमासामाजीं सतत ॥ कोणत्याहि निर्मळ उदकांत ॥ स्नान करोनी पुराणवक्त्याप्रत ॥ भगवद्बुद्धीनें पूजावें ॥ १४ ॥ अधिकमासामाजीं एक ॥ पुराणज्ञासी सेवितां देख ॥ प्रयागस्नानाहुनि अधिक ॥ पुण्य निःशंक लाभतें ॥ १५ ॥ अधिकमासकथा जेथ ॥ नित्यनेमें वर्णिल्या जात तेथ ॥ श्रीहरि तुळसीसहित ॥ आणि तीर्थें समस्त वसताती ॥ १६ ॥ पुराणज्ञ सुपात्राविषयीं ॥ भक्ति उपजे जयांच्या हृदयीं ॥ तेचि धन्य त्रैलोक्याठायीं ॥

१ लक्ष्मी. २ कसा. ३ पूजासामग्री. ४ मजविषयीं तत्पर. ५ इंद्रियें जिंकणारा.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

पुनरपि नाहीं जन्म तयां ॥ १७ ॥ आतां तूं पात्र म्हणसी कोण ॥ तरी सांगतों करीं श्रवण ॥ केवळ तपें कीं विद्येंकरून ॥ पात्रता पूर्ण नव्हेचि ॥ १८ ॥ वेदवेत्ता द्विज पात्र किंचित ॥ तपीळ तोही स्वल्पचि निश्चित ॥ ऐसे एकांगी पात्रभूत ॥ असती बहुत पृथ्वीवरी ॥ १९ ॥ परी तपाचरण आणि सत्य ॥ जयाठायीं वसती नित्य ॥ तोचि त्रैलोकीं कृतकृत्य ॥ पात्र स्तुत्य जाणिजे ॥ २० ॥ आणि सर्व पात्रांमाजीं पवित्र ॥ तोचि जाण परमोत्तम पात्र ॥ कीं जयाच्या उदरीं अपवित्र ॥ शूद्रान्न नाहीं प्रवेशलें ॥ २१ ॥ प्रतिग्रहार्थ समर्थ असोन ॥ जो विप्र न घे कदापि दान ॥ तयें दान दीधल्याविण ॥ बहुदानपुण्य तया होय ॥ २२ ॥ विद्यातपोहीन ब्राह्मणें ॥ प्रतिग्रह कदापि नच घेणें ॥ घेतां दात्यासह तत्क्षणें ॥ अधःपतन होय तया ॥ २३ ॥ आणि ज-याचें मन नाहीं तुष्ट ॥ तो सर्वदा भोगितो कष्ट ॥ आणि सकळ त्रैलोक्यामाजीं नष्ट ॥ ऐसाहि स्पष्ट गणिजे तो ॥ २४ ॥ आणि स्वयें अकिंचन आसोन ॥ सर्वत्र जयाचें संतुष्ट मन ॥ तो विप्र सर्वदा सुख संपूर्ण ॥ भोगितो जाण निश्चयें ॥ २५ ॥ यथालाभ संतुष्टचित्त ॥ शांत दांत भूतदयावंत ॥ ऐसे ब्राह्मण जे कां संत ॥ तयां मी सतत वंदितों ॥ २६ ॥ जे संतांहूनि अन्य मानव ॥ स्वल्पतपें पावले देवभाँव ॥ तयांचें अर्चन दर्शनादि सर्व ॥ असे वावें निश्चयें ॥ २७ ॥ आत्मशुद्ध्यर्थ महातीर्थें ॥ आणि चांद्रायणादि तपोव्रतें ॥ बहु असती परी तीं निरुतें ॥ कालांतरें फल देती ॥ २८ ॥ आणि साधुजन ते तत्काळ ॥ दर्शनमात्रें करिती निर्मळ ॥ म्हणोनि सर्वां सोडूनि केवळ ॥ सज्जनचि उपासावे ॥ २९ ॥ भेदद्रष्टे जन सतत ॥ सूर्यचंद्रादि दैवतें उपासित ॥ परी तीं तयांच्या पापनाशार्थ ॥ नव्हेत समर्थ कदापि ॥ ३० ॥ आणि सद्विप्र ते तों क्षणसेवेनें ॥ पुनीत करिती सेवकांकारणें ॥ म्हणोनि साँक्षेपें भक्तिभावानें ॥ साधु विप्रचि सेवावा ॥ ३१ ॥ त्रिदोषदूषित देहाठायीं ॥ जयांची आत्मबुद्धि राही ॥ ग्रहणादिपर्वकालांविषयीं ॥ कीं क्षेत्रातिषयीं पुण्यबुद्धि ॥ ३२ ॥ कीं जळाविषयीं तीर्थबुद्धी ॥ परी साधु-



१ दान घेण्याविषयीं. २ नरकपात. ३ द्रव्यहीन ( दरिद्री. ) ४ देवपण. ५ व्यर्थ. ६ खरोखर. ७ बुद्धिपुरःसर. ८ कफ, वात व पित्त या तीन दोषांनीं अथवा सत्व, रज व तम या तीन गुणांनीं दूषित अशा देहावर.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

जनांविषयीं त्रिशुद्धि[1] ॥ जयाची न हो तैशी सुधी[2] ॥ तो नर खरचि[3] जाणावा ॥ ३३ ॥ जयांच्या हृदयीं स्वानंदानुभव ॥ आणि सर्वदा वसे श्रीकेशव ॥ तेवींच सर्वत्र समभाव ॥ ऐसे भूदेव[4] संत जे ॥ ३४ ॥ ते लोकानुग्रहकर्ते असत ॥ म्हणोनि केवळ लोकांप्रत ॥ स्वपादरजें पवित्र करित ॥ मेदिनीं सतत फिरताती ॥ ३५ ॥ दर्शनस्पर्शनादिकें निगुती ॥ सकळजनां पवित्र करिती ॥ ऐसीं क्षेत्रें तीर्थें दैवतें अती ॥ मेदिनी वरुतीं आहेत ॥ ३६ ॥ परी तीं हळुहळू कालांतरें ॥ पवित्र करिती गे मम दारे[5] ॥ आणि सद्विप्र ते तों निर्धारें ॥ दर्शनमात्रें तत्काळ ॥ ३७ ॥ ऐसा साधुविप्रांचा स्वभाव ॥ काय वर्णूं गे त्यांचा प्रभाव ॥ तयीं मज दीधलें वैभव ॥ म्हणोनी केशव मी झालों ॥ ३८ ॥ सकळ प्राण्यांमाजीं ब्राह्मण ॥ जन्ममात्रेंचि अति श्रेयान[6] ॥ आणि तपोविद्यासद्धक्तिमान ॥ झालिया मग काय वर्णूं ॥ ३९ ॥ ब्राह्मणापेक्षां अन्य मज कांहीं ॥ हें चतुर्भुज रूपही प्रिय नाहीं ॥ सर्वदेवमय मी शेषशाई ॥ तैसाचि विप्रही वेदमय ॥ ४० ॥ परी दुष्प्राज्ञ[7] मूर्ख ते हें नेणुनी ॥ गुरु विप्र आत्मा मी यांलागुनी ॥ अर्चादिविषयीं भेदबुद्धि होउनी ॥ अवमानिती साचार ॥ ४१ ॥ आणि सद्विप्र ते तों आत्मार्थ ॥ हे चराचर विश्व समस्त ॥ मद्रूपचि आहे सतत ॥ ऐसें चित्तांत भविती ॥ ४२ ॥ सत्स्वरूप दिव्यज्ञानेंसी ॥ निश्चयें धरिती तैसेंचि मानसीं ॥ म्हणोनी सद्विप्र ते मजसी ॥ आवडती जाण इंदिरे ॥ ४३ ॥ यालागींच विबुधजनांनीं[8] ॥ इतर सकळ कल्पना टाकुनी ॥ नित्यशुद्धचित्तें करूनी ॥ विप्रर्षिलागुनी पूजावें ॥ ४४ ॥ प्राणप्रिये बहु सांगुं काय ॥ ऐसा पूजितां सद्विप्रवर्य ॥ त्रिभुवन पूजिलें ऐसें होय ॥ निःसंशय जाण तूं ॥ ४५ ॥ परी ब्रह्मस्वाचा अपहार ॥ कदापि कोणीं न कीजे साचार ॥ कारण तें बहु भयंकर ॥ आणि दुर्जर[9] असें पैं ॥ ४६ ॥ सर्वभक्षक आहे कृशान[10] ॥ परी त्या न जिरे तें अणुप्रमाण ॥ मग ईश्वरमानियां[11] राजालागुन ॥ कोठूनियां जिरेल ॥ ४७ ॥ हालाहलविषाहूनिहि देख ॥ ब्रह्मस्वरूप विष अधिक ॥ मंत्रौषधीयोगें विषें सकळिक ॥ तत्क्षणें निःशंक नासतीं

---

१ कधींही. २ चांगली बुद्धि. ३ गर्दभ. ४ ब्राह्मण. ५ स्त्रिये. ६ कल्याणरूप श्रेष्ठ. ७ वाईट बुद्धि ज्यांची. ८ पंडित जनांनीं. ९ न जिरणारें. १० अग्नि. ११ मीच ईश्वर ( मोठा समर्थ ) असें मानणाऱ्या.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

विप्रा तुज कां चळ लागला ॥ उभयतांचा विवाद चालला ॥ मग ते आले मजपाशीं ॥ ८३ ॥ ते स्वार्थतत्पर दोघेजण ॥ बोलूं लागले मजलागून ॥ राया तूं आहेसि कवण ॥ दाता किंवा अपहर्ता ॥ ८४ ॥ अरे एकासी दिलेली गाय ॥ पुन्हां दुजासी देतोसि काय ॥ दत्तापहरण[1] हा न्याय ॥ तुजलागींच शोभतो ॥ ८५ ॥ तें तयांचें ऐकूनि भाषित ॥ मजला झाला भ्रम अत्यंत ॥ तयांची प्रार्थना केली बहुत ॥ परी ती व्यर्थ जाहली ॥ ८६ ॥ पूर्वील विप्रासी लक्ष गाया ॥ देऊं लागलों यदुराया ॥ परी ह्या न घें म्हणोनियां ॥ टाकूनियां गेला तो ॥ ८७ ॥ दुजानें[2] कथिलें ह्या धेनूविण ॥ दहा लक्षही न घें मी आन ॥ मग तो तीच धेनु घेऊन ॥ स्वगृहा जाता जाहला ॥ ॥ ८८ ॥ पुढें मी पावतां निधन ॥ यमदूत गेले घेऊन ॥ यमधर्मराय मजलागुन ॥ प्रश्निता झाला ऐसें कीं ॥ ८९ ॥ अरे तूं प्रथम शुभ भोगिसी ॥ कीं अशुभचि भोगूं इच्छिसी ॥ तुवां केलेल्या पुण्यकर्मासी ॥ अंत नसे साचार ॥ ॥ ९० ॥ तेव्हां म्यां तया सांगितलें ॥ अशुभचि सर्व भोगितों पहिलें ॥ तें ऐकूनि यमधर्में कथिलें ॥ पतन पावें सत्वर ॥ ९१ ॥ तंव मी झालों सरठरूप ॥ तेथें दुःखें भोगिलीं अमूप ॥ तव दास्याचा महाप्रताप ॥ म्हणोनि अद्याप स्मृति असे ॥ ९२ ॥ आज तुझें दर्शन झालें ॥ याणें सर्व पाप लोपलें ॥ हें दिव्य स्वरूप लाभलें ॥ त्रिजगीं धन्य जाहलों ॥ ९३ ॥ आतां येतों गा यदुपती ॥ कृपादृष्टीं पाहें मजप्रती ॥ ऐसें बोले तो नृगभूपती ॥ तंव दिव्य यान पातलें ॥ ९४ ॥ तयामाजीं बैसोन तत्क्षणीं ॥ नृगराज गेला ब्रह्मसदनीं ॥ असो श्रीहरी चक्रपाणी ॥ सिंधुजेलागीं सांगत ॥ ९५ ॥ अहो कांते नृगराजालागुन ॥ ब्रह्मस्वयोगें जाहलें पतन ॥ परी पूर्वी सत्समागम पूर्ण ॥ घडला होता तयासी ॥ ९६ ॥ तेणें योगें त्या घोरवनीं ॥ श्रीकृष्णाचें दर्शन होउनी ॥ तयाच्या करस्पर्शेंकरूनी ॥ उद्धरोनियां गेला तो ॥ ९७ ॥ ऐसा सत्संगतीचा महिमा ॥ म्हणोनि तेथें ठेवितां प्रेमा ॥ इहपरलोकीं सकळकामा ॥ पूर्णता होय निश्चयें ॥ ९८ ॥ आणि साधूंचें दर्शन स्पर्शन ॥ कीर्तन किंवा अनुस्मरण ॥ महातीर्थांपरि पावन ॥ आहे जाण सिंधुजे[3] ॥ ९९ ॥ यालागीं सकल जनांनीं ॥ साधुपूजन कीजे अनुदिनीं ॥

१ दिलेल्याचें हरण करणें. २ दुसऱ्या. ३ हे सागरकन्ये ( लक्ष्मी ).



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तेणें योगें कैवल्यदानी ॥ संतुष्ट राहतो सर्वदा ॥ १०० ॥ त्यांतूनिही अधिकमासांत ॥ सद्ब्राह्मण पूजितां सतत ॥ त्रैलोक्य पूजिलें ऐसें यथार्थ ॥ होतें यांत संशय नसे ॥१॥ जरी सर्वलक्षणीं सुसंपन्न ॥ ऐसा कोणी न मिळे ब्राह्मण॥ तरी एकेक लक्षणें युक्त महान ॥ त्याचेंहि पूजन करावें ॥ २ ॥ अधिमासीं विप्र पूजितां ॥ तृप्त होती सर्व देवता ॥ ब्राह्मणार्चनाविण रिता ॥ दिवस वृथा दवडूं नये ॥ ३ ॥ गंगादितीर्थीं स्नानेंसीं ॥ जें महापुण्य ये हातासी ॥ त्याहूनि विशेष अधिकमासीं ॥ विप्रार्चनेंसीं येत असे ॥ ४ ॥ विप्रार्चनापरता नेम ॥ दुसरा नसेचि पैं उत्तम ॥ धर्मार्थमोक्ष आणि काम ॥ याणेंच सकळ साधती ॥ ५ ॥ ऐसा विप्रार्चनाचा प्रभाव ॥ म्हणोनि अन्य टाकोनि सर्व ॥ ब्राह्मणाची पूजाच सदैव ॥ पुरुषोत्तममासीं कीजिये ॥ ६ ॥ ऐसें विष्णूनें कथिलें असतां ॥ आनंदोनि क्षीराब्धिदुहिता ॥ विनयपूर्वक दीपदानवार्ता ॥ तयासी प्रश्निती जाहली ॥ ७ ॥ ती कथा परम पावन ॥ पुढच्या प्रसंगीं वर्णिजेल पूर्ण ॥ तरी श्रोतेजनीं स्वांतःकरण ॥ सावधान राखिजे ॥ ८ ॥ इति श्रीअधिकमासमाहात्म्यसार ॥ बृहन्नारदीयपद्माधार ॥ सज्जन श्रोते ऐकोत चतुर ॥ एकादशोऽध्याय गोड हा ॥ १०९ ॥ ॥ छ ॥

॥ इति एकादशोऽध्यायः ॥ ११ ॥

---

१ मोक्षदाता. २ लक्ष्मी.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

श्रीगणेशायनमः ॥ ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ ॥ इंदिरा[1] म्हणे हो भगवंता ॥ देवदेवा कैवल्य[2]नाथा ॥ अधिकमासीं दीपदान करितां ॥ कोणतें फल प्राप्त होय ॥ १ ॥ आणि अधिकमासीं देवाजवळ ॥ दीप लाविला असतां सोज्वळ ॥ किंवा परें लाविल्याचें केवळ ॥ रक्षण केलें असतां पैं ॥ २ ॥ कोणतीं फलें प्राप्त होतीं ॥ आणि पूर्वी कोणीं केलें जगतीं ॥ हें मज लोकहितार्थ निश्चितीं ॥ सांगोनि आर्ती[3] पुरविजे ॥ ३ ॥ आणि कोणत्या द्रव्यें करावा दीपक ॥ वर्तीसि[4] तंतु असावे कितिक ॥ आणि रक्षावा किती दिनावधिक ॥ तें मज सकळिक सांगापा ॥ ४ ॥ ऐशी इंदिरेची ऐकोनि वाणी ॥ श्रीहरी म्हणे हे सद्गुणखाणी ॥ जेणें सकळ पातकांलागुनी ॥ नाश तत्क्षणीं होतसे ॥ ५ ॥ मातृपितृहत्त्यारी गोघ्न ॥ ब्रह्महा गुरुतल्पग[5] कृतघ्न ॥ सर्वघाती कूटसाक्षी[6] स्त्रीघ्न ॥ इत्यादि महापातकी जे ॥ ६ ॥ तेही मुक्त होऊनि जेणें ॥ निर्जरलोकीं[7] करिती ठाणें ॥ शुद्धात्मे ते यदाचरणें ॥ शाश्वत मुक्तीतें पावती ॥ ७ ॥ आणि तयांच्या शतकुलांचा ॥ उद्धार होय पैं साचा ॥ ऐसा ज्या परम विशुद्ध कर्माचा ॥ महिमा असे अत्यनुपम ॥ ८ ॥ तें अधिमासींचें दीपदान कर्म ॥ यद्यपि असे गोप्य परम ॥ तथापि तूं मत्प्राणप्रिया उत्तम ॥ म्हणोन तुज तें सांगतों ॥ ९ ॥ शुक्लप्रतिपदेपासून ॥ अमावास्या होय जों पूर्ण ॥ तोंवरी न होतां रविसंक्रमण ॥ मलमास तो होतसे ॥ १० ॥ तेव्हां शुक्लप्रतिपदादिनीं ॥ उषःकालीं[8] आनंदें उठोनी ॥ यथोक्त शौचविधी सारुनी ॥ मुखमार्जन करावें ॥ ११ ॥ मग संगमीं किंवा नदींत ॥ किंवा निर्झरीं[9] ह्रदांत[10] ॥ कीं तडागीं[11] वापींत वा कूपांत ॥ किंवा गृहांतचि शीतोदकें ॥ १२ ॥ अथवा ऊष्णोदकें करून ॥ यथाविधी करावें स्नान ॥ जैसें जयाचें शक्तिमान ॥ तैसेंचि तेणें आचरावें ॥ १३ ॥ ऊष्णोदकें स्नान करितां ॥ स्नानफळ संपूर्ण ये हातां ॥ शीतोदकाच्या स्नानें तत्वतां ॥ द्विगुण फल प्राप्त होय ॥ १४ ॥ कूपस्नानें चतुर्गुण ॥ वापीस्नानें अष्टगुण जाण ॥ तडागस्नानाचें महिमान ॥ दशगुणित असे पैं ॥ १५ ॥ तडागस्नानाच्या दशगुणित ॥ ह्रदस्नानाचें फळ निश्चित ॥ ह्रदाहूनि दशगुणें

१ लक्ष्मी. २ मोक्षाचा धनी. ३ इच्छा. (आवड.) ४ वातीला. ५ गुरुपत्नीप्रत गमन करणारा. ६ खोटी साक्ष देणारा. ७ देवलोकीं ८ प्रभातीं. ९ झऱ्याच्या जागीं. १० डोहांत. ११ तलावांत.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

ख्यात ॥ निर्झरस्नान जाणिजे ॥१६॥ त्याहूनि दशगुणें अधिक ॥ नदीस्नानाचें पुण्य देख ॥ तद्दशगुणें पुण्य फलदायक ॥ महानदीं स्नान असे ॥ १७ ॥ त्याहूनिही शतगुणें आगळें ॥ महानदी संगमस्नान कथिलें ॥ यांतूनि कोठेंही भलें ॥ स्नान कीजे विधियुक्त ॥ १८ ॥ शुक्ल तिल आणि आमलक[१] चूर्ण ॥ गोमूत्रासहवर्तमान ॥ सर्वांगासी प्रथम लावून ॥ मग स्नान आचरावें ॥ १९ ॥ तैं * देवदेवेत्यादि मंत्र ॥ म्हणूनि प्रार्थावा नीरदगात्र[२] ॥ श्रोते जन हो तन्मंत्रार्थ पवित्र ॥ सांगतों श्रोत्र द्या येथें ॥ २० ॥ अगा देवदेवा हृषीकेशी ॥ तूं सुरासुरीं नमिला असशी ॥ पापक्षयार्थ मी ह्या मासीं ॥ स्नानार्थ सज्ज जाहलों असें ॥ २१ ॥ म्हणोन तूंतें करितों नमन ॥ तरी पुरुषोत्तमा कृपा करून ॥ ह्या मम कृत्यासी न होय विघ्न ॥ ऐसें करीं बा दयाळा ॥ २२ ॥ एवं भगवत्प्रार्थना करोनी ॥ सप्रेम विशुद्ध अंतःकरणीं ॥ पुष्करादि नाना तीर्थें स्मरोनी ॥ मग काय कीजे ऐक पां ॥ २३ ॥ गंगा नंदिनी नलिनी भागीरथी ॥ विष्णुपादाब्जसंभूता सीता मालती ॥ मलापहा त्रिपथगामिनी हैमवती ॥ जाह्नवी आणि त्रिदशेश्वरी ॥ २४ ॥ ही द्वादशनामावळी म्हणून ॥ यथाविधी सारावें स्नान ॥ मग करूनियां आचमन ॥ वस्त्रें परिधान करावीं ॥ २५ ॥ अहो मत्प्रिये क्षीराब्धिबाळे ॥ पूर्वीं जें असेल पाप केलें ॥ तें अधिकमास येतांक्षणीं सगळें ॥ कांपूं लागतें थरथरां ॥ २६ ॥ अधिक मासामाजीं एक वेळ ॥ विधियुक्त जरी स्नान घडेल ॥ तरी सप्तजन्मींचें पाप सकळ ॥ जातें तत्काळ वितळूनी ॥ २७ ॥ पूर्वदिनस्नानें आपेंआप ॥ दश जन्मार्जित नासे पाप ॥ शतजन्मींच्या पापांचा लोप ॥ मासार्ध स्नानें होतसे ॥ २८ ॥ आणि संपूर्णमासीं सतत ॥ स्नान करितां विधियुक्त ॥ सहस्रजन्मींचीं पापें समस्त ॥ समूळ नासतीं निश्चयें ॥ २९ ॥ तोंवरीच तमाची दाटणी ॥ जों न उगवे वासरमणी[३] ॥ तोंवरीच मद कीजे वारणीं[४] ॥ जोंवरी सिंह न देखिला ॥ ३० ॥ सिंधु गर्जे तोंवरीच पाहीं ॥ जों कलशोद्भव[५] देखिला नाहीं ॥ तोंवरी भूतांची परम घाई ॥ जों मंत्रवादी न देखिला ॥ ३१ ॥ तोंवरी सर्प



---

१ आंवळ्याचें चूर्ण. * ॥ देवदेव हृषीकेश सुरासुर नमस्कृत ॥ पापक्षयाय सास्नेऽस्मिन्स्नानार्थमहमुद्यतः ॥ संपादयत्वविघ्नेन पुरुषोत्तम ते नमः ॥ २ मेघश्याम. ३ सूर्य. ४ हत्तींनीं. ५ अगस्त्य ऋषि.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

फोंफावे क्रूर ॥ जंव न आला विनताकुमार ॥ तोंवरीच पापसंभार ॥ अधिमास स्नान नाहीं जों ॥ ३२ ॥ स्नान करिती जे न मलमासीं ॥ दारिद्र्यादि दुःखें न सोडिती त्यांसी ॥ म्हणोन कांते सर्वभावेंसी ॥ अवश्य स्नान कीजिये ॥ ३३ ॥ सर्व पापमळांचा अपकर्ष ॥ हा मास करितो निःशेष ॥ म्हणोनि वेदज्ञ ऋषीश ॥ मलमास ऐसें बोलती ॥ ३४ ॥ मल नाम असे पातकासी ॥ पुरुषोत्तमपूजक त्या मलासी ॥ स्नानदानदीपकादिकर्मेंसी ॥ भस्मसात् क्षणेंसी करितात ॥ ३५ ॥ माघादि पुण्यमास जे धन्य ॥ त्यांहूनिहि हा अधिक मान्य ॥ येथें करितां स्नानदानादि पुण्य ॥ अक्षय होय मत्प्रसादें ॥३६॥ अनंत फळांची इच्छा ज्यांसी ॥ तयीं पुण्य करावें ह्या मासीं ॥ कमले येथींचें पुण्यफळ तुजसी ॥ फार काय सांगूं पां ॥ ३७ ॥ केवळ धनाची इच्छा धरून ॥ येथें करितील किंचित पुण्य ॥ तरी तूं साक्षाल्लक्ष्मीहि तत्क्षण ॥ तयालागून मिळशील ॥ ३८ ॥ ऐसा हा मास पुरुषोत्तम ॥ म्हणोनि सांडूनि इतर काम ॥ येथें सकाळीं स्नानादिकर्म ॥ यथाविधी कीजिये ॥ ३९ ॥ दैवें अधिमास लाभला असून ॥ त्यांत न करितां कांहीं पुण्य ॥ प्रपंचींच होत जे निमग्न ॥ तयीं कैसें केलें कीं ॥ ४० ॥ पुण्यक्षेत्र सरसावावें ॥ तेथें कनकबीज पेरावें ॥ कीं कनकाचें ताट घडावें ॥ त्यांत वाढावें तृणबीज ॥ ४१ ॥ कीं अमृतकुंभ दैवें मिळावा ॥ तो नेऊन उकिरडां ओतावा ॥ कीं चिंतामणी फोडूनि आघंवा ॥ अभावें घालावा पायरी ॥ ४२ ॥ कीं सुरभी येतां घरीं ॥ ताडूनि घालावी बाहेरी ॥ कीं कल्पद्रुम उदेता द्वारीं ॥ बळें तोडूनि टाकावा ॥ ४३ ॥ कीं रंभा तोडूनि महामूर्खें ॥ अर्की वाढवाव्या कौतुकें ॥ कीं वोसंडूनि सतेज मौक्तिकें ॥ सिकतां हरळ भरावे ॥ ४४ ॥ कीं दवडूनियां बोलका शुकें ॥ प्रीतीं पाळावा जैसा काक ॥ तैसेच तयीं तें प्रापंचिक ॥ कृत्य केलें जाणिजे ॥ ४५ ॥ असो हो श्रोते पूर्वकथानका ॥ सिंहावलोकनन्यायें ऐका ॥ स्नान झालियावरी देखा ॥ वस्त्रें परिधान करावीं ॥ ४६ ॥ मग संध्यादि पूर्वान्हिक कर्म ॥ सारूनियां यथानेम ॥ मत्स्या-

---

१ गरुड. २ धोत्र्याचें बीज. ३ सुवर्णाचें. ४ पाकड. ५ सर्व. ६ कामधेनु. ७ कल्पवृक्ष. ८ केळीचें झाड. ९ रुईचीं झाडें. १० वाळू व खडे. ११ कीर.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

दिनामीं पुरुषोत्तम ॥ गंधादिकेंसी अर्चिजे ॥ ४७ ॥ मग सुवेदिकेवरी सुप्रभ ॥ एक ठेविजे अव्रण कुंभ ॥ आणि तदग्रभागीं दीपस्तंभ ॥ ताम्रमय एक ठेवावा ॥ ४८ ॥ त्यामाजीं पंचांगुल प्रमाण ॥ सप्ततंतूंची वात घालून ॥ घृतें किंवा तैलेंकरून ॥ दीपप्रज्वलन करावें ॥ ४९ ॥ यथाविधी स्थापनपूर्वक ॥ पूजूनियां तो दीपक ॥ कुंभाचेही तैसेंचि सकळिक ॥ स्थापन पूजन करावें ॥ ५० ॥ मग जोडूनियां उभय हस्तांसी ॥ कीजे यथोक्त संकल्पासी ॥ दीप सकळ तमें नाशी ॥ आणि सुकांतीसी देतसे ॥ ५१ ॥ यालागीं हें दीपप्रदान ॥ करितों मी भक्तिभावें करून ॥ याणें श्रीपुरुषोत्तम भगवान ॥ संतुष्ट राहो सर्वदा ॥ ५२ ॥ अज्ञानांधकारें व्याप्त ॥ माया कल्लोळीं समायुक्त ॥ नाना पापांनीं परिपूरित ॥ ऐसा हा घोर संसार जो ॥ ५३ ॥ यामाजीं ज्ञान मोक्षदाता ॥ दीप असे पैं सर्वथा ॥ म्हणोन हे श्री भगवंता ॥ तुज म्यां हा आर्पिला असे ॥ ५४ ॥ तरी म्यां दीधल्या ह्या दीपोत्तमा ॥ घेईं तूं श्रीपुरुषोत्तमा ॥ आणि प्रसादसुमुख होऊनि आम्हां ॥ वांछितार्थप्रद होईं ॥ ५५ ॥ ऐसी प्रार्थना करूनि मग ॥ नाना मंगलसंयुक्त चांग ॥ सानंदचित्तें यथोक्त सांग ॥ कुंभपूजन करावें ॥ ५६ ॥ एवं संपूर्ण मासपर्यंत ॥ अखंड दीप स्थापिजे प्रदीप्त ॥ आणि नित्यपूजाविधिही यथोक्त ॥ भक्तिभावें आचरावा ॥ ५७ ॥ यथाशक्ति ब्राह्मणभोजन ॥ भक्त्या कीजे दक्षिणाप्रदान ॥ आणि मासांतीं रात्रौ जागरण ॥ प्रीतिपूर्वक करावें ॥ ५८ ॥ इंदिरे ऐशा विधीनें नर ॥ दीप करिती अधिमासाभीतर ॥ ते पुनरावृत्तिरहित सुंदर ॥ परमस्थान पावती ॥ ५९ ॥ गोभूहिरण्यादिदानांनीं ॥ जें फल प्राप्त मानवांलागुनी ॥ तें अधिमासीं दीपदानाचेनी ॥ लाभतें जाण निःसंशय ॥ ६० ॥ दीपदात्यासी लाभे सुकांति ॥ दीपदासि मिळे धनसंपत्ति ॥ दीपदासी होय ज्ञानप्राप्ती ॥ अंतीं मोक्षही त्या होय ॥ ६१ ॥ दीपदाता सौभाग्य पावत ॥ दीपद होय सुविद्यावंत ॥ आयुरारोग्यसमृद्धि बहुत ॥ निश्चयें लाभत दीपदासी ॥ ६२ ॥ अधिमासींच्या दीपद नरा ॥ सुलक्षणयुक्त मिळे शुभ दारा ॥ पुत्रपौत्रादि संतति सुंदरा ॥ अक्षय होय निश्चयें ॥ ६३ ॥ जरी दीपदाता असेल ब्राह्मण ॥ तरी तया होय ब्रह्मज्ञान ॥ क्षत्रियासी

१ चांगल्या वेदीवर. २ घट. ३ अंधकार.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

राज्य सुसंपन्न ॥ वैश्यासी धन पशु अक्षय ॥ ६४ ॥ शूद्रासी सर्व सुख लाभत ॥ कुमारी सुंदर भर्ता पावत ॥ सधवांसी सौभाग्य अखंडित ॥ जन्मजन्मीं लाभतें ॥ ६५ ॥ आधिव्याध्यादि दुःखें सकळ ॥ दीपदानें लोपतीं समूळ ॥ त्रैलोक्यभरी अति निर्मळ ॥ कीर्ती विपुल पसरते ॥ ६६ ॥ भीतजनांची जाते भीति ॥ बंधनांतूनि बद्ध सुटती ॥ ब्रह्महत्यादि पापें निश्चिती ॥ समूळ लोपतीं एकसरें ॥ ६७ ॥ अधिकमासामाजीं ज्याणें ॥ दीप लाविला यथाविधीनें ॥ कृच्छ्रचांद्रायणादि तेणें ॥ केलीं जाण निःसंशय ॥ ६८ ॥ ऐसा अधिकमासींच्या दीपाचा ॥ उत्तम महिमा असे साचा ॥ म्हणोनि प्रिये सांगतों सुवाचा ॥ दीपदान येथें कीजिये ॥ ६९ ॥ येथींच्या ज्वलितदीपा पाहुनी ॥ जे प्रवर्तती दीपस्तवनीं ॥ तेही सुरालभ्यस्थानालागुनी ॥ पावती जाण साचार ॥ ७० ॥ आणि जे कां अधिकमासाठायीं ॥ दीपप्रज्वालनाचे विषयीं ॥ नाना गोष्टी सांगूनि पाहीं ॥ दुसऱ्यासी प्रेरणा करितात ॥ ७१ ॥ ते सर्वपापविनिर्मुक्त होऊन ॥ निश्चयें पावती वैकुंठभुवन ॥ याविषयीं कमले पुरातन ॥ एक इतिहास सांगतों ॥७२॥ ऐसें बोलूनि नारायण ॥ सांगूं लागले कथा पावन ॥ पूर्वीं सरस्वतीतीरीं ब्राह्मण ॥ सुशर्माभिधान वसतसे ॥ ७३ ॥ तो माझा एकांतिक भक्त ॥ भिक्षाचारें कुटुंब पोशित ॥ यथाविधी श्रीविष्णुव्रत ॥ पूजूनि स्थापित दीपासी ॥ ७४ ॥ ऐसा तयाचा नेम चालिला ॥ तों अधिकमास प्राप्त झाला ॥ तेव्हां तयानें पुरुषोत्तमाला ॥ पूजूनि स्थापिला दीप तेथें ॥ ७५ ॥ आणि रात्रौ हरीसी हृदयीं ॥ चिंतूनि सदनीं स्थिर राही ॥ तैं नित्य निशीसमयीं ॥ मार्जार येई मूषकार्थ ॥ ७६ ॥ ऐसा नित्य क्रम चालला ॥ तों एकादशीदिवस आला ॥ सुशर्माविप्र पुरुषोत्तमाला ॥ पूजिता झाला यथाविधी ॥ ७७ ॥ आणि नामसंकीर्तन करित ॥ रात्रौ बैसला जागरार्थ ॥ तों मध्यरात्रीं मूषकार्थ ॥ मार्जार घरांत पातला ॥ ७८ ॥ वर्तीवरुती काजळी वाढली ॥ तेणें दीपकांति मंदावली ॥ इतक्यामाजीं दीपाजवळी ॥ मूषकावली आली असे ॥ ७९ ॥ तियेवरुती त्या मार्जारें ॥ उडी घातली महानिकरें ॥ तैं तयाच्या पादकप्रकारें ॥ दीपस्तंभ थरारला ॥ ८० ॥ काजळी सर्व गेली झडून ॥ दीप झाला प्रकाशमान ॥ प्रभातीं कांहीं कारणें करून ॥ मार्जार मरण पावला ॥८१ ॥ परी तत्पाद



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

प्रहारें करून ॥ जें घडलें दीपसंवर्धन ॥ तेणें पुण्यें तो विमानीं तत्क्षण ॥ बैसूनि वैकुंठीं पावला ॥ ८२ ॥ आणि तो सुशर्मानामा द्विज ॥ भिक्षावृत्ति असोनि सहज ॥ दीपप्रभावें तेजःपुंज ॥ समृद्धिमान जाहला ॥ ८३ ॥ पुत्र पौत्र धान्य विपुळ ॥ शरीरारोग्य ऐश्वर्य अचळ ॥ आणि पृथ्वीभरी यश निर्मळ ॥ विस्तारलें तयाचें ॥८४॥ असो ऐसा तो सुशर्मा ब्राह्मण ॥ इहलोकीं झाला सुखसंपन्न ॥ अंतीं दीपप्रभावेंकरून ॥ मोक्षसदन पावला ॥ ८५ ॥ ऐसेच प्रिये इतरहि लोक ॥ उद्धरूनियां गेले अनेक ॥ अधिमासींच्या दीपाचें कौतुक ॥ सांगूं कितीक तुजलागीं ॥ ॥ ८६ ॥ पुरुषोत्तममासीं यथाविधी ॥ दीप लावितां देवासन्निधीं ॥ अंतीं दुस्तर भवांबुधी ॥ तराया न लगे आयास ॥ ८७ ॥ अधिकमासींच्या दीपासमान ॥ आणिक नाहीं कांहीं पावन ॥ ऐसें साक्षात् रमारमण ॥ रमेसी कथिता जाहला ॥ ८८ ॥ इति श्रीअधिकमासमाहात्म्यसार ॥ बृहन्नारदीयपद्माधार ॥ सज्जन श्रोते ऐकोत चतुर ॥ द्वादशाध्याय मधुर हा ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ इति द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

॥ श्रीगणेशाय नमः ॥ ॥ पूर्वाध्यायाचे अंतीं कथन ॥ अधिमासींच्या दीपासमान ॥ आणिक नसेचि जगीं ॥ पावन ॥ ऐसें हरीनें कथियेलें ॥ १ ॥ ती पद्मभूंजनकाची[1] वाणी ॥ ऐकूनियां ती चंद्रभगिनी[2] ॥ परमादरें जोडूनि पाणी ॥ पुनरपि हरीतें विनवित ॥ २ ॥ अहो प्रभो देवाधिदेवा ॥ कैवल्यनाथा[3] श्रीमाधवा ॥ स्वभक्त जनांच्या मनोभावा ॥ तुम्ही पुरवा सर्वकाळ ॥ ३ ॥ म्हणोनि विभो मी तुम्हाप्रती ॥ प्रार्थीत आहें पैं मागुती[4] ॥ मज-लागीं दीपकथा निगुती ॥ अतिरसाळ कथिलीत ॥ ४ ॥ परी एकदां केलें सुधापान ॥ तितुक्यानें नाहीं समाधान ॥ म्हणोनि पुनःपुनः गीर्वाण[5] ॥ तयासी जाण करितात ॥ ५ ॥ तैसें ह्या मधुर कथेनें पाहीं ॥ मम हृदय धालें[6] नाहीं ॥ म्हणोनि तियेच्या श्रवणाविषयीं ॥ अधिक इच्छा झाली असे ॥ ६ ॥ तरी हे देवा होऊनि दयाळ ॥ पुरवा माझ्या मनींची आळ ॥ अधिकमासींच्या दीपाचें फळ ॥ सांगा सकळ पुनरपि ॥ ७ ॥ आणि कोणीं लाविला दीपक ॥ तो विध्वंसितां काय पातक ॥ तेंही यथार्थ सकळिक ॥ सांगोनि सार्थक करावें ॥ ८ ॥ ऐशी पद्मेची ऐकूनि वाणी ॥ आनंदें बोले कैवल्यदानी ॥ क्षीराब्धिजे तूं मत्प्रिय कामिनी ॥ धन्य सुगुणी आ-हेस ॥ ९ ॥ तरी पुनश्च दीपाचें फळ ॥ अन्य सांगतों ऐकें निर्मळ ॥ दीपविध्वंसें पूर्वार्जित सकळ ॥ पुण्य तत्काळ लोपतें ॥ १० ॥ पूर्वी मथुरापुरामाझारीं ॥ शाकली विप्र सदाचारी ॥ वसतसे तयाच्या नारी ॥ रूपसुं-दरी दोन होत्या ॥ ११ ॥ एकीचें नाम असे विमला ॥ दुसरीचें तें जाण सुशीला ॥ दोघीहि पतिव्रता पतिसेवेला ॥ तत्पर असती अहर्निशीं ॥ १२ ॥ जैसा तो शाकली ब्राह्मण ॥ सद्धर्मेंशीं वर्ते अनुदिन ॥ तैशाच त्याही रात्रं-दिन ॥ शुभाचारें वर्तती ॥ १३ ॥ तेणें तयाचा गृहस्थाश्रम ॥ नित्य चालला असे उत्तम ॥ तों पुरुषोत्तमाचा प्रिय परम ॥ अधिकमास प्रवर्तला ॥ १४ ॥ तैं नित्यकर्मानुरोधें प्रभातीं ॥ शाकली भार्या सुशील सती ॥ उद-कालागीं यमुनेप्रती ॥ एकलीच पैं गेली असे ॥ १५ ॥ तों तेथें नगरवासी लोक ॥ स्नानार्थ येत आहेत अनेक ॥ हें पाहतांचि ती घेऊनि उदक ॥ स्वगृहाप्रत पातली ॥ १६ ॥ आणि वंदूनियां पतीचे चरण ॥ विनयें बोले

१ ब्रह्मदेवाच्या पित्याची ( विष्णूची ). २ लक्ष्मी. ३ हे मोक्षपते ! ४ पुनः ५ देव. ६ तृप्त झालें.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

मधुर वचन ॥ स्वामी इच्छितें कराया प्रश्न ॥ परी कोप न कीजे दयाळीं ॥ १७ ॥ आज बहुतेक पुरवासी ॥ स्नानार्थ जातात यमुनेसी ॥ तरी पुण्यकाळ ह्या दिवशीं ॥ काय आहे सांगिजे ॥ १८ ॥ ही सुशीलेची ऐकोनि वाणी ॥ शाकली म्हणे ग कल्याणरूपिणी ॥ आज लोक यमुनेलागुनी ॥ यदर्थ जाती ऐक तें ॥ १९ ॥ सूर्यसंक्रांति नाहीं जयांत ॥ आणि विष्णुसी प्रिय अत्यंत ॥ ऐसा जो अधिकमास विख्यात ॥ तो आजि प्राप्त जाहला ॥ ॥ २० ॥ यामाजीं जें पुण्यकर्म कांहीं ॥ करावें तें होतें अक्षयीं ॥ दीपप्रबोधकतें पाहीं ॥ वैकुंठाठायीं नांदती ॥ ॥ २१ ॥ या पुण्यकारक अधिमासीं ॥ जो दीप देई पुरुषोत्तमासी ॥ तो पुनश्च कदा भूमीसी ॥ न ये जन्मासी निश्चयें ॥ २२ ॥ यालागीं हे कल्याणरूपिणी ॥ मुक्तिकामना जयांच्या मनीं ॥ तयीं ह्या मासीं अनुदिनीं ॥ यथाविधि स्नानीं प्रवर्तावें ॥ २३ ॥ आणि संपूर्ण मासपर्यंत ॥ दीप करावा अखंडित ॥ ऐसें करितां जें फल यथार्थ ॥ प्राप्त होय मनुष्यांसी ॥ २४ ॥ तयाचें समग्र कराया वर्णन ॥ समर्थ नव्हे चतुर्वदन ॥ तेथें मी एक मुखेंकरून ॥ काय वर्णूं सुशिले ॥ २५ ॥ एवं पतीच्या ऐकूनि बोला ॥ अत्यानंदें म्हणे सुशीला ॥ स्वामी हें भवदाज्ञें करावयाला ॥ उत्साह मनाला झाला असे ॥ २६ ॥ पतीच्या आज्ञेविण स्त्रियांनीं ॥ कोणतेंहि कर्म करितां झणीं ॥ सर्व निष्फल होतें म्हणोनि ॥ अनुज्ञेलागुनी याचितें ॥ २७ ॥ ऐसी तियेची ऐकूनि वैखरी ॥ शाकली म्हणे ग सुंदरी ॥ पतिप्रिय तें हित मानणारी ॥ त्वत्सम नारी दुजी नसे ॥ २८ ॥ यालागीं मी झालों प्रसन्न ॥ तरी आज्ञें[1] यथाविधान ॥ स्नान आणि दीपप्रज्वलन ॥ करीं तूं कांते ह्या मासीं ॥ २९ ॥ ऐशी पतीची आज्ञा मिळतां ॥ आनंदली ती पतिव्रता ॥ मग कालिंदीजळामाजीं स्वतां ॥ स्नान केलें यथाविधि ॥ ३० ॥ आणि घटस्थापनापूर्वक ॥ यथाविधि उजळिला दीपक ॥ नित्य गंधाद्युपचारीं सकौतुक ॥ अर्चन करी तयाचें ॥ ३१ ॥ आणि नित्यव्रतपतीस पुजून ॥ तदनुज्ञें तद्भुक्तशेषान्न[2] ॥ यज्ञशेष ऐसें मानून ॥ प्रेमें भोजन करीतसे ॥ ३२ ॥ ऐसें ती पतिव्रता यथोक्त ॥ अधिकमासीं व्रत आरंभित ॥ तें पाहूनि तियेची सवत ॥ विमला दुःखित जाहली ॥ ३३ ॥

१ त्यांच्या ( पतीच्या ) आज्ञेनें. २ त्यानें ( पतीनें ) जेवून राहिलेलें अन्न.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

गृहकार्य सकळ टाकिलें ॥ सपत्नीद्वेषा[1] आकळिलें ॥ सर्वदा ती मनीं तळमळे ॥ परी न कळे अन्यासी ॥ ३४ ॥ काय करितां आतां मजसी ॥ सुख होईल निश्चयेंसीं ॥ आणि सपत्नीच्या[2] ह्या व्रतासी ॥ विघ्न कैसें उद्भवेल ॥३५॥ ऐसा विचार करितां करितां ॥ कल्पना उदेली कीं आतां ॥ दीपांतूनि तैल म्यां हरितां ॥ तत्काळचि तो मावळेल ॥ ३६ ॥ तेणें सपत्नीचें व्रत लोपून ॥ मच्चित्त पावेल समाधान ॥ ऐसें अंतरीं निर्धारून ॥ संधि योजित राहिली ॥ ३७ ॥ तों गृहीं दुसरें नाहीं कोणी ॥ ऐसी वेळा एकदां पाहुनी ॥ त्या दुष्टेनें गृहद्वार झांकुनी ॥ दीप तत्क्षणीं मालविला ॥ ३८ ॥ आणि त्यामाजील सर्व तैल ॥ हरण करूनि तत्काळ ॥ जैशी तैशीच उतावेळ ॥ द्वारीं येऊन राहिली ॥ ३९ ॥ पुढें सदनीं आली सुशीला ॥ तों दीप असे मावळला ॥ हें पाहतांचि मनीं तियेला ॥ दुःख अत्यंत जाहलें ॥ ४० ॥ मग मागुती[3] उजळूनि दीप ॥ तिलतैल घातलें अमूप ॥ आणि देवें स्वोपरि[4] न कीजे कोप ॥ म्हणोनि प्रार्थिलें तयासीं ॥ ४१ ॥ द्वितीयदिनीं सुशीला सती ॥ कार्यार्थ बाहेर गेली होती ॥ आणि शाकली विप्र तियेचा पती ॥ गृहाबाहेर गेला असे ॥ ४२ ॥ इतुक्यांत त्या दुष्ट विमलेनें ॥ दीप उच्छेदिला त्वरेनें ॥ नंतर येऊनि सुशीलेनें ॥ पुनरपि तो उजळिला ॥ ४३ ॥ आणि ती होऊनि दुःखसंतप्त ॥ बाहेर न जातां कार्यार्थ ॥ श्रीहरीतें हृदयीं ध्यात ॥ गृहकर्मचि करूं लागली ॥ ४४ ॥ तथापि ती विमला पापिणी ॥ सुशीलेची दृष्टि चुकवुनी ॥ जातां जातां फूत्कारेंकरूनी ॥ दीपालागुनी विझवीतसे ॥ ४५ ॥ केव्हां केव्हां तैल हरावें ॥ केव्हां वस्त्रांचलें पालवावें ॥ ऐसें रात्रंदिन दुष्टस्वभावें ॥ विघ्न करावें दीपासी ॥ ४६ ॥ तें तियेचें सकळ कृत्य ॥ सुशीलेनें जाणिलें सत्य ॥ परी तियेतें स्तुत्यास्तुत्य ॥ कांहींच नाहीं बोलली ॥ ४७ ॥ पुनः पुनः दीप लावून ॥ भर्तृ-देवांच्या[5] प्रसादेंकरून ॥ अमावास्यापर्यंत जाण ॥ व्रत तियेनें पाळिलें ॥ ४८ ॥ मग शेवटीं बहुब्राह्मणा ॥ दीधलें नानापक्वान्नभोजना ॥ यथाशक्ति देऊनि दक्षिणा ॥ व्रतसांगता साधिली ॥४९॥ एवं प्रकारें सुशीलेनें ॥ दीपव्रत केलें विधीनें ॥ तेणें पुण्यें इह परत्रीं उणें ॥ कांहीं न पडलें तियेसी ॥५०॥ आणि

१ सवतीच्या द्वेषास. २ सवतीच्या. ३ पुनः ४ आपल्यावर. ५ पति व देव यांच्या.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

त्या दुष्ट विमलेलागुनी ॥ दीपोच्छदजन्य पापाचेनी ॥ अनंत दुःखांची जाचणी ॥ तत्काळ प्राप्त जाहली ॥ ५१ ॥ रूप सुंदर पुत्र तीन ॥ ते अवचित पावले मरण ॥ उभयनेत्रीं अंधत्व पूर्ण ॥ आणि शरीरें जीर्ण जाहली ॥ ५२ ॥ वेळच्यावेळीं अन्नपाणी ॥ न मिळे तेणें चरफडे मेदिनी ॥ पुढें स्वल्पचि काळें मरुनी ॥ यमसदनीं पावली ॥ ५३ ॥ ती सहस्रवर्षें तेथ ॥ रौरव नरकीं राहिली पचत ॥ वृश्चिक सर्पादि डंखिती सतत ॥ यातना अत्यंत घोर त्या ॥ ५४ ॥ पुढें जन्मोनि ग्रामसूकरी ॥ सतत विष्ठा भक्षण करी ॥ तेथूनि पुढें घोर कांतारीं ॥ सर्पिणी जाहली भयंकर ॥ ५५ ॥ तेथें सर्वदा भक्षी वात ॥ अन्य न मिळे कांहीं पदार्थ ॥ पुढें देहांतीं अन्यवनांत ॥ वंचक कोल्ही जन्मली ॥ ५६ ॥ पुढें होऊनि वडवाघुळी ॥ स्वविष्ठा भक्षी सर्वकाळीं ॥ तेथूनि पुढें जन्मोनि पाली ॥ भक्ष्य हुडकी सर्वदा ॥ ५७ ॥ पुढें पल्लीदेह होऊन नष्ट ॥ मद्रदेशीं भिल्लीण जन्मली दुष्ट ॥ तियेच्या अंगीं गलितकुष्ट ॥ मंडलाकार जाहलें ॥ ॥ ५८ ॥ ऐसें ती विमला पापिणी ॥ दीपविध्वंस पापाचेनी ॥ इहपरत्रीं दिवसरजनीं ॥ पापें भोगिती जाहली ॥ ५९ ॥ आणि सुशीला ती जन्मभर ॥ सुख भोगूनियां अपार ॥ संतति स्थापूनि भूमीवर ॥ पतिसह वैकुंठीं पावली ॥ ६० ॥ जेथूनि नाहीं पुनरावृत्ति ॥ ती तीस मिळाली सायुज्यमुक्ती ॥ ऐसा अधिमासींच्या दीपाचा अति ॥ महिमा असे साचार ॥ ६१ ॥ आणि नारी किंवा नर जे कोण ॥ अधिमासामाजीं अनुदिन ॥ स्नान दीप किंवा विप्रसेवन ॥ यथाविधान करितात ॥ ६२ ॥ तयां नाहीं पुनरावृत्ति ॥ गर्भवेदना तत्काळ मिटती ॥ आणि ही कथा ऐकती पढती ॥ तेहि पावती त्याच फळा ॥ ६३ ॥ ऐसें हरीचें ऐकूनि भाषित ॥ पुनरपि लक्ष्मी प्रश्नि त्याप्रत ॥ ती बहुरसाळ कथा समस्त ॥ पुढच्या प्रसंगीं होईल पां ॥ ६४ ॥ इति श्रीअधिकमासमाहात्म्यसार ॥ बृहन्नारदीयपद्माधार ॥ सज्जन श्रोते ऐकोत चतुर ॥ त्रयोदशोऽध्याय मधुर हा ॥ ६५ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

॥ इति त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ इंदिरा म्हणे हो वनमाळी ॥ तुम्ही दीपाची कथा कथिली ॥ परी मदिच्छा[1] नाहीं पुरली ॥ तरी आणिक सांगा पां ॥ १ ॥ ऐशी रमेची[2] ऐकूनि वैखरी[3] ॥ श्रीविष्णु म्हणे गे प्रिये सुंदरी ॥ पुरुषोत्तममासामाझारीं ॥ यथोक्त दीप करिती जे ॥ २ ॥ तयांचीं सर्व पापें लोपतीं ॥ इहपरत्रीं[4] सुख पावती ॥ एतदर्थ आणिक तुजप्रती ॥ इतिहास सांगतों ॥ ३ ॥ तरी करीं एकाग्र चित्त ॥ पूर्वी सौभाग्यनामनगरांत ॥ चित्रबाहुनामें विख्यात ॥ राजा असता जाहला ॥ ४ ॥ तो शूर वीर सत्यप्रतिज्ञ ॥ स्वदारानिरत[5] महाप्राज्ञ[6] ॥ दीनदयाळू सर्वधर्मज्ञ ॥ अति उदार सुलक्षणी ॥ ५ ॥ शीलरूपादिगुणसंपन्न ॥ पशुपुत्रधनसमृद्धिमान ॥ पुत्रवत्पाळी प्रजाजन ॥ इच्छी कल्याण सर्वांचें ॥ ६ ॥ शांत दांत भगवद्भक्त ॥ पुराणकथा ऐके सतत ॥ श्रीकृष्णावांचूनी दैवत ॥ अन्य न मानीच कदापि ॥ ७ ॥ तयाची भार्या लावण्यसरिता ॥ चंद्रकलानामें पतिव्रता ॥ द्विजसेवेलागीं उभयतां ॥ तत्पर असती सर्व काळ ॥ ८ ॥ एके समयीं अगस्त्यमुनी ॥ पातला राजगृहालागुनी ॥ तया दुरुनचि विलोकूनी ॥ राव तत्क्षणीं धाविन्नला ॥ ९ ॥ दंडवत् करूनियां नमन ॥ यथाविधि केलें पूजन ॥ रत्नासनावर बैसवून ॥ हस्त जोडून प्रार्थित ॥ १० ॥ म्हणे हो मुनिवरा आपण ॥ श्रीकृष्णभक्तिपरायण ॥ आजि स्वयें कृपा करून ॥ मम सदना आलां जे ॥ ११ ॥ याणें माझें जन्म सकळ ॥ राज्यासह झालें सफळ ॥ काय हा आजचा दिवस निर्मळ ॥ धन्य केवळ जाहलों ॥ १२ ॥ त्रिजगत्पावन हे चरण ॥ लागतां पवित्र झालें सदन ॥ ब्रह्मांडीं शोधितां भाग्यवान ॥ मजसमान नाहींच ॥ १३ ॥ आजि कृपापूरितनयनीं[7] ॥ विलोकिलेंति मजलागुनी ॥ ह्यानें सकळपापांपासुनी ॥ मुक्त झालों साचार[8] ॥ १४ ॥ आतां म्यां हें राज्य संपूर्ण ॥ तुम्हालागीं केलें अर्पण ॥ तुम्ही महावैष्णव ब्राह्मण ॥ म्हणोन सर्व अर्पिलेंसे ॥ १५ ॥ आजि म्यां तुम्हालागीं कांहीं ॥ अदेय[9] ऐसें नाहींच नाहीं ॥ वैष्णवजनां देतां स्वल्पही ॥ कनकाद्रितुल्य[10] होय पैं ॥ १६ ॥ अहो

१ माझी इच्छा. २ लक्ष्मीची. ३ वाणी. ४ या लोकीं व परलोकीं. ५ आपल्याच पत्नीशीं रममाण. ६ मोठा ज्ञाता. ७ कृपेनें भरलेल्या नेत्रांनीं. ८ खरोखर. ९ देण्याला अयोग्य असें १० मेरुपर्वतासमान.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

 

जो वैष्णवद्विजालागुन ॥ अन्न किंवा कांहीं व्यंजन¹ ॥ अणुमात्रहि दीधल्यावांचुन ॥ रिता दिवस दवडितो ॥ १७ ॥
तयाचा तो दिवस निष्फळ ॥ ऐसें बोलती वेदज्ञ निर्मळ ॥ विष्णुभक्त द्विज ते सकळ ॥ पूज्य असती सर्वदा ॥ १८ ॥
तयांची संभावना अनुदिनीं ॥ वाङ्मनःकायकर्मांनीं ॥ करावी ऐसें गर्गादिमुनीं ॥ मजलागुनी कथिलेंसे ॥ १९ ॥
द्विज तितुके सर्वहि श्रेष्ठ ॥ तथापि त्यांत वैष्णव वरिष्ठ ॥ म्हणोन इतरांपेक्षें स्पष्ट ॥ वैष्णवद्विजचि पूजावे ॥ २० ॥
जोंवरि सूर्य उदेला नाहीं ॥ तोंवरी तारांची प्रभा राही ॥ तेवींच वैष्णवद्विज जों नाहीं ॥ तोंवरि अन्य द्विज
सर्व ॥ २१ ॥ ऐसी ती चित्रबाहूची वाणी ॥ ऐकूनियां तो अगस्त्यमुनी ॥ म्हणे गा राया आजि तूं भुवनीं ॥
धन्य धन्य आहेस ॥ २२ ॥ तेवींच ह्या सकळ प्रभा ॥ अति धन्य आहेत भूभुंजा² ॥ जो तूं महावैष्णव राजा ॥
यांसी रक्षित आहेसि ॥ २३ ॥ जयाचा राजा वैष्णव नाहीं ॥ न वसावें त्या राष्ट्राठायीं ॥ अवैष्णव राष्ट्रापेक्षें
पाहीं ॥ शून्य वनही वरिष्ठ ॥ २४ ॥ नेत्रहीन जैसें शरीर ॥ कीं पतिहीन नारी साचार ॥ कीं ब्राह्मण जैसा
निरक्षर ॥ तैसेंचि राष्ट्र अवैष्णव ॥ २५ ॥ दंतरहित जैसा कॅरी³ ॥ पक्षहीन खग⁴ निर्धारी ॥ कीं नखदंष्ट्रारहित केसरी⁵ ॥
तैसेंचि राष्ट्र अवैष्णव ॥ २६ ॥ कीं दर्भहीन संध्यावंदन ॥ कीं तिलरहित जैसें तर्पण ॥ किंवा वृत्त्यर्थ देवसेवन ॥
तैसेंचि राष्ट्र अवैष्णव ॥ २७ ॥ कीं विधवा नारी केशसहित ॥ कीं स्नानहीन जैसें व्रत ॥ कीं ब्राह्मणीगामी शूद्र
पतित ॥ तैसेंचि राष्ट्र अवैष्णव ॥ २८ ॥ अरे जो श्रीकृष्णचरणभक्त ॥ त्यासचि राजा ऐसें म्हणत ॥ आणि
त्याचेंचि राष्ट्र वाढे सतत ॥ सुखी होतात तत्प्रजा ॥ २९ ॥ आजि म्यां तुज देखिलें म्हणोन ॥ माझे सफळ झाले
नयन ॥ तुजशीं घडलें भाषण तयानें ॥ वाणी सफळ जाहली ॥ ३० ॥ आसो राया त्वां राज्य अर्पिलें ॥ हें
सर्वहि मज पोंचलें ॥ तथापि आतां तूंचि हें सगळें ॥ माझिये आज्ञें सांभाळीं ॥ ३१ ॥ ह्या सर्वहि राज्यावरती
तुझीच स्थापना केली प्रीतीं ॥ आतां मी जातों स्वस्थानाप्रती ॥ सदा असो तव कल्याण ॥ ३२ ॥ ऐसें बोलूनि
अगस्त्यमुनी ॥ जावया उठला तेथुनी ॥ तंव त्या रायाची पट्टराणी ॥ चंद्रकला तेथें पातली ॥ ३३ ॥ तिणें



१ शाक भाजी. २ हे राजा. ३ हत्ती. ४ पक्षी. ५ सिंह.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

अनन्यभक्तिभावेंसी ॥ नमस्कार केला त्या मुनीसी ॥ तैं तो अगस्त्यमुनि तियेसी ॥ शुभवचनेंसी बोलत ॥ ३४ ॥
हे कल्याणि तुज जन्मभर ॥ अवैधव्य असो निरंतर ॥ स्वपतीलागीं सदा सादर ॥ भक्तिभावें भजें तूं ॥ ३५ ॥
गोपीजनवल्लभाविषयीं ॥ दृढभक्ति वसो तव हृदयीं ॥ त्रिजगामाजीं संतियांठायीं ॥ प्रमुख होईं तूं एक ॥ ३६ ॥
ऐसा आशीर्वाद दे मुनिवर ॥ तंव तो चित्रबाहु राजेश्वर ॥ जोडूनियां उभय कर ॥ तया सादर विनवी कीं॥३७॥
अहो मुनिवरा आपण ॥ करस्थामलकवत् संपूर्ण ॥ भूतभविष्यादि जाणतां म्हणून ॥ ऐसा हा प्रश्न करिताहें॥३८॥
ही अखंडित लक्ष्मी विपुल ॥ अकंटक राज्य सकळ ॥ आणि पतिव्रता पत्नी निर्मळ ॥ हीं मज कैशीं लाभलीं॥
॥ ३९ ॥ म्यां काय केलें पुण्याचरण ॥ तें मज सांगा विवरून ॥ शरणागताचें समाधान ॥ करा दयाळा सत्वर
॥ ४० ॥ ऐसें रायें प्रार्थितां क्षणीं ॥ मुनिवर्य समाधि लावुनी ॥ अंतरीं सकळ वृत्त जाणुनी ॥ राया लागुनी
बोलत ॥ ४१ ॥ राया तुझें प्राक्तनचरित ॥ समाधिमाजीं देखिलें समस्त ॥ तें तुज आतां साद्यंत ॥ सांगतों ऐकें
साक्षेपें ॥ ४२ ॥ अरे तूं पूर्वजन्मामाझारीं ॥ चमत्कारनामक नगरीं ॥ मणिग्रीवनामें दुराचारी ॥ शूद्रजाति
होतास ॥ ४३ ॥ तेव्हां तेथें तूं दिवसरात ॥ असंख्य जीवहिंसा करित ॥ परदारागमनीं सतत ॥ रममाण असू-
नियां ॥ ४४ ॥ नास्तिक्य आणि कृतघ्नपण ॥ हेचि सर्वदा स्वीकारून ॥ शिष्टाचार सर्व सोडून ॥ औद्धत्यें वर्तत
होतास ॥ ४५ ॥ आणि ही चंद्रकला तव जायाँ ॥ पूर्वजन्मींहि तुझीच भार्या ॥ सुंदरीनामें गुणवती आर्या ॥
पतिव्रता होती पैं ॥ ४६ ॥ कायावाचामनेंकरून ॥ पतीसी सेवी रात्रंदिन ॥ संकटींहि धैर्य धरून ॥ स्वधर्माचरण
करीतसे ॥ ४७ ॥ भ्रताराचें वर्तन दुष्ट ॥ परी त्यावर नव्हे कदा रुष्ट ॥ तयासी जें कां असे इष्ट ॥ तेंच सदा
आचरी ॥ ४८ ॥ ऐसी ती सुंदरी सद्गुणखाणी ॥ परी तो मणिग्रीव दुष्ट म्हणोनी ॥ तयाच्या बंधुज्ञातिजनांनीं ॥
त्याग केला तयाचा ॥ ४९ ॥ बृहद्बळरायें कोपूनि बळें ॥ तयाचें सर्व द्रव्य हरिलें ॥ यत्किंचित् जें कां उरलें ॥
तेंहि घेतलें ज्ञातींनी ॥ ५० ॥ ऐसें जातां द्रव्य समस्त ॥ तया धनेच्छा झाली बहुत ॥ सकळजन तिरस्कारित ॥

---

१ पतिव्रतांमध्यें. २ तळहातांतील आंवळ्याप्रमाणें. ३ उघड करून. ४ वर्तमान. ५ पूर्वजन्मींचें. ६ उद्धटपणानें. ७ स्त्री.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

मुख न पाहत कोणीही ॥ ५१ ॥ तो मणिग्रीव महापापी ॥ अकिंचन[1] झाला तथापि ॥ तद्भार्या[2] सती कदापी ॥ तया सोडून जाईना ॥ ५२ ॥ मग तो तियेसी सवें घेउनी ॥ प्रवेशला निर्जनवनीं ॥ नानाविध जीव मारुनी ॥ उदरपोषण करीतसे ॥ ५३ ॥ ऐसा तो मणिग्रीव सतत ॥ वनामाजीं स्वस्त्रीसहित ॥ दुर्वृत्तें असतां वर्तत ॥ काळ बहुत लोटला ॥ ५४ ॥ पुढें एकदां मृगयेलागुन ॥ प्रवेशला घोर कानन ॥ हातीं घेऊनि धनुर्बाण ॥ मृग टेळित फिरताहे ॥५५॥ तों उग्रदेवनामें तापसी ॥ चालला असतां प्रयागासी ॥ मार्ग चुकोनि त्या वनासी ॥ अकस्मात पावला ॥ ५६ ॥ पुढें मार्ग दिसेना त्याला ॥ दोन प्रहर दिवस आला ॥ क्षुधातृषांनीं व्याकुळ झाला ॥ उदक कोठें मिळेना ॥ ५७ ॥ चालतां थकले दोन्ही चरण ॥ वरती तापे चंडकिरण[3] ॥ कासावीस झाले प्राण ॥ मूर्च्छा येऊन पडियेला ॥ ५८ ॥ तों मणिग्रीव मृग टेळित ॥ तये स्थळीं पातला अवचित ॥ विप्रासी पाहूनियां मूर्च्छित ॥ दयें अत्यंत कळवळला ॥ ५९ ॥ हरहर देवा काय हें म्हणून ॥ विप्र उचलिला तेथून ॥ हळूच स्वाश्रमीं नेऊन ॥ अंगणामाजीं ठेविला ॥ ६० ॥ सवेंच पाचारूनि प्रियेसी ॥ दंपती[4] लागलीं विप्रसेवेसी ॥ वारंवार तदीयनेत्रांसी[5] ॥ शीतळोदक लावित ॥ ६१ ॥ उभी राहोनि पार्श्वभागीं ॥ कमळपत्रीं वारित वेगीं ॥ शीतळ मृणालें[6] उत्तमांगीं[7] ॥ पुनः पुनः ठेवित ॥ ६२ ॥ ऐसे विविध शीतोपचार ॥ चालवितां मुहूर्तभर[8] ॥ तो उग्रदेव द्विजवर ॥ सचेतन जाहला ॥ ६३ ॥ उघडूनियां दोन्ही नयन ॥ चहूंकडे पाहे विलोकून ॥ तंव तें स्थलांतर देखून ॥ बहु आश्चर्य जाहलें ॥ ६४ ॥ आणि विचारित अंतःकरणीं ॥ मी आज होतों कवणे वनीं ॥ येथें मज आणिलें कोणी ॥ काय हें आहे अद्भुत ॥ ६५ ॥ ऐसें चिंतित उठोनि बैसला ॥ तों मणिग्रीव पुढें पातला ॥ हस्त जोडूनि उग्रदेवाला ॥ म्हणे सावध झालां कीं ॥ ६६ ॥ आतां कृपा कीजे मजवरी ॥ येथें आहे शीतळ वारी[9] ॥ तेथें स्नान करूनि सत्वरी ॥ नित्यकर्म सारावें ॥ ६७ ॥ नंतर करूनि फलाहार ॥ यथेच्छ प्यावें



१ दरिद्री. २ त्याची स्त्री. ३ सूर्य. ४ नवरा-बायको. ५ त्याच्या नेत्रांस. ६ कमळाचीं पाळें. ७ मस्तकावर. ८ दोन घटिका. ९ पाणी.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

शीतळ नीर ॥ मग बैसोनि मुहूर्तभर ॥ विश्रांति घ्यावी सुखानें ॥ ६८ ॥ भय न धरावें अंतरांत ॥ मी रक्षिता आहें सांप्रत ॥ मजसंगें चलावें त्वरित ॥ दयाळीं प्रसाद कीजिये ॥ ६९ ॥ तें तयाचें ऐकूनि वचन ॥ उग्रदेव उठला तत्क्षण ॥ मणिग्रीवें हस्त धरून ॥ सरोवरतीरीं पोंचविला ॥ ७० ॥ तेथें महावट वृक्षाखालीं ॥ क्षण-मात्र विश्रांति घेतली ॥ तदनंतर सरोवरजळीं यथोक्तस्नान सारिलें ॥ ७१ ॥ आणि सारूनियां नित्यान्हिकें[1] ॥ यथेच्छ प्राशिलें शीतोदक ॥ पुनश्च तीरीं येऊनि देख ॥ वटछायेसी बैसला ॥ ७२ ॥ तंव मणिग्रीव स्वस्त्रीप्रत ॥ म्हणे गे प्रिये आश्रमांत ॥ कंदमूळफळें बहुत ॥ आणून ठेविलीं आहेत जीं ॥ ७३ ॥ त्यांतील पाहूनि मधुर मधुर ॥ घेऊनियां येईं सत्वर ॥ मुनिवर्य आहेत क्षुधातुर ॥ उशीर फार लावूं नये ॥ ७४ ॥ तें पतीचें ऐकूनि वचन ॥ सुंदरी आनंदें गेली तत्क्षण ॥ कंदमूळफळें आणून ॥ विप्रापुढें ठेविलीं ॥७५॥ मग जोडूनियां दोन्ही हस्त ॥ मणिग्रीव म्हणे विप्राप्रत ॥ मुनींद्रा हीं भक्षुनी समस्त ॥ आम्हां कृतार्थ कीजिये ॥ ७६ ॥ आजि आम्हां तारावयासी ॥ आलेति मम आश्रमासी ॥ आमुचे सर्व पापांचे राशी ॥ भवद्दर्शनें[2] लोपले ॥ ७७ ॥ तें मणि-ग्रीवाचें ऐकूनि वचन ॥ उग्रदेव म्हणे रे तूं कवण ॥ आहेसि तें मजलागुन ॥ आदीं निवेदीं सकळिक ॥ ७८ ॥ जात्यादि[3] ठाउकें नाहीं ज्याचें ॥ विप्रें न भक्षावें कांहीं त्याचें ॥ ऐसें सकळ विद्वज्जनांचें ॥ सांगणें असे साक्षेपें ॥ ७९ ॥ ऐसें विप्राचें ऐकूनि वचन ॥ मणिग्रीव सांगे तयालागुन ॥ मुने मी मणिग्रीवाभिधान ॥ शूद्र असें साचार ॥॥ ८० ॥ मी दुष्टाचारें वर्तें अनुदिनीं ॥ यास्तव सर्व ज्ञातिजनांनीं ॥ मत्परित्याग केला म्हणोनी ॥ येथें येउनी राहिलोंसें ॥ ८१ ॥ ऐसें शूद्राचें ऐकूनि वचन ॥ उग्रदेव पावला समाधान ॥ कंदमूळफळें प्रक्षाळून ॥ भक्षावया लागला ॥ ८२ ॥ सुपक्व चूतफळें[4] रुचिक ॥ त्यांहूनिहि कंदमूळें अधिक ॥ आतृप्ति भक्षूनियां सकळिक ॥ त्यावर उदक प्राशिलें ॥ ८३ ॥ क्षुत्तृषांची झाली शांति ॥ समाधान वाटलें चित्तीं ॥ मग हात फिरवित पोटा-वरती ॥ वटछायेसी पहुडला[5] ॥ ८४ ॥ तंव मणिग्रीवें काय केलें ॥ स्वांकीं[6] मुनीचे चरण घेतले ॥ स्वकरीं हळूच

१ नित्यकर्म संध्या ब्रह्मयज्ञादि. २ तुमच्या दर्शनानें. ३ जाति गोत्र इत्यादि. ४ आम्रफळें. ५ निजला. ६ आपल्या मांडीवर.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

चुरीत वेहिले ॥ प्रश्न करित तयासी ॥ ८५ ॥ म्हणे हो मुनींद्रा आपण ॥ कोठें करित होतां गमन ॥ ह्या निर्जन-वनीं आगमन ॥ काय म्हणून जाहलें ॥ ८६ ॥ हें कांनन अत्यंत घोर ॥ येथें न मिळे कोठें नीर ॥ सर्वत्र वसती जंतु क्रूर ॥ येथें कैसे पातलां ॥ ८७ ॥ तें तयाचें ऐकूनि वचन ॥ विप्र म्हणे गा मी ब्राह्मण ॥ उग्रदेव माझें अभिधान ॥ जात होतों प्रयागास ॥ ८८ ॥ तों मध्येंच मार्ग चुकुनी ॥ पातलों ह्या दारुणवनीं ॥ मार्ग पुसायास पाहतां कोणी ॥ मनुष्य कोठें दिसेना ॥ ८९ ॥ चालतां चालतां थकले पाय ॥ मध्यान्हाचा झाला समय ॥ क्षुत्तृषांनीं पीडलों अतिशय ॥ कांहीं उपाय चालेना ॥ ९० ॥ मरणोन्मुख झालों तत्क्षण ॥ शोधितां न मिळे जीवन ॥ परी कांहीं पूर्वार्जित म्हणोन ॥ त्वदागमन जाहलें ॥ ९१ ॥ त्वां जीवदान दिलें मजसी ॥ आतां म्यां काय द्यावें तुजसी ॥ तुम्ही दंपती कवणदुःखेंसी ॥ अरण्यवासी जाहलां ॥ ९२ ॥ तें मजला सांगें त्वरित ॥ तुमचें दुःख हरितों समस्त ॥ ऐसें विप्राचें ऐकूनि भाषित ॥ शूद्र अत्यंत आनंदला ॥ ९३ ॥ आणि आपुलें सर्व वर्तमान ॥ कथिता झाला अनुक्रमान ॥ ती कथा परम पावन ॥ पुढच्या प्रसंगीं वर्णिजेल ॥ ९४ ॥ इति श्रीअधिकमासमाहात्म्यसार॥बृहन्नारदीयपद्माधार॥सज्जन श्रोते ऐकोत चतुर ॥ चतुर्दशाध्याय गोडहा ॥९५॥

॥ इति चतुर्दशोऽध्यायः ॥ १४ ॥

१ ते पाय. २ येणें. ३ अरण्य. ४ नांव. ५ उदक. ६ तुझें येणें.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

श्रीगणेशायनमः ॥ ॥ पूर्वाध्यायांतीं ऐसें वृत्त ॥ उग्रदेवें मणिग्रीवाप्रत ॥ तूं कोण कां वससी वनांत ॥ इत्यादि वृत्तांत प्रश्निला ॥ १ ॥ आतां जें कां तयाचें उत्तर ॥ मणिग्रीवें कथिलें सादर ॥ तेंचि मी येथें सविस्तर ॥ वर्णितों समग्र ऐकिजे ॥ २ ॥ मणिग्रीव म्हणे द्विजेंद्रा ऐक ॥ चमत्कारपुर नामक ॥ विद्वज्जनसमावृत्त एक ॥ उत्तम नगर आहे पैं ॥ ३ ॥ तेथें स्वस्त्रीसहवर्तमान ॥ सर्वदा मी रहात असोन ॥ मणिग्रीव माझें अभिधान ॥ शूद्र जाति पवित्र ॥ ४ ॥ बहु संपत्तिमान असोनी ॥ परोपकार करी अनुदिनीं ॥ तेणें सकळ जनांलागुनी ॥ अत्यंतचि प्रिय असें ॥ ५ ॥ परी दैवयोगें कदाचित ॥ मज दुर्बुद्धि झाली बहुत ॥ निजधर्म सोडिला समस्त ॥ बहु आकांत मांडिला ॥ ६ ॥ परस्त्रियांसी बळें धरून ॥ भोगूं लागलों अनुदिन ॥ नानाविध मद्यांचें पान ॥ रात्रंदिन चालविलें ॥ ७ ॥ साहसकर्मीं धरिलें धैर्य ॥ करूं लागलों हिंसा चौर्य ॥ लोक करिती बहु आश्चर्य ॥ सकळ आर्य त्रासले ॥ ८ ॥ ही धर्मपत्नी सती अबला ॥ हिणें सदुपदेश बहु केला ॥ परी तो म्यां नाहीं मानिला ॥ क्रम चालविला तैसाचि ॥ ९ ॥ ग्रामस्थ जन सर्व त्रासले ॥ गांवांतून मज हांकिलें ॥ तों बृहद्बळेरायें वहिलें ॥ बळें लुटविलें मम सदन ॥ १० ॥ शेष धन जें राहिलें कांहीं ॥ तेंही घेतलें बंधुजनांहीं ॥ तिरस्कार केला सकळिकांहीं ॥ वनाठायीं प्रवेशलों ॥ ११ ॥ ही मम कांता पतिव्रता ॥ इयेसी माझी बहु चिंता ॥ यास्तव सोडूनि मातापिता ॥ मज सर्वथा अनुसरली ॥ १२ ॥ तेव्हांपासोनि इयेसहित ॥ वसतों या घोर वनांत ॥ नाना जीव वधूनि सतत ॥ उदर भरीत राहिलोंसे ॥ १३ ॥ मी अत्यंत दुरात्मा पाहीं ॥ मजसम पापी कोणी नाहीं ॥ दुःख भोगितों सर्वदाही ॥ अनुग्रह कांहीं करावा ॥ १४ ॥ कांहीं होतें प्राचीन पुण्य ॥ म्हणोन आज हे दिसले चरण ॥ आतां ह्या स्त्रीसहवर्तमान ॥ तुम्हां शरण आलों असें ॥ १५ ॥ तरी दया करा हो मजवर ॥ तुम्ही दयाळ मुनिवर ॥ शरणागत जना अभयकर ॥ दुःख सत्वर निरसावें ॥ १६ ॥ जेणें माझें दरिद्र समूळ ॥ निरसोनियां जाईल सकळ ॥ आणि पावोनियां वैभव विपुल ॥ सुखें अचळ वर्तेन मी ॥ १७ ॥ ऐसें कांहीं उपदेशूनी ॥ कृतार्थ करावें मजलागुनी ॥



१ विद्वान लोकांनीं भरलेलें. २ नाम. ३ श्रेष्ठ लोक. ४ लग्नाची स्त्री. ५ बृहद्बळनामक राजानें. ६ पोट. ७ दुष्ट पापी.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

ऐसी शूद्राची ऐकूनि वाणी ॥ तयासी मुनि बोलत ॥ १८ ॥ हे मणिग्रीवा भाग्यवंता ॥ तूं कृतकृत्य आहेसी सर्वथा ॥ जे ह्या कांतारां[1]माजीं तत्वतां ॥ माझें आतिथ्यं[2] केलेंसी ॥ १९ ॥ तस्मात् तुझें स्वस्त्रीसहित ॥ पुढें कल्याण होणार खचित ॥ भावीशुभांचीं[3] सूचक यथार्थ ॥ चिन्हें पूर्वींच दिसतातीं ॥ २० ॥ आतां तीर्थव्रतदाना-विणें ॥ त्वद्दारिद्र्य निरसेल ज्याणें ॥ तें म्यां सर्व आपुल्या मनें ॥ निर्धारिलें साचार ॥ २१ ॥ आतां येईल तिसरा मास ॥ पुरुषोत्तम नाम तयास ॥ त्यांत तुम्ही दोघांनीं विशेष ॥ सांगतों ऐसें आचरावें ॥ २२ ॥ पुरुषोत्तम-प्रीत्यर्थ जाण ॥ दीप लावावा यथाविधान ॥ तेणें तुमचें दारिद्र्य तत्क्षण ॥ समूळ संपूर्ण निरसेल ॥ २३ ॥ तिल-तैलें वा घृतें निरुतीं ॥ दीप लावावा यथाशक्ति ॥ परी तीं तुम्हां दुर्लभ असतीं ॥ वनीं वसतां म्हणोनि ॥२४॥ तरी इंगुंदीतैलें[4] मासवरी ॥ स्त्रीसह नियमें दीप करीं ॥ नित्यस्नान या सरोवरीं ॥ सारूनि करीं हें कृत्य ॥ २५ ॥ हाचि माझा तुज उपदेश ॥ यानेंच दुःख निरसेल अशेष ॥ पावोनियां वैभव विशेष ॥ सुख तुम्हांस होईल पैं ॥ २६ ॥ तुम्हीं उत्तम आतिथ्य केलें ॥ तेणें माझें मन तोषलें ॥ म्हणोन वेदीं निश्चयिलेलें ॥ कर्म कथिलें तुम्हांस ॥ २७ ॥ अरे केवळ दीपदानेंसी ॥ लक्ष्मी वाढते निश्चयेंसी ॥ मग ते विधीनें अधिमासीं ॥ करितां काय वर्णावें ॥ २८ ॥ वेदोक्त कर्में दानें विविध ॥ नाना तीर्थें शास्त्रें अगाध ॥ योग ज्ञान सांख्य विशुद्ध ॥ तैसींच तंत्रें सकळ जीं ॥ २९ ॥ आणि सर्व वेद अभ्यासणें ॥ कृच्छ्रादि व्रतें आचरणें ॥ सदा गोमतीतट सेवणें ॥ श्राद्ध करणें गयेमाजीं ॥ ३० ॥ उपरागसहस्रें[5] आणि ॥ व्यतीपात शतपर्वणी ॥ कुरुक्षेत्रादि क्षेत्रें आणि ॥ दंडकादिक अरण्यें जीं ॥ ३१ ॥ तीं पावन असतीं सर्वही ॥ परी पुरुषोत्तमदीप जो कांहीं ॥ तयाच्या षोडशांकलेचीही[6] ॥ योग्यता नाहीं तयांस ॥ ३२ ॥ वेदोक्तकर्मादिकांहून ॥ अधिमासींचें दीपदान ॥ शतगुणें श्रेष्ठ असे म्हणोन ॥ यथाविधान कीजिये ॥ ३३ ॥ हें गुह्याहूनि गुह्य पाहीं ॥ कदा न सांगावें कोणासिही ॥ धनधान्य पशुपुत्रादि सर्वही ॥ प्राप्त

१ ज्यांत जाण्यास कठीण आहे अशा वनांत. २ आलेल्याचा सत्कार. ३ पुढें होणाऱ्या कल्याणांचीं. ४ हिंगणबेटाचे तेलानें. ५ सहस्रावधि ग्रहणें. ६ सोळाव्या अंशाचीही.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

होय ययाचेनी ॥ ३४ ॥ हें वंध्येचें वंध्यत्व हरितें ॥ स्त्रियांलागीं अवैधव्य करितें ॥ राज्यभ्रष्टातें राज्य देतें ॥ आणि पुरवितें चिंतितार्थ ॥ ३५ ॥ याचेनि कन्येलागीं तत्वतां ॥ दीर्घायु गुणी लाभतो भर्ता ॥ कांतार्थियातें पतिव्रता ॥ सुशिला कांता लाभते ॥ ३६ ॥ विद्यार्थियातें विद्या लाभती ॥ सिद्धिकांमुका सिद्धि मिळती ॥ कोशेच्छुजनां कोशप्राप्ती ॥ मोक्षार्थी पावती मोक्षास ॥ ३७ ॥ पुरुषोत्तमप्रीतीविषयीं ॥ पुरुषोत्तममासाठायीं ॥ विनाशास्त्र विनाविधीही ॥ कोठेंही दीप लाविती जे ॥ ३८ ॥ त्यांचें सकळ मनोरथ ॥ अनायासें पूर्ण होतात ॥ मग विधीनें लावितां यथास्थित ॥ जगीं अप्राप्त काय पां ॥ ३९ ॥ जी जी इच्छा धरावी मानसीं ॥ ती ती पुरवितो हृषीकेशी ॥ तस्मात् भावें पुरुषोत्तमासी ॥ दीप अवश्य कीजिये ॥ ४० ॥ हें सर्व दारिद्र्यनाशन ॥ तुज कथिलें दिव्य साधन ॥ याचिये आचरणें तुज तत्क्षण ॥ वैभव पूर्ण लाभेल ॥ ४१ ॥ तुम्ही माझी केलीत सेवा ॥ म्हणोन तोषलों मणिग्रीवा ॥ आतां येतों निरोप द्यावा ॥ सदा असो तव कल्याण ॥ ४२ ॥ ऐसें बोलूनियां तो मुनि ॥ श्रीहरीतें स्मरत मनीं ॥ मणिग्रीवाचा निरोप घेउनी ॥ प्रयागा चालता जाहला ॥ ४३ ॥ तेव्हां तयातें पोंचवित ॥ मणिग्रीव आणि त्याची योषित ॥ दोघेंही कांहीं दूर पर्यंत ॥ प्रेमें जातीं जाहलीं ॥ ४४ ॥ तेथें वंदूनि मुनीचे चरण ॥ स्वाश्रमा आलीं परतोन ॥ प्रयागासी गेला ब्राह्मण ॥ कामना पूर्ण जाहली ॥ ४५ ॥ इकडे वनीं ती शूद्रदंपती ॥ अंतरीं ठेवूनि द्विजभक्ती ॥ पुरुषोत्तमातें चिंतित चित्तीं ॥ काल क्रमिती आनंदें ॥ ४६ ॥ तों मासद्वय जाऊनि वहिला ॥ पुरुषोत्तममास आला ॥ जो कां साक्षात्पुरुषोत्तमाला ॥ प्रिय आगळा सर्वांत ॥ ४७ ॥ तेव्हां स्मरूनि त्या सद्गुरुतें ॥ तेणें जैसें कथिलें होतें ॥ तैसेचि तीं दंपती तेथें ॥ करिती झालीं साचार ॥ ४८ ॥ पुरुषोत्तमप्रीति द्वारें ॥ आपणा वैभव मिळावें सारें ॥ म्हणोनी प्रभातीं शीतंनीरें ॥ तडागीं स्नान करूनियां ॥ ४९ ॥ इंगुदीच्या शुद्धतैलेंसी ॥ दीप करित एकभावेंसी ॥ ऐसें आचरतां नित्यनेमेंसी ॥ अधिकमास लोटला ॥ ५० ॥ उग्रदेवाच्या प्रसादें तत्क्षण ॥ मनींचा

---

१ स्त्रीची इच्छा करणाऱ्यास. २ स्त्री. ३ सिद्धीची इच्छा करणारास. ४ द्रव्येच्छु जनांस. ५ पुष्कळ द्रव्य. ६ स्त्री ७ शूद्र जातीचीं नवरा बायको. ८ अधिक. ९ उग्रदेवमुनीतें. १० शीतोदकानें. ११ तळ्यांत.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

मळ गेला झडोन ॥ त्यावर दीपाचा प्रभाव महान ॥ झालीं पावन दोघेंही ॥ ५१ ॥ अंतःकरणीं आली शांति ॥ शांति येतांचि गेली खंती ॥ ठायींच मुराली विषयप्रीति ॥ जडली वृत्ति पुरुषोत्तमीं ॥ ५२ ॥ दोघेंही झालीं आनंदघन ॥ ऐसे लोटले कांहीं दिन ॥ पुढें पावोनियां निधन ॥ स्वर्गीं जातीं जाहलीं ॥ ५३ ॥ तेथें देवांसंगें सतत ॥ तत्रत्य[२] भोग भोगूनि अनंत ॥ उग्रदेवप्रसादें येथ ॥ उत्तम जन्म पावलीं ॥ ५४ ॥ पूर्वजन्मीं जो मणिग्रीव ॥ मृगहिंसक दुःखभाव ॥ तोच हा तूं चित्रबाहुराव ॥ सांप्रत झाला आहेसी ॥ ५५ ॥ आणि पूर्वजन्मामाझारीं ॥ जी तव पत्नी होती सुंदरी ॥ तीच ही सांप्रत तव नारी ॥ चंद्रकला झाली असे ॥ ५६ ॥ ही पातिव्रत्यधर्मेंकरूनी ॥ पूर्वजन्मीं वर्तली म्हणोनी ॥ सांप्रत तव अर्धांगहारिणी ॥ झाली पत्नी साचार ॥ ५७ ॥ ज्या कां पातिव्रत्यें वर्तत ॥ त्या पतिपुण्यार्धभागिनी होत ॥ हा सर्वशास्त्रांचा सिद्धांत ॥ अनुभवा येथें आलासे ॥ ५८ ॥ पूर्वजन्मीं अधिकमासीं ॥ इंगुदीतैलें दीप केलासी ॥ तेणें पुण्यें हें सांप्रत तुजसी ॥ अकंटक[३] राज्य लाभलें ॥ ५९ ॥ आणि त्याच पुण्यें हें विपुळ ॥ वैभव लाधलें तुज सकळ ॥ तैशीच ही सती[४] निर्मळ ॥ पत्नी सोज्वळ लाभली ॥ ६० ॥ अधिमासींचा दीप पावन ॥ तयाचा हा प्रभाव जाण ॥ राजेश्वरा तूं हस्त जोडून ॥ मजलागुन प्रश्निलें जें ॥ ६१ ॥ कीं ही अखंड लक्ष्मी विपुल ॥ अकंटक राज्य सकळ ॥ आणि पतिव्रता पत्नी निर्मळ ॥ हीं मज कैशीं लाभलीं ॥ ६२ ॥ म्यां काय केलें पुण्याचरण ॥ तें मज सांगा विवरून ॥ त्याचें उत्तर हें संपूर्ण ॥ तुजलागुन सांगितलें ॥ ६३ ॥ आतां मी जातों स्वस्थानाप्रत ॥ तव कल्याण असो सतत ॥ ऐसें सांगूनि मुनि त्वरित ॥ स्वस्थाना जाता जाहला ॥ ६४ ॥ आणि तो चित्रबाहु राजेश्वर ॥ सुख भोगून जन्मभर ॥ संतति स्थापूनी भूमीवर ॥ सदार[५] मुक्त जाहला ॥ ६५ ॥ जेथूनि नाहीं पुनरावृत्ति ॥ ती त्यास मिळाली सायुज्य मुक्ति ॥ ऐसें अधिमास दीपाचें निरुती ॥ माहात्म्य असे अद्भुत ॥ ६६ ॥ नारी किंवा नर जे कोण ॥ अधिमासामाजीं अनुदिन ॥ स्नान किंवा उपोषण ॥ यथाविधान करितात ॥ ६७ ॥ तयांसि नाहीं पुनरावृत्ति ॥ गर्भयातना तत्काळ सुटती ॥ आणि

१ दुःख. २ तेथील ( स्वर्गींचे. ) ३ शत्रुरहित. ४ पतिव्रता. ५ स्त्रीसहित.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

ही कथा पढती ऐकती ॥ तेही पावती त्याच पदा ॥६८॥ ऐसें हरीचें ऐकूनि भाषित ॥ पुनरपि लक्ष्मी प्रश्नी त्या प्रत ॥ ती कथा रसाळ समस्त ॥ पुढच्या प्रसंगीं वर्णिजेल ॥ ६९ ॥ इति श्रीअधिकमासमाहात्म्यसार ॥ बृहन्नारदीय पद्माधार ॥ सज्जन श्रोते ऐकोत चतुर ॥ पंचदशोऽध्याय गोड हा ॥ ७० ॥ ॥ ॥

॥ इति पंचदशोऽध्यायः ॥ १५ ॥



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

॥ श्रीगणेशायनमः ॥ ॥ इंदिरा[1] म्हणे हो वैकुंठनाथा ॥ सच्चिदानंदरूपिया समर्था ॥ भवतापहारका[2] भगवंता ॥ विश्वार्तिहर्ता[3] आहेस तूं ॥ १ ॥ यास्तव लोकोपकारार्थ ॥ तुजलागीं प्रश्नितें यथार्थ ॥ अधिकमासीं स्नानादि-कर्मार्थ ॥ जे कां असमर्थ असती पैं ॥ २ ॥ त्यांहीं शुभ कर्म करावें कायी ॥ कीं ज्या एकेचि कर्में लवलाहीं[4] ॥ स्नानादिकर्मांचें फल सर्वही ॥ प्राप्त होई निश्चयें ॥ ३ ॥ आणि अंतीं सायुज्यमुक्ती[5] ॥ लाभे जेणें सकळां निश्चतीं ॥ तें शुभ कर्म दयाळा संप्रती[6] ॥ कृपा करूनि मज सांगे ॥ ४ ॥ ऐसी श्रीची[7] प्रश्नवाणी ॥ ऐकून बोले शार्ङ्गपाणी ॥ प्रिये लोकानुग्रहकारिणी ॥ उत्तम प्रश्न केलासी ॥ ५ ॥ तरी सकळ नारीनरांचें ॥ अति प्रिय होय जेणें सांचें[8] ॥ आणि सर्वदा सर्व दानांचें ॥ तैसेंचि नेमांचें फल लाभे ॥ ६ ॥ आणि सर्व यज्ञ केल्याचें फळ ॥ प्राप्त होय जेणें सकळ ॥ तैसेंचि जेणें दुरितमळें[9] ॥ जाती समूळ लोपूनियां ॥ ७ ॥ आणि सर्वदा अशक्तांसीं ॥ भवतारक निश्च-येंसी ॥ त्यांतूनि विशेषें अधिमासीं ॥ सकळ फळांसी देत जें ॥ ८ ॥ तें सर्वकर्माधिराजं[10]नामक ॥ यद्यपि असे रहस्यं[11] अधिक ॥ तरी मी तुजला सकळिक ॥ सांगतों ऐक आदरें ॥ ९ ॥ अधिकमासाचिये ठायीं ॥ स्नानादि कर्मैं करण्याविषयीं ॥ शक्ति नसेल जयां देहीं ॥ हरिनाम त्यांहीं जपावें ॥ १० ॥ कोणत्याहि प्रकारेंकरून ॥ करावें भगवन्नामकीर्तन ॥ तेणें सर्व काम परिपूर्ण ॥ होती जाण निश्चयें ॥ ११ ॥ कृष्ण कृष्ण ऐसें सतत ॥ जे कलियुगामाजीं बोलत ॥ तयां अयुतयज्ञांचे[12] यथार्थ ॥ आणि कोटितीर्थांचें फल लाभे ॥ १२ ॥ पूर्ववयामाजीं जो नर ॥ शुंचि[13] धार्मिक सावधांतर ॥ हरिकीर्तन करी निरंतर ॥ तोचि सत्पुत्र जाणावा ॥ १३ ॥ तो त्या कीर्तनें पितरांलागुनी ॥ सदा त्राही[14] पुन्नरकापासुनी ॥ म्हणोनि वेदज्ञ महामुनी ॥ पुत्र त्यासीच बोलतात ॥ १४ ॥ नातरी सूकरीसी[15] कुमर ॥ शतशः होती पुष्टशरीर ॥ परी ते नरकप्रिय थोर ॥ भूमीसी भार सर्वही ॥ १५ ॥

---

१ लक्ष्मी. २ संसार ( जन्ममरणरूप ) ताप हरण करणारा. ३ विश्वाची पीडा नाहींशी करणारा. ४ सत्वर. ५ ईश्वराच्या स्वरूपांत ऐक्य पावणें अशी जी मुक्ति ती. ६ सांप्रत. ७ लक्ष्मीची. ८ खरोखर. ९ पापमळ. १० सर्व कर्मांचा मुख्य राजा. ११ गौप्य ( गुप्त ). १२ दहा हजार यज्ञांचें. १३ शुद्ध. १४ रक्षण करी. १५ डुकरीस.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

गोमतीमाजीं स्नान करित ॥ आणि मग कृष्णाचें नाम गात ॥ तयांच्या देशींहि यमदूत ॥ न प्रवेशती कदापि ॥ १६ ॥ आणि जे नर यथाधिकारं[1] ॥ भगवद्गीता निरंतर ॥ पठती ऐकती साचार ॥ ते मुक्त होत निश्चयें ॥ १७ ॥ नीचयोनींत जन्मले असोनी ॥ जे मम भक्ति करिती अनुदिनीं[2] ॥ ते सकळही या त्रिभुवनीं ॥ पवित्र जाण सिंधुजे[3] ॥ १८ ॥ विप्रकुळीं उद्भवोन ॥ जे कां होत मद्भक्तिहीन ॥ ते म्लेंच्छस्वभावी पूर्ण ॥ अत्यंत हीन अपवित्र ॥ १९ ॥ ह्या कलियुगामाझारीं ॥ मद्भक्त जेथें वास करी ॥ तो यद्यपि कुदेश[4] असला तरी ॥ पवित्र निर्धारीं[5] जाणिजे ॥ २० ॥ इंदिरे ह्या कलिसम चांगं ॥ नाहीं नाहींच अन्य युग ॥ जेथें कीर्तनें स्मरणेंचि सवेग ॥ पद अव्यंग[6] लाधतें ॥ २१ ॥ स्त्रीहत्यारी राजघातक ॥ विश्वासघातकी सर्वापहारक[7] ॥ बालघाती ग्रामदाहक ॥ भ्रूणहा आणि मातृगामी ॥ २२ ॥ सुरापी सर्वनिंदक गोघ्न[8] ॥ मातृपितृहत्यारी कृतघ्न ॥ गुरुतल्पगामी[9] मार्गघ्न[10] ॥ आणि इतर महापापिष्ट जे ॥ २३ ॥ ते आणि अन्यहि पापीजन ॥ श्रीराम हरि श्रीकृष्ण ॥ इत्यादि संकीर्तन करून ॥ मुक्त होती निश्चयें ॥ २४ ॥ जरी ऋग्गादि[11] चारी वेद भले ॥ परमश्रद्धेनें अभ्यासिले ॥ किंवा तयांचें प्रेमें सगळें ॥ व्याख्यान केलें निरंतर ॥ २५ ॥ कीं धर्मशास्त्रादि चिंतिलीं ॥ कीं योगशास्त्रें अभ्यासिलीं ॥ कीं सेतिहासें[12] पुराणें सगळीं ॥ विवरिलीं[13] सर्वकाळ ॥ २६ ॥ कृच्छ्रचांद्रायणादि तप ॥ कीं नाना मंत्रांचे केले जप ॥ कीं सप्तद्वीपादि भूदानें अमूप[14] ॥ सर्वकाळ चालविलीं ॥ २७ ॥ कीं केलीं गजाश्वरथदानें ॥ कीं देवालयादिप्रतिष्ठापनें ॥ कीं केलीं क्षेत्रतीर्थाटनें ॥ तर तयीं काय उपयोग ॥ २८ ॥ सर्वेश्वर कृष्ण भगवान ॥ तया स्मरती जे अनुदिन[15] ॥ तयीं कलियुगीं संपूर्ण ॥ साधिलें जाण निश्चयें ॥ २९ ॥ हें कलियुग अत्यंत घोर ॥ सर्व दोषांचें घर साचारं[16] ॥ परी यामाजीं भूमीवर ॥ एक गुण थोर आहे पैं ॥ ३० ॥ येथें अन्य कर्में न करितांही ॥ केवळ भगवत्कीर्तनेंच पाहीं ॥ बंधमुक्त होऊनि

१ अधिकारानुरूप. २ नित्य. ३ समुद्रकन्ये (लक्ष्मी). ४ वाईट (अपवित्र) देश. ५ खचित. ६ उत्तम. ७ सर्वस्व हरणारा. ८ गोहत्यारी. ९ गुरुस्त्रीगमन करणारा. १० मार्ग मोडणारा. ११ ऋगवेदादि. १२ भारतासहित. १३ अर्थ करून सांगितलीं. १४ पुष्कळ. १५ नित्य. १६ खरोखर, सत्य.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

लवलाहीं ॥ मोक्षसदना पावती ॥ ३१ ॥ यास्तव गुणज्ञ आर्यलोक ॥ कलिलागीं प्रशंसिती देख ॥ येथें हरिकीर्तनेंच निःशंक ॥ स्वार्थ सकळिक लाभती ॥ ३२ ॥ पद्मालये काय वर्णूं फार ॥ हेंचि सांगतों वारंवार ॥ कलियुगामाजीं जीवनसार ॥ हरिनामचि एक असे ॥ ३३ ॥ तयाविण इतरकर्मांहीं ॥ उत्तम गति नाहींच नाहीं ॥ म्हणोनि सकळीं सर्वदाही ॥ हरिनामचि जपावें ॥ ३४ ॥ सकळधर्मांनीं विवर्जित ॥ ऐसें कलिघोर अत्यंत ॥ यामाजीं जे हरिभक्त होत ॥ किंवा गात हरिनामें ॥ ३५ ॥ आणि विशेषें अधिकमासाभीतर ॥ श्रीकृष्णादि नामें सुंदर ॥ जे स्वयें स्मरती निरंतर ॥ किंवा स्मरविती दुसऱ्यांसी ॥ ३६ ॥ ते ह्या जगीं सर्व मनुष्यांत ॥ कृतकृत्य आणि सौभाग्यवंत ॥ घोरकलियुगही तयांप्रत ॥ नच बाधीच कदापि ॥३७॥ इंदिरे शिव आणि कृष्ण ॥ हे दोघेहि एकचि असती जाण ॥ दोघांतूनि कवणाचेंहि भजन ॥ करितां समान फल असे ॥३८॥ म्हणोनि शिव शिव कीं कृष्ण कृष्ण ॥ इत्यादिक जें नामकीर्तन ॥ तेणेंचि सर्वपापदहन॥ होतें तत्क्षण कलियुगीं ॥ ३९ ॥ जरी पुण्यकर्में असतीं अनेक ॥ तरी ह्या घोर कलियुगीं सुरेख ॥ संपूर्ण कर्मांचें फलदायक ॥ भगवत्कीर्तनचि असे पैं ॥ ४० ॥ सकळ पाप हरण्याविषयीं ॥ हरिनामीं जितुकी शक्ति राही ॥ तितुकें पाप करण्याविषयीं ॥ पातकी नाहीं समर्थ ॥ ४१ ॥ सर्व शास्त्रांचा वारंवार ॥ विचार करितां निघालें सार ॥ कीं नारायणचि निरंतर ॥ ध्यावा गावा सकळिकीं ॥ ४२ ॥ दुष्टचित्तें हरि स्मरतां ॥ बोहेरी होय सर्व दुरितां ॥ नेणोनिहि अग्नि स्पर्शितां ॥ जाळीच सर्वथा जैसा पैं ॥ ४३ ॥ नारायण नाम सुंदर ॥ जो नर बोलिला एकवार ॥ तेणें शतकल्प निरंतर ॥ स्नान केलें सर्वतीर्थीं ॥ ४४ ॥ ऐशी भगवन्नामाची थोरी ॥ म्हणोनि हे मत्प्रिय सुंदरि ॥ शक्ताशक्तीं कलिमाझारीं ॥ नित्य हरिनामचि जपावें ॥ ४५ ॥ आणि विशेषें अधिकमासांत ॥ भगवन्नामेंच जपावीं सतत ॥ तेणें स्नानादिकांचें फळ यथोक्त ॥ प्राप्त होय निश्चयें ॥ ४६ ॥ सर्वरूपी जो भगवान् त्याप्रती ॥ जे मानव निरंतर स्मरती ॥ तयां धर्मकामार्थमुक्ती ॥

१ सत्वर. २ श्रेष्ठ. ३ लक्ष्मी. ४ वांचण्याचें मुख्य सार्थक ( तात्पर्य ). ५ नाश. ६ सर्व पापांचा.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

हस्तगत होती तत्काळ ॥ ४७ ॥ अधिकमासीं एकवार ॥ हरि ऐसाच केला उच्चार ॥ तेणें मोक्षासी जावया सत्वर ॥ बांधिली कमर जाणिजे ॥ ४८ ॥ ऐसा हरिनाममहिमा भला ॥ श्रीविष्णूनें लक्ष्मीसी कथिला ॥ तो ऐकूनियां ती कमळा ॥ पुनश्च तयातें पुसतसे ॥ ४९ ॥ लक्ष्मी म्हणे हो देवाधिदेवा ॥ दयासागरा श्रीकेशवा ॥ तुम्ही नाममहिमा आंघवा ॥ मज उत्तम कथिलाचि ॥ ५० ॥ तथापि पुन्हां कांहीं किंचित ॥ दुजें अद्भुत सांगा मजप्रत ॥ कीं जें अधिकमासीं केल्यानें समस्त ॥ केलें ऐसें होईल पैं ॥ ५१ ॥ विष्णु म्हणे हे क्षीरोदनंदिनि ॥ तूं सर्वदा आनंददायिनी ॥ आणि सर्वानुग्रहकारिणी ॥ दयार्द्रदृष्टि आहेस ॥ ५२ ॥ तरी जें सर्व तपांत निर्मळ ॥ श्रेष्ठ अव्यय तप सोज्वळ ॥ यदाचरणें नर सकळ ॥ पापां तत्काळ नाशिती ॥ ॥ ५३ ॥ आणि सर्व धर्मांचें फळ पावून ॥ अव्ययपदा जाती जयान ॥ तें तुज लोकानुग्रहार्थ पूर्ण ॥ सांगतों ऐकें सुंदरि ॥ ५४ ॥ कमलभवांडामाझारीं ॥ अन्नचि श्रेष्ठ निर्धारीं ॥ सकळ प्राण्यांचें प्राणधारी ॥ अन्नचि असे केवळ ॥ ५५ ॥ अन्नीं राहती लोक सकळ ॥ अन्नचि सर्वांचें वीर्यबळ ॥ संपूर्ण देवतामय सोज्वळ ॥ अन्नचि निर्मळ त्रिशुद्धी ॥ ५६ ॥ तें अन्न दान दीधलें जेणें ॥ जगीं काय न केलें त्याणें ॥ जपतपयोग अनुष्ठानें ॥ सर्वही केलीं जाणिजे ॥ ५७ ॥ गुणी दरिद्री किंवा क्षुधित ॥ या कोणासी जो अन्न देत ॥ तेणें आत्मसुखभोग सिद्ध्यर्थ ॥ केलीं यथार्थ सर्व कर्में ॥ ५८ ॥ जेणें निष्कामत्वें वहिलें ॥ यत्किंचित् अन्नदान केलें ॥ तेणें सांसारिक दुःख सगळें ॥ त्यागूनि घेतलें मोक्षपद ॥ ५९ ॥ किंवा सकामत्वेंहि यत्किंचित् ॥ अन्नदान कोणी करित ॥ तरी सर्वकर्मांचें फळ त्याप्रत ॥ हस्तगत होय निश्चयें ॥ ६० ॥ ऐसें अन्नदानाचें महिमान ॥ म्हणोनि तें नित्य कीजे जाण ॥ आणिक अधिकमासीं संपूर्ण ॥ उपवासव्रत करावें ॥ ६१ ॥ प्राणप्रिये अधिकमासांत ॥ जे करिती उपवासव्रत ॥ तयांचे मोक्षादि सर्व मनोरथ ॥ पूर्ण होत निर्धारें ॥ ६२ ॥ सर्व मासोपवास अथवा ॥ एकपक्षोपवास करावा ॥ कीं षड्रात्र त्रिरात्र किंवा ॥ एकांतरोपवास कीजे ॥ ६३ ॥ अथवा एक तरी उपोषण ॥ अधि-



१ सर्व. २ क्षीराब्धिकन्ये ( लक्ष्मी ). ३ नाशरहित. ४ ज्याच्या आचरणानें. ५ ब्रह्मांडांत. ६ सर्वकाळ. ७ संसारसंबंधीं. ८ धारणेंपारणें.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

मासीं करावें जाण ॥ जैसें जयाच्या शक्तीचें मान ॥ तैसेंचि तेणें आचरावें ॥ ६४ ॥ नर नारी कीं कुमारी ॥ कीं वृद्ध अथवा असला ज्वरी ॥ तरी तयीं अधिकमासाभीतरीं ॥ एक उपवास कीजेच ॥ ६५ ॥ आणि विशेष तों विधवांनीं ॥ इतर सर्व कर्मे त्यागुनी ॥ अधिमासीं उपवासाचरणीं ॥ सादरता राखिजे ॥ ६६ ॥ येथें एकहि उपवास करितां ॥ ईहपरत्रीं[1] होय धन्यता ॥ याचविषयीं पुरातन कथा ॥ एक तुज आतां सांगतों ॥ ६७ ॥ पूर्वी नर्मदानदीतीरीं ॥ माहीष्मतीनामनगरीं ॥ तापसीनामें अति सुंदरी ॥ ब्राह्मणी एक वसतसे ॥ ६८ ॥ ती तपस्यादिपरायण ॥ सर्वदा करी सदाचरण ॥ आणि अधिकमासीं उपोषण ॥ नित्य नेमें चालवीतसे ॥ ६९ ॥ तियेची सखी काम करणारी ॥ कोणी एक होती शूद्रनारी ॥ ती दैवें होऊनि कुष्ठशरीरी ॥ मरणोन्मुख जाहली ॥७०॥ तें तापसीप्रति हस्त जोडूनि ॥ म्हणे हे मम प्रियसाजणी[2] ॥ मी तों आतां मृत्युलागुनी ॥ स्वाधीन जाण झाल्यें असें ॥ ७१ ॥ परी जन्मतः आजपर्यंत ॥ पुण्यकर्म नाचरिलें किंचित ॥ म्हणोनि पुढें मज दुःख बहुत ॥ भोगणें प्राप्त होईल पां ॥ ७२ ॥ तरी सखये तूं स्वसुकृतांतूंन[3] ॥ किंचित्पुण्य दे मजलागून ॥ जेणें मी उत्तम सुख भोगून ॥ भवाब्धि तरून पार पडें ॥ ७३ ॥ तूं अत्यंत दयाळु ब्राह्मणी ॥ म्हणोनचि केली हे विनवणी ॥ तरी तव सख्य केल्याचें जनीं ॥ सार्थक झणीं करीं आतां ॥ ७४ ॥ तुजवांचून ये समयीं ॥ मज तारणार कोणी नाहीं ॥ ऐकुनि तापसी हृदयीं ॥ करुणापूर्ण जाहली ॥ ७५ ॥ आणि पूर्वी जें मलमासांत ॥ केलें होतें उपवासव्रत ॥ त्यांतूनि एकोपवासाचें समस्त ॥ फल तियेस अर्पिलें ॥ ७६ ॥ संकल्प करूनि तत्काळिक ॥ तियेच्या हस्तीं सोडलें उदक ॥ तों स्वर्गांतुनि अलोलिक[4] ॥ विमान तेथें उतरलें ॥ ७७ ॥ मार्तंडांहूनि[5] दैदीप्यमान ॥ विमानाचा प्रकाश गहन ॥ नानादिव्यभोग परिपूर्ण ॥ मांजी[6] अत्यंत विराजती ॥ ७८ ॥ उर्वश्यादि देवांगना ॥ माजीं करिती नृत्य गायना ॥ मग त्या विमानीं ती शूद्रांगना[7] ॥ आरूढली तत्काळ ॥ ७९ ॥ तेथें बहुकालपर्यंत ॥ भोग भोगूनि असंख्यात ॥ पुनश्च मेदिनी वाराणसींत[8] ॥ काशीश्वरसुता जन्मली ॥ ८० ॥ तेथेंहि सुख भोगूनि अपार ॥ देहांतीं

१ इहलोकीं व परलोकीं. २ प्रियसखे. ३ आपल्या पुण्यांतून. ४ अमोलिक ( अनुपम ). ५ सूर्याहून. ६ मध्यें ७ शूद्र स्त्री. ८ काशींत.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

पावली कैलासपुर ॥ पुढें ती लोकानुग्रहार्थ सत्वर ॥ देवता सुंदर जाहली ॥ ८१ ॥ तियेचें नाम चंद्रेश्वरी ॥ ती अद्यापि आहे काशीपुरीं ॥ विबुधजन[1] नानोपचारीं ॥ सतत तीतें पूजितात ॥ ८२ ॥ असो प्रिये काय सांगूं विशेष ॥ अधिमासींचा एक उपवास ॥ तयाचें फळ त्या शूद्रीस ॥ ब्राह्मणीहस्तें मिळालें ॥ ८३ ॥ तेणें ती स्वर्गोपभोग भोगुनी ॥ दिव्यदेवतात्वहि पावुनी ॥ आचंद्रार्क[2] काशीभुवनीं ॥ वसत आहे आनंदें ॥ ८४ ॥ ऐसा अधिमासाचा महिमा ॥ कोण पावेल तयाची सीमा ॥ येथें शूद्रहि करील व्रतोत्तमा ॥ तरी गति उत्तमा पावेल ॥ ८५ ॥ जैसी ती दासी शूद्री असोनी ॥ देवता झाली उमेवाणी[3] ॥ तैसाच शूद्रही ह्या व्रताचेनी ॥ शूलपाणि[4]-सम होईल ॥ ८६ ॥ यास्तव प्रिये क्षीरोदनंदिनी ॥ शुभेच्छु मनुष्यमात्रांनीं ॥ अधिकमासामाजीं निदानीं ॥ एकोपवास करावाच ॥ ८७ ॥ एवंप्रकारें उपवासव्रत ॥ कथिता झाला वैकुंठनाथ ॥ तें ऐकुनियां लक्ष्मी त्याप्रत ॥ पुनरपि प्रश्निती जाहली ॥ ८८ ॥ ती प्रश्नोत्तरकथा पावन ॥ पुढच्या प्रसंगीं वर्णिजेल पूर्ण[5] ॥ तरी श्रोतीं स्वांतः-करण ॥ सावधान राखिजे ॥ ८९ ॥ इति श्रीअधिकमासमाहात्म्यसार ॥ बृहन्नारदीयपद्माधार ॥ सज्जन श्रोते ऐकोत चतुर ॥ षोडशोऽध्याय मधुर हा ॥ ९० ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

॥ इति षोडशोऽध्यायः ॥ १६ ॥

---

१ देव पंडित. २ चंद्रसूर्य आहेत तोंपर्यंत. ३ पार्वतीसारखी. ४ शिवासमान. ५ हे लक्ष्मी.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

॥ श्रीगणेशायनमः ॥ ॥ इंदिरा म्हणे हो शेषशायी ॥ तुम्ही उत्तम कथिलें सर्वही ॥ उपवास करण्याविषयीं ॥ सामर्थ्य नाहीं जयांसी ॥ १ ॥ तयीं सर्व पापक्षय होय ॥ ऐसें अधिमासीं करावें काय ॥ तें मज दयाळा निःसंशय ॥ कृपा करूनि सांगिजे ॥२॥ तें ऐकूनि वैकुंठनायक ॥ म्हणे हे प्रिये सांगतों ऐक ॥ उपवास करण्याविषयीं देख ॥ सामर्थ्य नसे जयांसी ॥ ३ ॥ तयीं मलमासीं अनुदिन ॥ मौनें करावें एकभुक्त भोजन ॥ अथवा मौनें हविष्यान्न ॥ नियमें भक्षण करावें ॥ ४ ॥ उपवासें जें पुण्य लाभतें ॥ तेंचि मौनभोजनें मिळतें ॥ आणि तयानें सर्व दुरितें ॥ लोपतीं जाण निःसंशय ॥५॥ मौनें होय सौभाग्यप्राप्ति ॥ मौनें सर्व कलह मिटती ॥ मौनेंचि लाभे सुखसंपत्ती ॥ मौनेंचि कीर्ति वाढते ॥ ६ ॥ मौनेंचि होतें सुंदर रूप ॥ मौनें आयुष्य वाढतें अमूप ॥ मौनेंचि हरती सर्व ताप ॥ म्हणोन मौनचि सदा धरावें ॥ ७ ॥ स्नान होम आणि भोजन ॥ तींठायीं धरावें नित्य मौन ॥ येथील मौनाचीं फळें कवण ॥ तीं सांगतों ऐक सिंधुजे ॥ ८ ॥ मौनस्नानें तेजःप्राप्ती ॥ मौनहोमें अचळ संपत्ती ॥ मौनभोजनें पैं निश्चितीं ॥ आयुष्यवृद्धि होतसे ॥ ९ ॥ स्नानसमयीं जे बोलत ॥ तयांचें तेज वरुण हरित ॥ होमसमयीं मौन सांडित ॥ ते दरिद्री होत अग्निरोषें ॥ १० ॥ आणि भोजनीं मौन त्यागित ॥ तयांच्या आयुष्या मृत्यु हरित ॥ यास्तव मनुष्यमात्रीं सतत ॥ मौन धरावें तींठायीं ॥ ११ ॥ ऐसें ऐकूनि पयोब्धिसुता ॥ म्हणे हो दयाळा भगवंता ॥ तुम्ही मौनव्रताची तत्वता ॥ अत्युत्तमता कथिलीत ॥ १२ ॥ परी त्या व्रताचे किती प्रकार ॥ आणि तें धरावें कियत्कालवर ॥ हेंहि सकळ सविस्तर ॥ मजला आतां सांगिजे ॥ १३ ॥ मग श्रीसीं म्हणे जगन्नाथ ॥ मौनाचे दोन प्रकार असत ॥ एक तें भोजनांतपर्यंत ॥ आणि प्राणाहुत्यंत दूसरें ॥ १४ ॥ जें भोजनांतपर्यंत मौन ॥ तें यथोक्त फल दे संपूर्ण ॥ आणि प्राणाहुत्यंत तें त्याहून ॥ किंचिन्न्यून देत असे ॥ १५ ॥ जैसे जयाचेनि होईल ॥ तैसेंचि तयें कीजे केवळ ॥ मौनें लाभतें उत्तम शील ॥ आणि पापें सकळ नासतीं ॥ १६ ॥ अधिकमासीं मौनव्रत करित ॥ तयां अक्षय फल लाभत ॥ आणि हेंचि महापापनाशार्थ ॥ वँर प्रायश्चित्त असे पैं ॥ १७ ॥ आणि जी जी असेल कामना ॥

१ पुष्कळ. २ समुद्रकन्ये ( लक्ष्मी ) ! ३ लक्ष्मी ४ किती वेळपर्यंत. ५ लक्ष्मीस. ६ स्वभाव. ७ श्रेष्ठ.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

ती ती मौनेंचि होते परिपूर्णा ॥ मौनव्रतफलाच्या वर्णना ॥ सहस्रवदना शक्ति नोहे ॥ १८ ॥ देवर्षि नारद पूर्वकल्पांत ॥ अत्यंत नीच दासीसुत ॥ असोनि तेणें अधिमासांत ॥ मौनव्रत आचरिलें ॥ १९ ॥ तेणें तो सत्संगति पावुनि ॥ सत्पुरुषांच्या कृपेंकरूनी ॥ दासीपुत्रत्वालागीं टाकुनि ॥ विप्रत्वालागुनी पावला ॥ २० ॥ तेथेंही अधिमासीं त्रिदिन ॥ कुरुक्षेत्रीं केलें उपोषण ॥ तेणें आतां हा ब्रह्मसुत होऊन ॥ ज्ञानसंपन्न जाहला असे ॥ २१ ॥ ऐसें मौनव्रताचें फल ॥ नारदासी लाधलें निर्मळ ॥ तिथिनक्षत्रादि पर्वकाळ ॥ तुच्छ सकळ मौनापुढें ॥ २२ ॥ अधिमासीं मौनव्रत केलें ॥ तेणें इष्टापूर्तादिफळ साधिलें ॥ सर्व साधनाहूनि आगळें ॥ सुलभ असे मौनव्रत॥ २३॥ जयांच्या साधना क्लेश बहुत ॥ त्या नानातीर्थयात्रा किमर्थ ॥ सकळ मासांहूनि अत्यंत ॥ अधिकमास श्रेष्ठ असे ॥ २४ ॥ केवळ एके अधिमासासमान ॥ द्वादशाब्दिकंही नव्हे जाण ॥ मग तेथें करिती मौनभोजन ॥ काय पुण्य वर्णावें ॥ २५ ॥ अधिमासींच्या मौनभोजनेंसी ॥ तुळितां मेदिनीदानासी ॥ साम्य न ऐसें विधिविष्णुमहेशीं ॥ निश्चयेंसी कथिलें असे ॥ २६ ॥ सर्व दानें आणि अधिकमास ॥ तुळेनें तुळितां निःशेष ॥ सकळ दानाहूनि विशेष ॥ अधिकमासच भरतसे ॥ २७ ॥ येथें यथाविधी स्नान करिती ॥ ते धन्य होत त्रिजगतीं ॥ आणि यामाजीं दीप उजळती ॥ ते धन्यतम असती निश्चयें ॥ २८ ॥ आणि मौनव्रत जे आचरत ॥ ते त्याहूनि धन्य जाण निश्चित ॥ येथींच्या अर्चनादिकर्में निश्चित ॥ आजन्मकृत पापें नासतीं॥२९॥ इंदिरे अधिमासामाझारीं ॥ जो कपटेंहि किंचित् व्रत करी ॥ तयाच्याही दर्शनमात्रें सुंदरी ॥ जग निर्धारीं पूत होय ॥ ३० ॥ जयांनीं मद्भक्तीनें वहिलें ॥ अधिमासीं मौनभोजन केलें ॥ तयीं धर्मार्थकाममोक्ष भले ॥ वेगें साधिले निश्चयें ॥ ३१ ॥ शत वरुषें करितां उपोषणें ॥ जें पुण्य लाभे मानवाकारणें ॥ तेंचि एके मौनभोजनें ॥ लाभतें जाण पद्मालये ॥ ३२ ॥ याविषयीं इतिहास एक ॥ उत्तम सांगतों प्रिये ऐक ॥ अवंतीपुरीं



१ शेष सर्पास. २ धर्मशाळा पाणपोई अन्नसत्रें इत्यादि केल्याचें फळ. ३ कशाकरितां. ४ पापनिवृत्त्यर्थ जीं प्रायश्चित्तें आहेत त्यांत द्वादशाब्दिक म्हणजे जें करण्यास बारा वर्षें लागतात तें मोठें असून तेंही. ५ ब्रह्मा विष्णु व शंकर यांनीं. ६ पूजादि. ७ खचित. ८ पवित्र ९ लक्ष्मी.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

वेदशर्मा नामक ॥ ब्राह्मण एक वसतसे ॥ ३३ ॥ तो स्वाध्यायनिरत[1] शांत दांत ॥ महातपस्वी अभिमान-
रहित ॥ निर्मम[2] निरिच्छ निष्पाप पूत[3] ॥ आणि जितेंद्रियहि होता पैं ॥ ३४ ॥ ऐसा स्वधर्मे रात्रंदिवस ॥
वर्तत असतां सविशेष ॥ कदाचित् काळ[4]पर्ययें अधिमास ॥ अतिनिकट पातला ॥ ३५ ॥ तें जाणोनियां
तो विप्र ॥ रात्रीं अंतरीं करी विचार ॥ उदयिकपासूनि परिकर ॥ अधिकमास लागलाहे ॥ ३६ ॥ परी
सांप्रत माझिया देहीं ॥ उपवासाचें सामर्थ्य नाहीं ॥ तरी जेणें तयाचें फळ येई ॥ ऐसें काय करावें ॥ ३७ ॥
ऐसा विचार करितां करितां ॥ विप्रासी झोंप लागली अवचितां ॥ तों स्वप्नीं ईश्वरें येऊनि स्वतां ॥ मौनव्रत
उपदेशिलें ॥ ३८ ॥ आणि गुप्त जाहला भगवान ॥ तों वेदशर्मा जागृत होऊन ॥ हें हरीचेंचि कृत्य संपूर्ण ॥
ऐसें जाणून आनंदला ॥ ३९ ॥ नेत्रीं चालल्या प्रेमाश्रुधारा ॥ म्हणे हें काय केलें शार्ङ्गधरा ॥ कृपा
करूनि मज पामरा ॥ उद्धरावया श्रमलासि ॥ ४० ॥ दीनवत्सल हें तव बिरुद ॥ आजि मज दाविलेंसी
विशद[5] ॥ तव उपकारा मी मतिमंद ॥ कैसा उतराई होऊं कीं ॥ ४१ ॥ ऐसें प्रेमानंदें बोलत ॥ मेदिनीं
पडला दंडवत ॥ असो मग तेणें त्या मासांत ॥ मौनाशनव्रत चालविलें ॥ ४२ ॥ शुद्धप्रतिपदेपासून ॥
नित्य मौनें भोजन करून ॥ अंतीं अमावास्येसी उद्यापन ॥ यथाविधान सारिलें ॥ ४३ ॥ तों त्या वेदशर्म्या-
लागीं ॥ अनुग्रह कीजे म्हणोनि वेगीं ॥ साक्षात्पुरुषोत्तम रथांगी[7] ॥ तयासन्निध पातला ॥ ४४ ॥ आणि म्हणे
रे साधो ब्राह्मणा ॥ मी तुज झालों प्रसन्नमना ॥ तरी मज मागें वरदाना ॥ पुरवीन कामना सर्वही ॥ ४५ ॥
हें ऐकूनि तो वेदशर्मा ॥ म्हणे भगवंता पुरुषोत्तमा ॥ तूं पुरविसी माझिया कामा ॥ तरी सांगतों ऐकें
दयाळा ॥ ४६ ॥ देवा तुझिया पादपंकजीं ॥ सर्वदा भक्ति राहावी माझी ॥ आणि त्वद्भक्तजनांच्या काजीं ॥
प्रेमा सहजीं असावा ॥ ४७ ॥ ब्रह्मांडोदरामाजीं शुभ ॥ चक्रवर्ति[8]सिहि दुर्लभ ॥ ऐसा परमसौख्याचा लाभ ॥
व्हावा सुलभ याच जन्मीं ॥ ४८ ॥ कायावाचामनें करून ॥ नित्य घडावें विप्रसेवन ॥ नानाविभवभोग

१ नित्य वेदपाठ करणारा. २ ममतारहित ( उदासीन ). ३ पवित्र. ४ कालगतीनें. ५ स्पष्ट. ६ मौनभोजनव्रत. ७ चक्रपाणि. ८ सार्वभौमराजासही.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

संपूर्ण ॥ अखंड अनुदिन मिळावे ॥ ४९ ॥ दीनावरी म्यां अनुग्रह करावा ॥ परदुःखसमूह हरावा ॥ दानें करण्याचा ल्हाव घ्यावा ॥ प्रेमा ठेवावा स्वधर्मी ॥ ५० ॥ मम देहीं आरोग्य असावें ॥ गृहामाजीं धन वाढावें ॥ क्षेत्रांत बहु धान्य पिकावें ॥ गोधन व्हावें विपुल पैं ॥ ५१ ॥ कदापि माझा स्वजनांशीं ॥ वियोग न होणें हृषीकेशी ॥ आणि मज अंतीं स्वदेहेंसी ॥ वैकुंठीं गमन घडावें ॥ ५२ ॥ हें सकळ माझें मागणें ॥ देवा तुवां मज देणें ॥ ऐसीं तये वेदशर्म्यानें ॥ वरप्रदानें याचिलीं ॥ ५३ ॥ तैं तयाच्या त्या व्रतेंकरून ॥ पुरुषोत्तम झाला प्रसन्न ॥ म्हणोन तया तैसेंचि तत्क्षण ॥ वरप्रदान दीधलें ॥ ५४ ॥ आणि भगवान् पावले अंतर्धान ॥ मग तो वेदशर्मा ब्राह्मण ॥ यथेच्छ नाना भोग भोगून ॥ आनंदघन जाहला ॥ ५५ ॥ अनेक नानाविध यज्ञ ॥ केले ॥ वापी कूप तडाग बांधिले ॥ पाणपोया धर्मशाळा देउळें ॥ ठायीं ठायीं बांधिलीं ॥ ५६ ॥ नानादानें दीधलीं पवित्र ॥ सुखी केले सुहृद् मित्र ॥ वनग्रामादिठायीं सर्वत्र ॥ अन्नसत्रें स्थापिलीं ॥ ५७ ॥ ऐसीं पुण्यकर्मे बहुत ॥ मेदिनीवरी केलीं सतत ॥ पुढें तेणें वैकुंठाप्रत ॥ जावया जेव्हां इच्छिलें ॥ ५८ ॥ तेव्हां सुरेंद्रेंदुर्लभ[1] ऐसें ॥ विमानवर प्रेषिलें खासें ॥ जयाच्या सुंदर तेजप्रकाशें ॥ दशदिशा उजळल्या ॥ ५९ ॥ तये विमानीं आरूढोन ॥ वेदशर्मा ये वैकुंठालागुन ॥ तों मार्गामाजीं निर्जरगण[2] ॥ येऊनि तया पूजिती ॥ ६० ॥ आणि म्हणति गा भाग्यवंता ॥ ब्राह्मणोत्तमा कृतकृतार्था ॥ तुवां अधिमासीं मौनव्रता ॥ आचरिलेंसी यथार्थ ॥ ६१ ॥ तयाचें फळ हें तुजलागीं ॥ प्राप्त झालें धन्य तूं त्रिजगीं ॥ तों तया देवेंद्र लागवेगीं[3] ॥ पूजूनि साष्टांगीं प्रार्थित ॥ ६२ ॥ अगा विप्रोत्तमा मी किंचित ॥ मागतों पुरवी मनोरथ ॥ अधिमासीं मौनभोजनव्रत ॥ तुवां यथार्थ साधिलें जें ॥ ६३ ॥ तयाच्या एक दिनाचें फळ ॥ मज देईं होऊन दयाळ ॥ हें ऐकतांचि तत्काळ ॥ इंद्रासी देता झाला तें ॥ ६४ ॥ मग तत्प्रभावें सुरेंद्रानें ॥ वृत्रासुरा सूदिलें[4] क्षणें ॥ असो पुढें त्या वेदशर्म्यानें ॥ वैकुंठीं केलें आगमन ॥ ६५ ॥ तो सदा बहु सौख्य भोगित ॥ अद्यापि वैकुंठीं आहे वसत ॥ इंदिरे मौनभोजनाचा

१ देवेंद्रालाहि दुर्लभ. २ देवगण. ३ सत्वर. ४ मारिलें.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

यथार्थ ॥ ऐसा अमितं प्रभाव पैं ॥ ६६ ॥ अधिमासीं मौनभोजन केलें ॥ तेणें सर्वही पुण्य साधिलें ॥ यास्तव सर्वीं साक्षेपें भलें ॥ मौनव्रतचि कीजिये ॥ ६७ ॥ एवंप्रकारें हृषीकेशी ॥ कथिता झाला इंदिरेसी ॥ ऐसें श्रीवाल्मीक दृढधन्व्यासी ॥ कथन करिते जाहले ॥ ६८ ॥ इति श्रीअधिकमासमाहात्म्यसार ॥ बृहन्नारदीय पद्माधार ॥ सज्जन श्रोते ऐकोत चतुर ॥ सप्तदशोध्याय गोड हा ॥ ६९ ॥ श्रीपुरुषोत्तमार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

॥ इति सप्तदशोऽध्यायः ॥ १७ ॥

---

१ अगणित.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

॥ श्रीगणेशायनमः ॥ ॥ पद्मा म्हणे हो पुरुषोत्तमा ॥ सच्चिदानंदा परब्रह्मा ॥ तुम्ही मौन भोजनाचा महिमा ॥ सांगूनि कामा पुरविलें ॥ १ ॥ परी आतां माझ्या अंतरीं ॥ पुनश्च इच्छा उदेली दुसरी ॥ म्हणूनि मी जोडिल्या करीं ॥ तुम्हां श्रीहरी विनवितें ॥ २ ॥ अधिकमासामाजीं पंच पर्वें ॥ कोणतीं कैसीं पाळितां मानवें ॥ काय फळ लाभतें बरवें ॥ तें मज आघवें सांगा जी ॥ ३ ॥ ऐसें ऐकूनि चक्रपाणी ॥ म्हणे हे प्रिये तुजलागुनी ॥ पंच पर्वें अनुक्रमें करुनी ॥ सांगतों कर्णीं ऐक पां ॥ ४ ॥ वैधृति व्यतीपात पूर्णमासी ॥ अमावास्या आणि द्वादशी ॥ हीं पांच पर्वें अनुक्रमेंसी ॥ वाढतीं श्रेष्ठ आहेत ॥ ५ ॥ मी साक्षात विष्णु गरुडध्वज ॥ वैधृतिपर्वीं संतोषें सहज ॥ व्यतीपातयोगीं धर्मराज ॥ तोषे पद्मज पौर्णिमेसी ॥ ६ ॥ अमावास्या पर्वीं विशेष ॥ पितर पावती संतोष ॥ द्वादशीदिनीं देवदेवेश ॥ हृषीकेश संतोषे ॥ ७ ॥ वैधृतिपर्वीं ॥ जे पैं मर्त्य ॥ करिती स्नान दान होमकृत्य ॥ तयांचीं सर्व वांच्छितें नित्य ॥ मी विष्णु सत्य पुरवितों ॥ ८ ॥ कमळे फार सांगू कायी ॥ येथींचें जें पुण्य फल कांहीं ॥ तें इंद्रादिमहादेवांसिही ॥ दुर्लभ असे निश्चयें ॥ ९ ॥ धन्य धन्य तिल दुग्ध घृत ॥ आणि फलादिक यत्किंचित ॥ येथें दीधलें तें समस्त ॥ होतें अनंत फलदातें ॥ १० ॥ वैधृतीचें पुण्य अक्षय ॥ संक्रांतिहूनि अधिक होय ॥ निमिषीं निमिषीं वाढत जाय ॥ नाहीं संशय येविषयीं ॥ ११ ॥ सुपुण्यदायक नित्यींचा वैधृती ॥ त्याहूनि अधिमासींच्याची ख्याती ॥ इंदिरे ह्याविषयीं त्रिजगतीं ॥ बहुतां प्रचीति आली असे ॥ १२ ॥ दैत्येश्वरें प्रल्हादें स्वांगीं ॥ अधिकमासीं वैधृतियोगीं ॥ स्नानदानहोमादिक चांगीं ॥ कर्में केलीं साक्षेपें ॥ १३ ॥ त्या पुण्यप्रभावें प्रल्हादाप्रत ॥ इंद्रत्व लाधलें जगद्विश्रुत ॥ तैशाच अन्य ज्या देवता समस्त ॥ देवत्व पावल्या आहेत पां ॥ १४ ॥ तयीं अधिमासीं वैधृतिपर्वीं ॥ स्नानदानादि केलीं पूर्वीं ॥ तेणें त्या देवत्व पावोनि मानवीं ॥ नित्य पूजिल्या जातात ॥ १५ ॥ वैधृतियोगींच्या दानेंसीं ॥ इंद्रपद लाभलें मघव्यांसी ॥ नष्टलेली लक्ष्मी तयासी ॥ प्राप्त झाली सकळिक ॥ १६ ॥ सूर्यवंशीं मांधाता

१ लक्ष्मी. २ सर्व. ३ यमधर्म. ४ ब्रह्मदेव. ५ मनुष्य. ६ हे लक्ष्मी. ७ उत्तम. ८ इंद्रास.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

नृपाळ ॥ परमधार्मिक पुण्यशीळ ॥ तेणें इंद्राचें पद सकळ ॥ हिरोनियां घेतलें ॥ १७ ॥ तेव्हां इंद्र पदच्युत झाला ॥ पुढें देवर्षि तया भेटला ॥ वैधृतीचा महिमा कथिला ॥ नेम धरविला विशेष ॥ १८ ॥ तेणें पुनश्च पाकशासन ॥ पूर्ववत् पावला इंद्रासन ॥ ऐसें वैधृतीचें महिमान ॥ विशेषाहून विशेष ॥ १९ ॥ आणि पूर्वीं परमेष्ठीनें[२] ॥ वैधृतियोगीं केलीं दानें ॥ म्हणोनचि प्रिये तयाकारणें ॥ सृष्टि करणें साधलें ॥ २० ॥ वैधृतिपर्वींचा दानमहिमा ॥ कोण पावे तयाची सीमा ॥ शतसंवत्सरींही ब्रह्मा ॥ नव्हे समर्थ वर्णावया ॥ २१ ॥ प्रतिमासीं कीजे वैधृतिव्रत ॥ शर्करा मधु पय[३] किंवा घृत ॥ अथवा तिललड्डू यथोक्त ॥ किंवा शुभ नारिकेलफळें दान देणें प्रतिमासीं ॥ २२ ॥ अथवा षोडश तांबूलीदळें[४] ॥ आणि षोडश पूगीफळें ॥ एकत्र करूनि भावबळें ॥ दान देणें प्रतिमासीं ॥ २३ ॥ तेणें येथें सर्व सुख मिळोन ॥ अंतीं लाभतें मोक्षसदन ॥ हें नित्य वैधृतिव्रताचें पुण्य ॥ कथिलें असे साचार ॥ २४ ॥ परी अधिकमासामाझारीं ॥ एकच वैधृति केला तरी ॥ पूर्वोक्त सर्व पुण्य झडकरी ॥ लाभतें निर्धारीं निश्चयें ॥ २५ ॥ ऐसें सांगूनि नारायण ॥ म्हणे हे प्रिये तुजलागुन ॥ हें वैधृतिदानमहिमान ॥ संक्षेपेंकरून वर्णिलें ॥ २६ ॥ आतां व्यतीपातयोगींचें फळ ॥ सांगतों तुज ऐकें निर्मळ ॥ हा योगराज अतिप्रबळ ॥ असे तेजाळ सूर्यसम ॥ २७ ॥ याचिये प्रभावेंकरून ॥ साक्षाद्धर्म[५] धर्मत्व पावून ॥ त्रैलोक्यीं सवजनांलागुन ॥ वल्लभ[६] पूर्ण जाहला ॥ २८ ॥ चंद्रसूर्यांच्या संयोगेंसी ॥ उत्पत्ति झाली व्यतिपातासी ॥ तो प्रकार पूर्वींच तुजसी ॥ म्यां संपूर्ण कथिला असे ॥ २९ ॥ म्हणोनि पुनश्च विस्तार ॥ आतां करीत नाहीं फार ॥ येथील दानाचें मात्र सुंदर ॥ फळ समग्र सांगतों ॥ ३० ॥ दान करितां व्यतीपातीं ॥ धर्मराज पावतो प्रीती ॥ धन धान्य संतती संपत्ति ॥ आणि शुद्धकीर्ति प्राप्त होय ॥ ३१ ॥ कुरुक्षेत्रीं सूर्यग्रहणाठायीं ॥ दान देतां पुण्य जें कांहीं ॥ त्याहूनि अधिक द्वादशगुणांहीं ॥ व्यतीपातीं दान करितां ॥ ३२ ॥ काशीक्षेत्रीं चक्रतीर्थीं ॥ मरतां ये जें फळ हातीं ॥ त्याहूनि अधिक

१ इंद्र. २ ब्रह्मदेवानें. ३ दूध. ४ नागवेलीचीं पानें. ५ यमधर्म. ६ प्रिय.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

व्यतीपातीं ॥ दानें निश्चितीं मिळतसे ॥ ३३ ॥ इतर सकळ पर्वीं सतत ॥ जरी कां दानें दीधलीं समस्त ॥ आणि व्यतीपातीं हेमं किंचित ॥ दक्षिणासहित दीधलें ॥ ३४ ॥ तरी सर्व पर्वींच्या सर्व दानांहून ॥ व्यतीपातींचें हेमदान महान ॥ आणि प्रत्येकमासीं तें सर्वांहून ॥ शताधिकगुणें वाढतें ॥ ३५ ॥ व्यतीपातींच्या तपःप्रभावेंसी ॥ बहु ऋषि झाले स्वर्गवासी ॥ येथींच्या श्राद्धतर्पणादिकेंसीं ॥ पूर्वजांसी तृप्ति होय ॥ ३६ ॥ रविवारीं व्यतीपात योग ॥ तैं हेम किंवा धान्य देतां चांग ॥ अग्निहोत्रापरि सवेग ॥ अनंत फलद होतें तें ॥ ३७ ॥ आधींच व्यतीपात उत्तम ॥ त्याहूनि अधिमास श्रेष्ठ परम ॥ उभयतांचा होतां संगम ॥ काय पुण्य वर्णावें ॥ ३८ ॥ भाद्रपदीं अमावास्येसीं ॥ गंगेमाजीं स्नानदानादिकेंसीं ॥ जें फल कथिलें तें अधिमासीं ॥ पातदानेंसीं लाभतें ॥ ३९ ॥ प्रिये व्यतीपात महायोग ॥ त्रिजगतीं विख्यात अभंग ॥ येथें जे दान देती चांग[1] ॥ ते धन्य अव्यंग त्रिलोकीं ॥ ४० ॥ धान्य किंवा किंचित्सुवर्ण ॥ दान देतां पात्रीं तत्क्षण ॥ सर्व पर्वांहूनि कोटिगुण ॥ अधिक पुण्य प्राप्त होय ॥ ४१ ॥ सर्व पर्वांमाजीं उत्तम ॥ आणिक नाहीं व्यतीपातासम ॥ प्रत्येक पातीं[3] दान धर्म ॥ यथाविधि करावा ॥ ४२ ॥ प्रातःकाळीं स्नान करून ॥ नित्यविधि सारावा संपूर्ण ॥ मग सुपात्र विप्र पाचारून ॥ तयाचें पूजन करावें ॥ ४३ ॥ त्रयोदश संख्या नारिकेळ ॥ अथवा रंभाफळें निर्मळ ॥ खर्जूर द्राक्षें किंवा रसाळ[4] ॥ किंवा अखंड फणसफळें ॥ ४४ ॥ इत्यादि जीं जीं ज्या ज्या ऋतूंत ॥ पवित्र फळें निर्माण होत ॥ तीं तीं त्या त्या काळीं यथोक्त ॥ पूजूनियां साक्षेपें ॥ ४५ ॥ तये सुपात्र विप्रालागुन ॥ भक्तिभावें करून अर्पण ॥ यथाशक्ति दक्षिणाप्रदान ॥ कीजे सांगतासिद्ध्यर्थ ॥ ४६ ॥ ऐसें करितां व्यतीपातीं ॥ अनंत पुण्यें हातां येतीं ॥ सकळ पापें भस्म होतीं ॥ अग्निसंगें तृण जेवीं ॥ ४७ ॥ यद्यपि असंख्य पापांचे राशी ॥ कीं असले पंचमहादोषी ॥ तरी ह्या व्यतीपात दानेंसीं ॥ तत्काळ मुक्त होतात ॥ ४८ ॥ अल्पवेंचें महापुण्य ॥ ऐसें

१ सुवर्ण. २ उत्तम. ३ व्यतीपातीं. ४ आम्रफळें.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

नाहीं यासम अन्य ॥ नारी अथवा असो पुमान ॥ लाभ समान दोघांसी ॥ ४९ ॥ ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र ॥ कीं लोम विलोम जाती इतर ॥ तयीं सकळीं हें निरंतर ॥ भक्तिभावें करावें ॥ ५० ॥ जयाचा नाहीं भक्तिभाव ॥ तयाचीं सर्व कर्में वावें ॥ भक्तिभावेंचि श्रीमाधव ॥ कामना सर्व पुरवितो ॥ ५१ ॥ भक्तिभाव होतां न्यून ॥ दुरावतोचि भगवान ॥ सकळहि पुरुषार्थालागुन ॥ भावचि मुख्य कारण असे ॥ ५२ ॥ म्हणोन रमे सर्वजनांही ॥ भक्तिभाव धरोनि हृदयीं ॥ यथाशक्ति करितां कांहीं ॥ सफळ होतें साचार ॥ ५३ ॥ व्यतीपातयोगीं तिलपात्र ॥ दान करिती अतिपवित्र ॥ त्यांसि मी होऊनि परम मित्र ॥ इहपरत्रीं सुख देईं ॥ ५४ ॥ मद्व्रतकर्ते जे नर मान्य ॥ मलमासीं कांहीं न करितां अन्य ॥ केवळ व्यतीपातीं देती धान्य ॥ ते धन्य धन्य त्रैलोक्यीं ॥ ५५ ॥ अधिमासीं एकेचि पातांठायीं ॥ स्नानदानादि जें केलें कांहीं ॥ तत्पुण्याच्या वर्णनाविषयीं ॥ कवणहि नाहीं समर्थ ॥ ५६ ॥ अधिमासीं व्यतिपातदिनीं ॥ स्वल्पहि पुण्य करितां कोणी ॥ अनेक पुण्यांचें फल तत्क्षणीं ॥ लाभत असे निश्चयें ॥ ५७ ॥ यालागीं भवंभीरुमानवीं ॥ अधिकमासीं व्यतीपातींपर्वी ॥ जैशाकैशाहि प्रकारें सर्वी ॥ दान दीजिये विशेषें ॥ ५८ ॥ इंदिरे हें व्यतीपातींचें फल ॥ म्यां संक्षेपेंचि कथिलें केवळ ॥ विस्तारें वर्णावया सकळ ॥ कोण प्रबळ आहे पां ॥ ५९ ॥ प्रिये आतां तुजलागुन ॥ पूर्णिमेचें सांगतों पुण्य ॥ जेणें साक्षात् कमलासन ॥ प्रीति पूर्ण पावतसे ॥ ६० ॥ आणि प्रीति पावतां विधातां ॥ संतोषती सकळ देवता ॥ म्हणोनि राकेकेंचीं कर्में तत्वतां ॥ तुज मी आतां सांगतों ॥ ६१ ॥ आदी सारूनि स्नाननियम ॥ मग स्थावर किंवा जंगम ॥ जी सुवर्णादि इष्टवस्तु उत्तम ॥ ती विप्रोत्तमा दान दीजे ॥ ६२ ॥ येथ किंचित दान करितां ॥ अक्षय फल येतें हाता ॥ पौर्णिमाव्रतें सर्वदेवता ॥ तृप्त होती निश्चयें ॥ ६३ ॥ पूर्णिमा केवळ देवतीर्थ ॥ दैविकं कर्में

१ व्यर्थ. २ यालोकीं जिवंत आहे तोंपर्यंत व मेल्यानंतर स्वर्गलोकीं. ३ व्यतीपातीं. ४ जन्ममरणरूपी संसारास भिणाऱ्या मानवांनीं. ५ ब्रह्मदेव. ६ पूर्णिमेचीं. ७ देवांचीं.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

करावीं येथ ॥ तयीं सकळ देवता तृप्त ॥ जैसे पितर दर्शदिनीं ॥ ६४ ॥ जैसी पितृकार्यार्थ उक्त अमा[1] ॥ तैसीच देविकाविषयीं पौर्णिमा ॥ म्हणोनि येथें दानधर्मनेमा ॥ करितां देवता तृप्त होती ॥ ६५ ॥ अन्य बहु पर्वीं नाना दानें ॥ किंवा स्नानें किंवा उपोषणें ॥ किंवा करूनियां चांद्रायणें[3] ॥ कासया श्रमणें उगाच ॥ ६६ ॥ जरी कां एके पौर्णिमादिवशीं ॥ स्नानदानादि केलें भावेंसी ॥ तरी सर्व फळें आँपेंसी ॥ प्राप्त होतात निश्चयें ॥ ६७ ॥ मृत्यु लोकीं आजन्मांत ॥ स्नानदानादि करितां बहुत ॥ जीं कां नानाविध फळें यथोक्त ॥ मानवां प्राप्त होताती ॥ ॥ ६८ ॥ तीं सकळही पौर्णिमादिनीं ॥ एके स्नानमात्रेंचि पावुनी ॥ देवऋणापासूनिही तत्क्षणीं ॥ मुक्तता होते साचार ॥ ६९ ॥ प्रतिदिनीं स्नान करावया ॥ सामर्थ्य नसे गे इंदिरे जया ॥ तेणें पुनवेसी स्नान सारोनियां ॥ पितृतर्पण करावें ॥ ७० ॥ तेणें योगें सकळ पाप ॥ निरसूनियां आपेंआप ॥ सर्व पर्वस्नानाहुनि अमूप ॥ पुण्य लाभतें निश्चयें ॥ ७१ ॥ ऐसें पौर्णिमेचें महिमान ॥ इंदिरे कथिलें तुज संपूर्ण ॥ आतां अमावास्येचे गुण ॥ सांगतों ऐकें सादर ॥ ७२ ॥ सर्व पर्वांमाजीं उत्कृष्ट ॥ अमावास्या पर्व वरिष्ठ ॥ ही पितृगणालागीं हृष्ट ॥ करी स्पष्ट जाण पां ॥ ७३ ॥ क्षीरांब्धिजे ह्या ब्रह्मांडाठायीं ॥ अमावास्येसम पर्व नाहीं ॥ पितृगणालागीं लवलाँहीं ॥ मुक्ति देते ही निर्धारें ॥ ७४ ॥ प्रतिमासीं अमावास्येसीं ॥ जो अन्न न दे पितरांसी ॥ तो पुत्र नव्हे निर्श्चयेंसी ॥ आणि तत्पिताही पिता नव्हे ॥ ७५ ॥ जैसें शीतकाळीं शीतार्त ॥ वस्त्रांसी किंवा अग्नीसि इच्छित ॥ अथवा मध्याह्नीं क्षुधाक्रांत ॥ जैसें अन्नाप्रत भावितीं ॥ ७६ ॥ तेवींच नित्य अमावास्येसी ॥ पितर इच्छिती श्राद्धासी ॥ म्हणोन पुत्रें ते दिवशीं ॥ दर्शश्राद्ध कीजिये ॥ ७७ ॥ जे प्रतिदर्शीं श्राद्ध करिती ॥ तयांचे पितर तृप्त होती ॥ आणि पुत्र पौत्र पशुसंपत्ति ॥ व्हावी इच्छिती त्या पुत्रा ॥ ७८ ॥ प्रतिमासांतीं दर्शश्राद्ध ॥ न करिती जे मतिमंद ॥ तयां ब्रह्महत्येचें अगाध ॥ पाप तत्क्षण भिडतसे ॥ ७९ ॥ जयीं ज्या मासाच्या

१ अमावास्येच्या दिवशीं. २ अमावास्या. ३ या नांवाचें व्रत. ४ आपेंआप. ५ आनंदित. ६ क्षीरसागरकन्या (लक्ष्मी). ७ सत्वर. ८ खचित. ९ इच्छितात. १० दर अमावास्येस.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

दर्शदिवशीं ॥ संतर्पिलें नाहीं पितरांसी ॥ तयांचे पितर तये मासीं ॥ केवळ उपोषी असतात ॥ ८० ॥ म्हणून ते वायूसी भक्षित ॥ क्षुधा तृषांनीं अतिपीडित ॥ ऐसे होत्साते सतत ॥ विघ्नें करित त्यां पुत्रां ॥ ८१ ॥ आणि संतति संपत्ति सकळ ॥ विलया नेती तत्काळ ॥ एवंरीती पितरांचा प्रबळ ॥ कोपानळ भडके पैं ॥ ८२ ॥ म्हणोनी प्रिये सर्व नरांनीं ॥ प्रत्येकमासीं दर्शदिनीं ॥ स्नानदानजपादिक आणि ॥ श्राद्धतर्पण कीजिये ॥ ८३ ॥ प्रिये आर्दीच हिरा निर्मळ ॥ त्यासि कोंदण हेमं सोज्वळ ॥ मग त्यापुढें महांनग सकळ ॥ मौल्यें फोलं होत जैसे ॥ ८४ ॥ तेवींच अमादिन महापर्व ॥ तें अधिकमासीं जडतां अपूर्व ॥ इतर सर्व पर्वांचा गर्व ॥ जातो सर्व हरोनियां ॥ ८५ ॥ अधिकमासीं अमावास्यादिनीं ॥ पुण्यकर्म करितां तत्क्षणीं ॥ सर्व पर्वांच्या पुण्यकर्मांहूनी ॥ कोटिगुणें फळ लाभे ॥ ८६ ॥ म्हणोनि प्रिये सकळ मानुषीं ॥ अधिकमासीं दर्शदिवशीं ॥ स्नानदान श्राद्धादिककर्मांसी ॥ भावें विशेषीं आचरावें ॥ ८७ ॥ तेणें सकळ पुरुषार्थ ॥ अनायासें लाभती निश्चित ॥ एवंप्रकारें वैकुंठनाथ ॥ रमेसी कथिता जाहला ॥ ८८ ॥ इति श्री अधिकमासमाहात्म्यसार ॥ बृहन्नारदीय पद्माधार ॥ सज्जन श्रोते ऐकोत चतुर ॥ अष्टादशाध्याय गोडहा ॥ १८ ॥ इति अष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥

---

१ कोपाग्नी. २ सुवर्ण. ३ मोठे दागिने ( अलंकार. ). ४ व्यर्थ.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

श्रीगणेशायनमः ॥ श्रीविष्णु म्हणे रमे तुजला ॥ चार पर्वांचा महिमा कथिला ॥ आतां द्वादशीपर्वाचा वहिला ॥
सांगतों ऐके समग्र ॥ १ ॥ सकळ पर्वांमाजीं उत्तम ॥ पर्व नाहीं द्वादशीसम ॥ तियेच्या पाळणें अव्ययं धामें ॥
लाभतें नेम हा असे ॥ २ ॥ परमपुण्यफलदायक ॥ गंगादि तीर्थें असतीं अनेक ॥ परी इयेच्या षोडशांशाचें देख ॥
सामर्थ्य नसे त्यांमाजीं ॥ ३ ॥ तीर्थें यज्ञक्रिया आणि पर्वें ॥ हीं तोंवरींच गर्जती गर्वें ॥ जोंपर्यंत द्वादशीपर्वें ॥
आगमन केलें नसे पैं ॥ ४ ॥ जरी कां द्वादशी एकदां भेटे ॥ तरी तीर्थादिकांचीं बसतीं मेटें ॥ आणि दुरित विघ्ना-
दिक तीं नेटें ॥ बारावाटें पळताती ॥ ५ ॥ द्वादशीचें महिमान ॥ किती वर्णूं एकमुखेंकरून ॥ तपोव्रतदानादि
संपूर्ण ॥ असती हीन इयेपुढें ॥ ६ ॥ एकादशीसी अहर्दिन ॥ भावें करून उपोषण ॥ द्वादशीदिनीं पिंडप्रदान ॥
धात्रीमूळीं करितो जो ॥ ७ ॥ तेणें नानातीर्थीं स्नान केलें ॥ सकळ यज्ञ संपादिले ॥ आणि गयावर्जनही सारिलें ॥
ऐसें साधिलें पुण्य होय ॥ ८ ॥ द्वादशी हा हरिचा दिवस ॥ येथें ज्याणीं ठेविली आँस ॥ ते सकळ ब्रह्मांड
विशेष ॥ धन्य धन्य निर्धारें ॥ ९ ॥ द्वादशीदिनीं विप्रालागुन ॥ तुलसीपत्रमिश्रित अन्न ॥ मशकपादमात्र देतां
दान ॥ मेरूसमान होय तें ॥ १० ॥ आणि ते दिनीं पारणासमयीं ॥ जरी कोणी जलदान देई ॥ तरी तें सप्त-
सिंधूसम होई ॥ संशय नाहीं क्षीराब्धिजे ॥ ११ ॥ द्वादशीदिनीं करितां तर्पण ॥ तें जळ अमृतासम होऊन ॥
पितृलोकीं पितरांसी पूर्ण ॥ तृप्त करितें सर्वदा ॥ १२ ॥ द्वादशीदिनीं क्षेत्र न वाही ॥ तत्क्षेत्रीं धान्य अक्षय
होई ॥ आणि नारूंढे वाहनाठायीं ॥ तो स्वर्गीं जाई आनंदें ॥ १३ ॥ आणि ते दिनीं भूदान देत ॥ ते
शतकल्प वैकुंठीं वसत ॥ वस्त्रदानकर्ते अष्टकल्पांत ॥ आनंदें राहती चंद्रलोकीं ॥ १४ ॥ शुद्धकपिलाधेनूचें
दान ॥ द्वादशीदिनीं करी जो जन ॥ धेनूरोमसंख्या ततपितृगण ॥ जाती उद्धरोन मम लोकीं ॥ १५ ॥ विद्यादान
करी द्वादशीसी ॥ तो सदा होई स्वर्गवासी ॥ आणि पुनश्च कदा मेदिनीसी ॥ जन्म न घेची निश्चयें ॥ १६ ॥

१ नाशरहित. २ स्थान ( ब्रह्मपद ). ३ आंवळीच्या मुळाशीं. ४ आशा. ५ माशीच्या पायांइतकें. ६ न चढे.
७ त्याचे पितर.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

एवं द्वादशी प्रतिमासींच्या ॥ पुण्यराशी असोनि साच्या ॥ त्यांपेक्षेंहि अधिकमासांच्या ॥ आधिकचि असती निश्चयें ॥ १७ ॥ अधिकमासीं द्वादशीदिवशीं ॥ जो दे धनवस्त्रपादुकादानांसी ॥ तयाचें इच्छित मी हृषीकेशी ॥ आनंदेंसीं पुरवितों ॥ १८ ॥ अधिकमासीं कृष्णद्वादशीस ॥ जो रम्य पादुका दे विप्रास ॥ तो पुण्यात्मा यमाच्या दूतांस ॥ न विलोकीच निर्धारीं ॥ १९ ॥ रत्नखचित सुवर्णपादुका ॥ सुपात्र विप्रासि अर्पी जो कां ॥ तो पावोनि वैकुंठलोका ॥ भोगितो सुखा चिरकाळ ॥ २० ॥ आणि कार्पासवस्त्र पट्टकूळ ॥ कौशेयं तृणसंभूत निर्मळ ॥ कीं ऊर्णिक औष्ट्रिक सोज्वळ ॥ ऐसीं अनेक वस्त्रें जीं ॥ २१ ॥ यांतूनि कोणत्याही वस्त्राचें दान ॥ ते दिनीं देतां विप्रालागुन ॥ वस्त्रतंतुसंख्या वर्षे जाण ॥ वैकुंठीं वसती होय पैं ॥ २२ ॥ माहिष किंवा गव्य घृत ॥ द्वादशी-दिनीं दान देत ॥ तयां वैकुंठीं कल्पांतपर्यंत ॥ सुख अत्यंत लाभतें ॥ २३ ॥ कैसाहि उपाय करुनी ॥ अधिकमासीं घृत द्यावें प्रतिदिनीं ॥ नातरी उभयद्वादशीदिनीं ॥ कीं विशेषें कृष्णद्वादशीस ॥ २४ ॥ सकळ रसांमाजीं सारार्थ ॥ जें घृत देवांचें भोज्यपदार्थ ॥ तयाच्या दानाचें फळ यथार्थ ॥ वर्णाया समर्थ मी नव्हें ॥ २५ ॥ द्वादशीदिनीं जें घृत देणें ॥ तें मुख्यत्वें बाराप्रस्थ असणें ॥ यामाजीं कांहीं न केलें उणें ॥ तरी तें अत्युत्तम दान होय ॥ २६ ॥ अधिकमासीं द्वादशीदिनीं ॥ ऐसें घृतदान करी जो भुवनीं ॥ तया शतावधि अन्य द्वादशीनीं ॥ काय कर्तव्य असे पां ॥ २७ ॥ द्वादशीदिनीं सूर्योदयीं ॥ जो घृतदान विप्रासि देई ॥ तया मी विष्णु शेषशायी ॥ प्रसन्न होई तत्काळ ॥ २८ ॥ द्वादशीदिनीं शतभार घृत ॥ जो दान दे ब्राह्मणाप्रत ॥ तया महाराज्य होय प्राप्त ॥ हें मी सत्य सत्य सांगतों ॥ २९ ॥ इंदिरे द्वादशीदिनीं पाहीं ॥ वित्तशाठ्य न करितां कांहीं ॥ स्वशक्त्यनुसार अत्यल्पही ॥ घृतदान देई जो विप्रा ॥ ३० ॥ तयासि माझ्या कृपेंकरून ॥ इह-परत्रीं भोग संपूर्ण ॥ इच्छानुसार प्राप्त होऊन ॥ आनंद पूर्ण होतसे ॥ ३१ ॥ माघी पुनवेसि एक हजार ॥



१ खऱ्या. २ खचित. ३ रेशमी. ४ गवताचें. ५ लोकरीचें. ६ उंटाच्या लोकरीचें ७ मुख्य. ८ बारा शेर. ९ द्रव्याविषयीं कंजूषपणा.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

घृतधेनुदान देतां साचार ॥ कीं वैधृतियोगीं कंबलसहस्र[1] ॥ दान देतां फळ होय जें ॥ ३२ ॥ तेंचि फल प्रिये अधिकमासीं ॥ द्वादशीदिनीं ब्राह्मणासी ॥ जो घृतदान देई तयासी ॥ निश्चयेंसी प्राप्त होय ॥ ३३ ॥ अधिकमासीं द्वादशीदिनीं ॥ जो प्रवर्तला घृतदानीं ॥ तयाचीं अनंतपापें तत्क्षणीं ॥ गेलीं निरसोनी जाणिजे ॥ ३४ ॥ अन्यदिनीं घृतदान करितां ॥ जें कां पुण्यफल ये हातां ॥ त्याहुनि माहिषघृतें[2] देतां ॥ लक्षगुणें फल होय ॥ ३५ ॥ आणि गव्यघृताचें[3] देतां दान ॥ कोटिगुण फळ लाभे जाण ॥ कपिला धेनूच्या घृताचें दान ॥ अनंतगुणें फलदायक ॥ ३६ ॥ जो सामान्य द्वादशीदिनीं ॥ भक्ती प्रवर्ते घृतदानीं ॥ तो सप्तपूर्वजां सर्व घेऊनी ॥ वैकुंठभुवनीं नांदतो ॥ ३७ ॥ ऐसें सर्व द्वादशीदिनींचें ॥ घृतदानफळ असे साचें ॥ याहूनि अधिमासींच्या बारशीचें ॥ पुण्यफळ आहे विशेष ॥ ३८ ॥ अधिकमासीं द्वादशीदिनीं ॥ घृतदान देतां विप्रालागुनी ॥ कदा कवण्याहि प्रकारें त्रिभुवनीं ॥ दुःख भोगावें लागेना ॥ ३९ ॥ प्रिये फार काय बोलूं वाचिक ॥ आतां शेवटील सांगतों ऐक ॥ द्वादशीदिनीं भक्तिपूर्वक ॥ कीजे स्वल्पही घृतदान ॥ ४० ॥ कांस्यपात्रीं घालूनि घृत ॥ सुवर्णाचे प्रतिमेसहित ॥ पूजूनियां यथास्थित ॥ दान दीजे विप्रासी ॥ ४१ ॥ तेणें सर्वदानतपांचें फळ ॥ निश्चयें प्राप्त होतें अचळ ॥ द्वादशीचें घृतदान सकळ ॥ यज्ञांहूनि अधिक असे ॥ ४२ ॥ ऐसें घृतदानमहिमान ॥ आतां सांगतों अन्नदान ॥ मासांमाजीं अधिकमासासमान ॥ नसे आन[4] श्रेष्ठ जैसा ॥ ४३ ॥ कीं पुरुषोत्तमासम देव नाहीं ॥ कीं द्वादशी श्रेष्ठ तिथींठायीं ॥ तैसेंचि सर्व दानांत पाहीं ॥ श्रेष्ठ राही अन्नदान ॥ ४४ ॥ असाक्षिभोजन द्वादशीस ॥ तया ऐसा न दुजा दोष ॥ अनुकूल असे जैसें ज्यास ॥ तैसेंचि विप्रास अर्पावें ॥ ४५ ॥ वित्तशाठ्य न करावें ॥ भगवंतासंमुख असावें ॥ अतिथीसी विन्मुख न दवडावें ॥ वित्त जवळ असोनियां ॥ ४६ ॥ द्वादशीदिनीं अन्नदान ॥ जेणें दीधलें विप्रालागुन ॥ तेणें शतपूर्वज नरकांतून ॥ तारिले जाण निश्चयें ॥ ४७ ॥ जे मनुष्य अन्नदान देती ॥ तयां प्राणदाते ऐसें म्हणती ॥ अन्नाधारें सर्व जगतीं ॥ जीव

१ सहस्र कांबळीं. २ म्हशीचें तूप. ३ गाईचें तूप. ४ अन्य.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

राहती म्हणोनियां ॥ ४८ ॥ चैत्रवैशाखांत उदक ॥ दान देतां पुण्यफलदायक ॥ पौषमासामाजीं देख ॥ फलदायक काष्ठदान ॥ ४९ ॥ ऐसें एकेक काळीं दान ॥ पुण्यफलदायक असे जाण ॥ आणि अन्नदान सर्वदा समान ॥ म्हणोन श्रेष्ठ सर्वांत तें ॥ ५० ॥ ग्रहणें अमावास्या व्यतीपात ॥ हीं लक्ष लक्ष एकत्र केलीं समस्त ॥ तरी द्वादशीच्या षोडशांशाप्रत ॥ नच तुळती कदाही ॥ ५१ ॥ द्वादशीदिनीं भावेंकरून ॥ स्नान जप तप होम दान ॥ इत्यादि जें कांहीं करावें पुण्य ॥ होतें संपूर्ण अक्षयीं तें ॥ ५२ ॥ ऋषि गंधर्व विधि[1] मी याहीं ॥ विचार करितां पूर्वसमयीं ॥ द्वादशीसम जगीं ना कांहीं ॥ ऐसें सकळीं निर्धारिलें[2] ॥ ५३ ॥ अहो द्वादशीव्रताचरणेंसीं ॥ निधिपतित्व लाधलें कुबेरासी ॥ प्रजासंयमन[3] यमधर्मासी ॥ आणि वासवासी[4] इंद्रत्व ॥ ५४ ॥ द्वादशीव्रतें अंबरीष तरला ॥ सकळरायां वरिष्ठ झाला ॥ दुर्वासाचा गर्व हरिला ॥ शरण आला ऋषिवर्य ॥ ५५ ॥ तें अंबरीषाचें आख्यान ॥ त्रिजगतपावन आहे जाण ॥ परी तयाचें करितां वर्णन ॥ ग्रंथ महान होईल ॥ ५६ ॥ ऐसा अत्युत्तम द्वादशीदिवस ॥ तयासि मिळतां अधिकमास ॥ मग तेथींच्या पुण्यविशेषास ॥ काय गे सुंदरि वर्णावें ॥ ५७ ॥ अधिकमासीं द्वादशीदिवसीं ॥ जे देत वस्त्रान्नघृतदानांसी ॥ ते मनुष्यजन्माच्या सार्थक्यासी ॥ पावोनि धन्य होतात ॥ ५८ ॥ कलामात्रही द्वादशी असतां ॥ अन्नदान करी जो दाता ॥ तयाची वाढूनि सौभाग्यता ॥ आयुष्या हीनता न येचि ॥ ५९ ॥ अधिकमासीं बारसदिनीं ॥ स्नानदानादि कर्माचेनी ॥ कोटिशः महापापांची धुणी ॥ होय तत्क्षणीं मम कांते ॥ ६० ॥ प्रयागीं माघस्नानें हजार ॥ करितां जें फल लाभे समग्र ॥ तेंचि अधिकमासीं साचार ॥ द्वादशीव्रतें लाभतें ॥ ६१ ॥ कुरुक्षेत्रीं सूर्यग्रहणीं ॥ कपिलाधेनूशतदानाचेनी ॥ जें फळ लाभे नरां भुवनीं ॥ तेंचि ते दिनीं लाभतें ॥ ६२ ॥ बारस दिनीं सर्षपमात्रान्न[5] ॥ देतां होय तें मेरुप्रमाण ॥ तेंचि अधिमासींचें असेल दान ॥ तरी मग काय वर्णावें ॥ ६३ ॥ अधिमासींच्या सर्वही तिथी ॥ सुपुण्यफलदायक असती ॥ तरी त्यांतही द्वादशी अती ॥ श्रेष्ठ असे साचार ॥ ६४ ॥ म्हणोनि

१ ब्रह्मदेव. २ निश्चयें ठरविलें. ३ प्रजा वागविणें. ४ इंद्रास. ५ मोहरीइतकेंही अन्न.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

मुख्यत्वें द्वादशीसी ॥ दान द्यावें सत्पात्रासी ॥ सत्पात्राविण दानासी ॥ योग्यता मुळीं नाहींच ॥ ६५ ॥ प्राणाविण जैसें शरीर ॥ कीं तारुण्याविण पंचशर ॥ कीं दयेविण ज्ञान परिकर ॥ शांतिविण वैराग्य जैसें ॥ ६६ ॥ कीं संपत्ति जैसी धर्मेविण ॥ कीं पंडितावांचून सभास्थान ॥ कीं दीपेंविण जैसें सदन ॥ फळेंविण तरु जैसा ॥ ६७ ॥ कीं जळावांचून वापिका ॥ कीं नृपाविणें नगरी देखा ॥ कीं नासिकेविण मुखा ॥ शोभा जैशी नयेची ॥ ६८ ॥ कीं पुत्राविण वंश पवित्र ॥ कीं बुबुळांविण जैसे नेत्र ॥ कीं वेदांतज्ञानाविण विचित्र ॥ कोरडी व्युत्पत्ती व्यर्थ जैशी ॥ ६९ ॥ तैसें सत्पात्रावांचून ॥ दान देतां व्यर्थ संपूर्ण ॥ म्हणोनि सत्पात्र विलोकून ॥ त्यासचि दान अर्पावें ॥ ७० ॥ द्वादशीदिनीं कर्पूरयुक्त ॥ तांबूल दे जो ब्राह्मणाप्रत ॥ तो आपुल्या पूर्वजांसहित ॥ पावतो त्वरित वैकुंठीं ॥ ७१ ॥ आणि कर्पूराचे जितुके कण ॥ किंवा तांबूलपत्रांचें जें प्रमाण ॥ तितुके कल्प-पर्यंत जाण ॥ तेथेंचि आनंदें राहतो ॥ ७२ ॥ ऐसें तांबूलदान अद्भुत ॥ त्याहूनिही अन्नदान महत ॥ द्वादशी-दिनीं जे अन्न देत ॥ ते ना परतत वैकुंठींहुनी ॥ ७३ ॥ जगीं द्वादशी आहे म्हणोनि ॥ पुण्यक्षेत्रतीर्थांसि भुवनीं ॥ लोकपापदहनालागुनी ॥ किंचित्किंचित् सामर्थ्य असे ॥ ७४ ॥ ना तरी तीं सकळ व्यर्थ ॥ म्हणोनि सांगतों मुख्यार्थ ॥ कोठें न जातां तीर्थयात्रार्थ ॥ द्वादशीव्रत तेथेंचि करीं ॥ ७५ ॥ जो नर मोहें द्वादशीदिवशीं ॥ कांहीं न देई दान विप्रासी ॥ दुःखदारिद्र्य रोगादि त्यासी ॥ अहर्निशीं पीडितात ॥ ७६ ॥ काशी कांची मथुरा द्वारका ॥ गंगाद्वार अयोध्या अवंतिका ॥ ह्या असती पुण्यफलदायका ॥ परि न लेखा द्वादशीसम ॥ ७७ ॥ शुक्ल अथवा कृष्णद्वादशी ॥ समानता असे यांसी ॥ लोकांमाजीं द्वादशी ऐसी ॥ मत्प्रीतिकर्त्री तिथी नसे ॥ ७८ ॥ अधिकमासीं शुक्लपक्षांत ॥ द्वादशीदिनीं जे अन्न देत ॥ तयां तीर्थ यज्ञ तप व्रत ॥ इत्यादि किमर्थ पाहिजे ॥ ७९ ॥ द्वादशीदिनीं प्रभातीं उठोन ॥ भावें मज विष्णूसि पूजुन ॥ घृताद्युपस्करयुक्त अन्न ॥ ब्राह्मणास दान दीजिये ॥ ८० ॥ अन्नदानाहूनि दान अधिक ॥ त्रिजगीं त्रिशुद्धी नसे देख ॥ आणि द्वादशीसम तिथी एक ॥

१ मदन. २ गृह. ३ वृक्ष. ४ समजा ( पहा ). ५ घृतादि सामुग्री ( उपांग ) युक्त. ६ कधींही.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

नसेचि जाण सिंधुजे ॥ ८१ ॥ ज्या मासाचा जो अधिपती ॥ तया पूजावें द्वादशीप्रभातीं ॥ अधिकमासीं पुरुषोत्तमाप्रती ॥ द्वादशीतिथीं पूजावें ॥ ८२ ॥ मग वस्त्रयुग्म उपवीत घृत ॥ आणि पादुका देणें विप्राप्रत ॥ ऐसें अधिमासीं करितां व्रत ॥ फल अनंत होय पैं ॥ ८३ ॥ अधिकमासीं द्वादशी ठायीं ॥ विप्रासि दान देतां कांहीं ॥ तत्फलवर्णनार्थ सहस्रमुखांहीं ॥ शेषही नाहीं समर्थ ॥ ८४ ॥ ऐसें हें द्वादशीचें महिमान ॥ प्रिये तुज कथिलें संक्षेपान ॥ ह्यासि जे भक्तिभावें करून ॥ श्रवण पठण करतील ॥ ८५ ॥ तयांचे सकळ पापराशी ॥ दग्ध होतील समूळेंसी ॥ उभयलोकीं अखंड सुखासी ॥ पावतील जाण निश्चयें ॥ ८६ ॥ आणि तयांचे सर्व मानोरथ ॥ पुरवील श्रीगोलोकनाथ ॥ एतद्विषयीं कोणीहि मनांत ॥ संशय धरूं नयेची ॥ ८७ ॥ द्वादशीच्या दानाविषयीं ॥ जयांसि कांहींच शक्ति नाहीं ॥ तयीं हें भावें ऐकतांही ॥ दानफळ सर्वही लाभेल ॥ ८८ ॥ भगवत्प्रिय द्वादशीदिन ॥ तयाचें आहे येथें वर्णन ॥ म्हणोन बुधीं हें नेमान ॥ द्वादशीदिनीं ऐकावें ॥ ८९ ॥ इति श्रीअधिकमासमाहात्म्यसार ॥ बृहन्नारदीयपद्माधार ॥ सज्जन श्रोते ऐकोत चतुर ॥ एकोनविंशोध्याय गोड हा ॥ १९ ॥ इति एकोनविंशोऽध्यायः ॥ १९ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

१ दोन वस्त्रें. २ जानवीं.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

॥ श्रीगणेशाय नमः ॥ ॥ श्रीरामभक्त वाल्मीकीऋषी ॥ पुनश्च सांगत दृढधन्व्यासी ॥ राया हरीनें इंदिरेसी ॥ पंचपर्व माहात्म्य कथिलें जें ॥ १ ॥ तें ऐकुनि क्षीरांब्धिनंदिनी ॥ मागुती हरीतें हस्त जोडुनी ॥ म्हणे हो प्रभो कृपा करूनी ॥ उत्तम कथा कथिलीत ॥ २ ॥ परी पुनश्च लोककल्याणार्थ ॥ अधिमासमाहात्म्य सांगा अद्भुत ॥ ऐसें तियेचें ऐकूनि भाषित ॥ प्रेमें बोलत श्रीहरी ॥ ३ ॥ अगे कांते अधिमासांत ॥ द्वादशी पुनव व्यतीपात ॥ ह्या दिनीं दान देतां किंचित ॥ महत्फल प्राप्त होतें ॥ ४ ॥ जें सकळ यज्ञांचें पुण्य ॥ आणि सर्व तीर्थांचें फल जाण ॥ तें सर्वही याणेंच मिळून ॥ लाभतें मोक्षसदनही ॥ ५ ॥ व्यतीपात पुनव द्वादशी ॥ ह्यांतून कोण-त्याहि दिवशीं ॥ विशेष करावें ज्या दानासी ॥ तें प्रिये तुजसी सांगतों ॥ ६ ॥ उत्तम गुडें मिश्रित केलें ॥ साजूक घृतामाजीं तळिले ॥ ऐसे तेहतीस अपूंप चांगले ॥ कांस्यपात्रीं ठेवावे ॥ ७ ॥ आणि तयांवरी वस्त्र घालून ॥ उपांनह सन्निध ठेवून ॥ गंधाद्युपचारीं संपूर्ण ॥ अपूप पूजन करावें ॥ ८ ॥ मग आसनपाद्यार्घ्या-दिकेंसीं ॥ पूजूनियां सद्ब्राह्मणासी ॥ दक्षिणा तांबूलसहित त्यासी ॥ दान द्यावें तें सर्व ॥ ९ ॥ आणि कलाकांष्ठादिरूपेण ॥ इत्यादि सप्तश्लोक म्हणून ॥ पुरुषोत्तमाची प्रार्थना करून ॥ उदक जाण सोडावें ॥ १० ॥ इंदिरे ऐसें दान करितां ॥ जें कां पुण्यफळ ये हाता ॥ तद्वर्णना मी शिव किंवा धाता ॥ समर्थ सर्वथा नाहींत ॥ ११ ॥ अधिमासामाजीं जे कोणी ॥ सादर होती तद्व्रताचरणीं ॥ ते पुरुषोत्तमाच्या सन्निधानीं ॥ कल्पां-

---

१ लक्ष्मीस. २ क्षीरसागराची कन्या ( लक्ष्मी ). ३ अनरसे. ४ पादरक्षा. ( पायांतील जोडे ). ५ कलाकाष्ठादिरूपेणयोनित्येवर्तते हरिः ॥ लोकेविप्रस्वरूपेणतस्मैकालात्मनेनमः ॥ १ ॥ यस्यहस्तेगदाचक्रंगरुडोयस्यवाहनम् ॥ शंखःकरतलेयस्य समेविष्णुःप्रसीदतु ॥ २ ॥ अधिमासेतुसंप्राप्तेघृतंवस्त्रमुपानहौ ॥ दानंगृहाणसर्वात्मन्व्रतसंपूर्णहेतवे ॥ ३ ॥ साज्यं च सगुडंचैवत्रयस्त्रिंशदपूपकम् ॥ प्राणिनांप्रीणनार्थायतस्मै कालात्मनेनमः ॥ ४ ॥ कुरुक्षेत्रमिदंदेशःसाक्षाद्विष्णुरयंद्विजः ॥ पृथ्वीसममिदंदानंगृहाणपुरुषोत्तम ॥ ५ ॥ मलानांचैवशुद्ध्यर्थंपापप्रशमनायच ॥ पुत्रपौत्रादिवृद्ध्यर्थंतवदास्यामिभास्कर ॥ ६ ॥ आधिमासेतुसंप्राप्तेपुण्येदत्तंजनार्दन ॥ त्वामुद्दिश्यसुराध्यक्षप्रसीदपुरुषोत्तम ॥ ७ ॥ येनाक्रांतास्त्रयोलोकादानवाश्चवशीकृताः ॥ शरण्यंसर्वभूतानांसमेविष्णुःप्रसीदतु ॥ ८ ॥



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तंवरी वसतात ॥ १२ ॥ पूजारहित देवमूर्तीसी ॥ जे नर पूजिती अधिमासीं ॥ ते सकळ यथेच्छफलांसी ॥ पावती जाण निश्चयें ॥ १३ ॥ तैसेंचि गोब्राह्मणपूजन ॥ भक्तिभावें करिती अनुदिन ॥ तेहि यथेच्छ भोग भोगून ॥ स्वर्गभुवन पावती ॥ १४ ॥ अधिकमासीं तुळशीप्रती ॥ पूजितां सर्व मनोरथ पुरती ॥ आणि अंतीं अक्षय स्वर्गप्राप्ती ॥ होते जाण निश्चयें ॥ १५ ॥ गंधर्व अप्सरा यक्ष प्रेत ॥ आणि सर्व पक्ष्यादि जीव बहुत ॥ अधिमासपुण्यें पापनिर्मुक्त ॥ होऊनि स्वर्गीं पावले ॥ १६ ॥ याचविषयीं पूर्ववृत्त एक ॥ प्रिये तुज सांगतों ऐक ॥ जयाच्या श्रवणमात्रें देख ॥ पापें सकळ लोपतीं ॥ १७ ॥ कुबेराची प्रिय परम ॥ स्मितविलासिनी जियेचें नाम ॥ ऐसी एक अप्सरा उत्तम ॥ इंद्रलोकीं वसतसे ॥ १८ ॥ ती एकदां क्रीडाव-यासी ॥ सर्वे घेऊनियां सखियांसी ॥ स्वर्गींहूनि मृत्युलोकासी ॥ कुरुक्षेत्रीं पातली ॥ १९ ॥ चिरकाळपर्यंत ते स्थळीं ॥ सखियांसंगें बहु क्रीडली ॥ मग सुगंधपुष्पें वेंचूनि चांगलीं ॥ माळ गुंफिली तियेनें ॥ २० ॥ स्वहस्तीं घेतली ती माळ ॥ दिगंतीं चालिला परिमळ ॥ तों तियेच्या हृदयीं कामानळ ॥ अति प्रबळ भडकला ॥ २१ ॥ तेणें ती जाहली कासावीस ॥ दीर्घ चालले श्वासोच्छ्वास ॥ मग समीपवर्तीसखियांस ॥ म्हणे यासमयास काय कीजे ॥ २२ ॥ ज्याच्या कंठीं ही माळ घालून ॥ तयासंगें मी सुख पावेन ॥ ऐसा येथें मज-समान ॥ पुरुष कोणी दिसेना ॥ २३ ॥ तरी आतां करावें कायी ॥ कैसें दुःख निरसेल बाई ॥ ऐसें ती अप्सरा नानातरांहीं ॥ सखियांलागीं बोलतसे ॥ २४ ॥ तों दुर्वासऋषि महाकोपन ॥ तेथें अवचित पातला जाण ॥ तया पाहतांचि तद्भयेंकरून ॥ सख्या तेथून पळाल्या ॥ २५॥ स्मितविलासिनी मात्र एकली ॥ काममोहें तेथेंचि राहिली ॥ आणि अविचारें माळ वहिली ॥ गळां घातली ऋषीच्या ॥ २६ ॥ तेणें तो ऋषिवर्य कोपला ॥ लगेच शापवाणी बोलिला ॥ दुष्टे पिशाचीपरी त्वां मजला ॥ स्पर्श केला अवचित ॥ २७ ॥ तरी माझ्या वचनेंकरुनी ॥ तूं पिशाचीच होईं मेदिनीं ॥ हें ऐकूनि ती स्मितविलासिनी ॥ अति दीनवाणी जाहली ॥ २८ ॥ घट्ट धरूनि ऋषीचे चरण ॥ उक्साबुक्सी करीत रुदन ॥ म्हणे समर्था मी अतिदीन ॥ अबला हीन असे पैं ॥ २९ ॥ अहा



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

मी अत्यंत मतिमंद ॥ नेणोनि केला अपराध ॥ तुम्ही दयासागर अगाध ॥ अंतरीं विशुद्ध सर्वदा ॥ ३० ॥ शत अपराध केले स्त्रियांनीं ॥ तरी त्यां न मारिती पंडित कोणी ॥ दीनवत्सल साधुजन दीनीं ॥ दया अनुदिनीं करितात ॥ ३१ ॥ तरी हे साधो दीनानाथा ॥ अपराध क्षमा कीजिये समर्था ॥ तुम्हांवांचूनि मजला आतां ॥ नाहीं रक्षिता कोणीच ॥ ३२ ॥ हें ऐकूनि तो मुनिदेव ॥ यद्यपि असे कोपस्वभाव ॥ तरी प्रपन्नार्ति हरावी सर्व ॥ ऐसें सदैव व्रत त्याचें ॥ ३३ ॥ म्हणोनि तो हृदयीं द्रवला ॥ आणि तियेतें बोलूं लागला ॥ अगे माझिया शापवाणीला ॥ अन्यथा कोणा न करवेची ॥ ३४ ॥ माझें वचन नव्हे असत्य ॥ तूं पिशाची होशील हें सत्य ॥ परी मद्वचनें पुढें तुज पथ्यं ॥ होईल तथ्य ऐक तें ॥ ३५ ॥ महानदीचा अत्युत्तम ॥ जेथें सागराशीं झाला संगम ॥ तयेस्थळीं कुमारी नाम ॥ क्षेत्र परम पवित्र जें ॥ ३६ ॥ तेथें चतुर्युगसहस्रांतीं ॥ कवणेक स्त्री तापसी सती ॥ जिची याज्ञवल्क्यकुळीं उत्पत्ती ॥ तपस्यार्थ ती येईल ॥ ३७ ॥ आणि ती तेथेंच सदा राहून ॥ दुष्कर करितां तपाचरण ॥ अष्टाधिक एकशत पूर्ण ॥ अधिमास जातील ॥ ३८ ॥ त्या प्रत्येक अधिमासांत ॥ स्नान दान दीपार्चन अयाचित ॥ उपवास नक्त मौनव्रत ॥ इत्यादि सतत आचरील ती ॥ ३९ ॥ तैं तूं पीडित क्षुधातृषांनीं ॥ फिरतां फिरतां दैवें करूनी ॥ अधिमासीं कृष्णद्वादशीदिनीं ॥ त्या कुमारक्षेत्रीं जाशील ॥ ४० ॥ तेथें त्या तापसीसि पाहून ॥ तिला सत्वर भक्षावें म्हणून ॥ धांवत धांवत वेगें करून ॥ तत्सन्निध जाशील ॥ ४१ ॥ तों तद्दर्शनमात्रें सोज्वळ ॥ तुज ज्ञान उत्पन्न होईल ॥ मग त्या तापसीसि शुभ बोल ॥ बोलूं लागशील ऐसे कीं ॥ ४२ ॥ हे तपस्विनी पुण्यसरिते ॥ अगाधकरुणामृतसरिते ॥ मजवरी कृपा करोनि माते ॥ लोपवी दुरितें सर्वही ॥ ४३ ॥ लहान थोर सर्व जीवांसी ॥ घोर मृत्यु देणें अहर्निशीं ॥ परी विधातयें पिशाच योनीसी ॥ क्षणमात्रें कोणासी न ठेवणें ॥ ४४ ॥ हे पिशाच अति निकृष्ट ॥ बहुतचि येथें होती कष्ट ॥ म्हणोनि

---

१ शरणागतजनांची सर्व पीडा ( दुःख ). २ निरंतर. ३ चांगलें ( हित ). ४ खरें. ५ अष्टोत्तरशत. ६ हे पुण्याचे नदी. ७ अंत नाहीं अशा करुणारूप अमृतानें भरलेली. ८ पापें.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

माते विनविर्ते स्पष्ट ॥ करीं उत्कृष्ट कृपा आतां ॥ ४५ ॥ ऐसें तुझें दीनवचन ॥ ऐकूनि ती तापसी तत्क्षण ॥ एक अधिमासींचें व्रतफल संपूर्ण ॥ तुजलागुनी अर्पील ॥ ४६ ॥ त्या अधिमासफलें तत्क्षणीं ॥ मुक्त होशील शापापासुनी ॥ या माझ्या उःशापवचनीं ॥ अंतर न पडेचि त्रिशुद्धी ॥ ४७ ॥ ऐसें सांगूनि दुर्वास मुनि ॥ पुढें गेला स्वेच्छेंकरुनी ॥ आणि ती अप्सरा स्मितविलासिनी ॥ पिशाचयोनी पावली ॥ ४८ ॥ दुर्घट वनामाझारीं ॥ कंटकवृक्ष परोपरी ॥ उदक न मिळे चूळभरी ॥ वास करी दुःखानें ॥ ४९ ॥ आळे पिळे वृक्षासि घेत ॥ बहु श्वापदें संगें असत ॥ सदा तळमळे क्षुधाक्रांत ॥ करी घात जीवांचा ॥ ५० ॥ ऐसी युगसहस्रपर्यंत ॥ तेथेंचि राहिली दुःख भोगित ॥ पुढें फिरतां फिरतां अवचित ॥ महीसिंधुसंगमीं पातली ॥ ५१ ॥ शापमुक्तीची वेळा आली ॥ क्षुद्तृषांनीं बहु पीडिली ॥ तंव पुढें तापसी देखिली ॥ तीतें धावली भक्षावया ॥ ५२ ॥ तों अंतरीं उपजलें ज्ञान ॥ मुनिवचनाचें झालें स्मरण ॥ तापसीचे धरिले चरण ॥ भावें शरण रिघाली ॥ ५३ ॥ आणि आपुला पूर्ववृत्तांत ॥ तापसीसि कथिला साद्यंत ॥ त ती होऊनि दयार्द्रचित्त ॥ सत्य करित मुनिवचन ॥ ५४ ॥ एके अधिमासव्रताचें पुण्य ॥ दीधलें तये पिशाचीलागुन ॥ तेणें ती तत्काळ मुक्त होऊन ॥ स्वर्गी जाती जाहली ॥ ॥ ५५ ॥ ऐसें अधिमासाचें महिमान ॥ प्रिये तद्वर्णना समर्थ कोण ॥ ब्रह्मा शेष कीं मी नारायण ॥ हेही संपूर्ण तटस्थ ॥ ५६ ॥ दिल्याविणें न मिळे कांहीं ॥ हें सत्य सत्यचि जैसें पाहीं ॥ तैसें अधिमासाहूनि कांहीं ॥ अधिक नाहीं सत्यसत्य ॥ ५७ ॥ जैसा मजं सम नाहीं पुमान ॥ आणि नारी नाहीं तुजसमान ॥ तैसाचि अधिमासासम आन ॥ मास नसेचि ब्रह्मांडीं ॥ ५८ ॥ पर्वतांमाजीं श्रेष्ठ मेरू ॥ कीं ग्रहांमाजीं भास्करू ॥ कीं पक्षांमाजीं विनतांकुमरू ॥ कीं रोहिणीवरू उडुगणांत ॥ ५९ ॥ कीं द्विपदांमाजीं ब्राह्मण ॥ कीं चतुष्पदांमाजीं गौ जाण ॥ कीं वृक्षांमाजीं अश्वत्थ महान ॥ कीं गंगा श्रेष्ठ सरितांत ॥ ६० ॥ तैसा सर्वमासांत उत्कृष्ट ॥ अधिमासचि असे वरिष्ठ ॥ ऐसें सकळहि मुनिश्रेष्ठ ॥ बोलती स्पष्ट जाण तूं ॥ ६१ ॥ अधिकमासाचिये ठायीं ॥ जें स्नानदानादि

१ कधींही. २ माझ्यासम ( विष्णुसमान ). ३ पुरुष. ४ सूर्य. ५ गरुड. ६ चंद्र. ७ नक्षत्रांत. ८ मनुष्यांत.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

करावें कांहीं ॥ तें घृतपावकन्यायें सर्वही ॥ होतें अक्षयीं जाण तूं ॥ ६२ ॥ ऐसें श्रीहरीनें कथितां ॥ पुनरपि प्रश्नी क्षीराब्धिसुतां ॥ ती परम पावन सर्व कथा ॥ पुढच्या प्रसंगीं वर्णिजेल ॥ ६३ ॥ इतिश्री अधिकमासमाहात्म्यसार ॥ बृहन्नारदीय पद्माधार ॥ सज्जन श्रोते ऐकोत चतुर ॥ विंशतितमोध्याय गोड हा ॥ ६४ ॥ इतिविंशतितमोऽध्यायः॥

१ लक्ष्मी.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

॥ श्रीगणेशाय नमः ॥ वाल्मीकि म्हणे दृढधन्व्यालागुन ॥ चित्त द्यावें श्रवणीं आपण ॥ हरीनें अप्सराशापविमोचन ॥ लक्ष्मीलागुन कथिलें जें ॥ १ ॥ तें ऐकूनि ती क्षीराब्धिसुता ॥ म्हणे हो स्वामी भगवंता ॥ तुम्ही अप्सरोद्धारकथा ॥ मज तत्वतां कथिलीत ॥ २ ॥ आतां अधिकमासस्नानाचें फळ ॥ पुनरपि मज सांगा सकळ ॥ ऐसें ऐकोनियां तमालनीळ[1] ॥ बोले तत्काळ ऐका तें ॥ ३ ॥ हे प्राणप्रिये क्षीरोदकुमरी[2] ॥ जो अधिमासीं नित्य स्नान करी ॥ तयाच्या सर्व पापांची झुरी ॥ होते निर्धारीं तत्काळ ॥ ४ ॥ आणि तो कदा न होय कष्टी ॥ यमपुरी न पडे तयाच्या दृष्टी ॥ सर्व कार्यें साधतीं सृष्टीं ॥ आणि मनस्तुष्टिही[3] होय ॥ ५ ॥ जो करी अधिमासस्नान ॥ तया सर्व देव होती प्रसन्न ॥ आणि तेणें सर्व तीर्थावगाहन[4] ॥ केलें ऐसेंही होतसे ॥ ६ ॥ सूर्योदयीं अधिकमासीं ॥ जो विधियुक्त करी स्नानासी ॥ द्वादशमासस्नानाचें त्यासी ॥ फळ लाभतें निःसंशय ॥ ७ ॥ जो भक्तीनें हरितुष्ट्यर्थ ॥ मलिम्लुंचस्नान[5] करितो सतत ॥ तया महातीर्थस्नानजनित[6] ॥ फल यथार्थ लाभतें ॥ ८ ॥ अधिमासीं गंगोदकस्नान ॥ सर्वार्थकामद होय म्हणोन ॥ अनेकविध प्रयत्न करून ॥ तेंचि सकळीं आचरावें ॥ ९ ॥ ज्या ज्या देवाच्या तुष्ट्यर्थ साचें ॥ ज्या ज्या काळीं स्नान करावयाचें ॥ तें एक करितां अधिमासींचें ॥ सकळ देव संतोषती ॥ १० ॥ अधिमासीं प्रयागीं स्नान करून ॥ माधवाचें घेतां दर्शन ॥ सकळ पापें दग्ध होऊन ॥ मम सालोक्य[7] लाभतें ॥ ११ ॥ अनंत पापें केलीं असत ॥ तरी अधिमासस्नानेंचि त्वरित ॥ त्या पूर्णपापांपासूनि मुक्त ॥ होती जाण निश्चयें ॥ १२ ॥ अधिकमासामाजीं नरीं ॥ स्नान करितां सरस्वतीनीरीं ॥ सहस्रजन्मींचीं पापें सारीं ॥ सहस्रवाटां पळतात ॥ १३ ॥ चंद्रसूर्यग्रहणसमयीं ॥ कोटि गोदानांचें जें पुण्य होई ॥ तेंचि अधिमासीं शुद्धोदकाठायीं ॥ स्नान करितां पाविजेल ॥१४॥ कुरुक्षेत्रादितीर्थीं सतत ॥ स्नान करितां जें फल प्राप्त ॥ आणि लक्ष विप्रां तृप्तिपर्यंत ॥



१ तमालपत्राप्रमाणें श्यामवर्ण ज्याचा तो ( विष्णु ). २ लक्ष्मी. ३ मनाचा संतोष. ४ सर्व तीर्थांचें स्नान. ५ अधिमासस्नान. ६ महातीर्थांच्या स्नानापासून झालेलें. ७ वैकुंठीं राहणें.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

सुभोजन देतां पुण्य जें ॥ १५ ॥ तेंचि अधिमासस्नानेंसीं ॥ प्राप्त होय मानवांसीं ॥ आणि घृतमधुपायसान्नेंसीं ॥ पितरांसि तर्पिलेंसें होय ॥ १६ ॥ मलिम्लुंचस्नानपुण्यानें ॥ देवत्व लाभलें देवांकारणें ॥ तैसेंचि ऋषि देवर्षी याणें ॥ विमल झाले सकळही ॥ १७ ॥ जो महामूर्ख मानव कोण ॥ अधिमासीं न करी स्नान ॥ तो घोर संसारनरकांतून ॥ मुक्त न होय कदापी ॥ १८ ॥ आणि त्याचें तें जन्म वृथा ॥ होय भूभारार्थचि सर्वथा ॥ तेथें दंभेंहि स्नान करितां ॥ मुक्ति हाता येतसे ॥ १९ ॥ जो अधिकमासस्नान न करी ॥ त्याचा धरेसि भार होय ज्यापरी ॥ तैसा वृक्ष नद्या आणि गिरी ॥ यांचाहि होत नाहीं पां ॥ २० ॥ जे मद्भक्तीनें अधिकमासीं ॥ स्नान करिती विनयेंसीं ॥ सर्व तीर्थस्नानफल त्यांसी ॥ इहपरलोकीं लाभतें ॥२१॥ आणि शिवादि देव संपूर्ण ॥ सदा तयासि राहती प्रसन्न ॥ म्हणोनि सर्वीं सर्वदा जाण ॥ अधिमासस्नान करावें ॥ २२ ॥ यज्ञयागादिकीं न श्रमतां ॥ आपणा मुनीची यावी योग्यता ॥ ऐसें भाविती तयीं सर्वथा ॥ अधिमासस्नान करावें ॥ २३ ॥ नाना यज्ञ गृह्याग्नि आणि ॥ इष्टापूर्तादि केल्यावांचुनी ॥ जे स्वर्गास इच्छिती तयांनीं ॥ अधिकमासस्नान करावें ॥ २४ ॥ गोभूमि तिल वस्त्रें सुवर्ण ॥ आणि अन्नादि दानें दिल्याविण ॥ स्वर्गासि इच्छिती तयीं जाण ॥ अधिमासस्नान करावें ॥ २५ ॥ कृच्छ्रचांद्रायणादि व्रतांनीं ॥ स्वतनू शोषिल्यावांचुनी ॥ स्वर्लोकवास इच्छिती तयांनीं ॥ अधिमासस्नान करावें ॥२६॥ वैशाखीं तप चैत्रीं होम ॥ कार्तिकमासीं दानधर्म ॥ ऐसें एकेक मासीं एकेक कर्म ॥ फलद उत्तम कथिलेंसे ॥ २७ ॥ आणि अधिमासीं तों अनुदिनीं ॥ होम तप दान ही तिन्हीं ॥ विशेष फलद आहेत म्हणुनी ॥ सकळ पुराणीं कथिलेंसे ॥ २८ ॥ दानी तपीळ अतिथिभक्त ॥ यांसि ज्या सद्गति प्राप्त होत ॥ त्याच अधिमासस्नानकर्त्यांप्रत ॥ होती प्राप्त इंदिरे ॥ २९ ॥ अन्यपुण्यें करूनि बहुवस ॥ जरी पावला देवलोकास ॥ तरी सुखोपभोगें पुण्यनाश ॥ होतां जन्मास मागुती ये ॥ ३० ॥ आणि अधिमासस्नानीं

१ अधिमासींच्या स्नानपुण्यानें. २ इच्छिती. ३ पाणपोया, धर्मशाळा, अन्नसत्रें, देवालयें, तलाव, विहिरी बांधणें इत्यादि. ४ पुन्हा.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तो पाहीं ॥ एकदां ज्या लोकासि जाई ॥ तेथुनी पुनश्च महीठायीं ॥ जन्मा न येच कदापि ॥ ३१ ॥ प्रिये अधिमासस्नानाहूनि पवित्र ॥ कांहीं न मिळे शोधितां जगत्र ॥ हें सर्व पापनाशक विचित्र ॥ सर्वां सर्वत्र मान्य असे ॥ ३२ ॥ इतरकृत्यांचें नाहीं कारण ॥ हेंचि करितें सर्व पाप दहन ॥ जैसा महाप्रदीप्त कृशान[2] ॥ इंधनें[3] संपूर्ण जाळितो ॥ ३३ ॥ हें सर्वप्रकारें हितकारी ॥ जन्ममरणाचे फेरे वारी ॥ याणेंचि सर्वही नरनारी ॥ मुक्त सत्वरी होतात ॥ ३४ ॥ ऐसें हें अधिमासस्नान ॥ नि[4]ःसीम याचें महिमान ॥ विधि[5] शिव कीं सहस्रवदन ॥ नव्हेत समर्थ वर्णावया ॥ ३५ ॥ परी केवळ लोकहितार्थ ॥ प्रिये म्यां तुज कथिलें किंचित ॥ याचिया श्रवणपठणें त्वरित ॥ पापें समस्त लोपती ॥ ३६ ॥ आणि आधि[6]व्याधि जाती हरुन ॥ सकळ कामना होती पूर्ण ॥ ऐसें सांगूनि स्नानमहिमान ॥ पुनश्च भगवान बोले पैं ॥ ३७ ॥ प्रिये अधिमासीं नित्यस्नान ॥ न घडे तरी करावें त्रिदिन ॥ तयाचेंही फळ संपूर्ण ॥ वर्णू कवण शकेल ॥ ३८ ॥ सर्वसुख धन दीर्घ[7]जीवित ॥ निरोगता सुकीर्ति बहुत ॥ स्वर्ग मोक्ष इत्यादि समस्त ॥ क्रमें लाभत येणेंची ॥ ३९ ॥ ऐसी हरीची ऐकूनि वाणी ॥ पद्मा[8] म्हणे हो चक्रपाणी ॥ पुनःपुन्हा मी प्रश्नितें म्हणोनी ॥ राग मनीं न धरावा ॥ ४० ॥ भक्तकामना पुरविणें ॥ हेंचि प्रभूचें मुख्य करणें ॥ म्हणोनि प्रभो मी निर्भीडपणें ॥ ऐसें आतां विनवितें ॥ ४१ ॥ अधिमासींच्या त्रिदिन स्नानेंसीं ॥ कोणासि गति मिळाली कैसी ॥ ती साद्यंत कथा हृषीकेशी ॥ सांगा मजसी दयाळा ॥ ४२ ॥ ऐसें ऐकोनि शार्ङ्गपाणी ॥ म्हणे प्रिये क्षीरोदनंदिनी ॥ अद्भुत कथा तुजलागुनी ॥ सांगतों साजणी ऐक तूं ॥ ४३ ॥ दक्षिणदेशीं अतिपवित्र ॥ गोदावरीनदीचें तीर ॥ तेथें पैठण नामें सुंदर ॥ एक नगर आहे पैं ॥ ४४ ॥ त्यामाजीं ॥ चातुर्वर्ण्य[9]समस्त ॥ स्वस्वधर्मैं वर्तती सतत ॥ श्रुतिस्मृतिसदाचारयुक्त ॥ असती पंडित सर्वही ॥ ४५ ॥ ऐशा त्या नगरीं पूर्वी देख ॥ आचारप्रिय स्वधर्मपालक ॥ धर्मशर्मानामक ॥ ब्राह्मण एक

---

१ पृथ्वीवर. २ अग्नि. ३ लांकडें. ४ अपार. ५ ब्रह्मदेव. ६ मनाला होणारें दुःख व शरिराला होणारें रोगादिजनित दुःख. ७ चिरायुष्य. ८ लक्ष्मी. ९ ब्राह्मण, क्षत्रिय वैश्य व शूद्र हे चारी वर्ण.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

राहातसे ॥ ४६ ॥ तो अत्यंत वृद्ध बुद्धिमान ॥ सज्जनमान्य महाविद्वान ॥ श्रद्धापूर्वक नियमें अनुदिन ॥ स्वधर्माचरण करीतसे ॥ ४७ ॥ तों कदाचित्कालंपर्ययें वहिला ॥ अधिकमास प्राप्त जाहला ॥ जेथींच्या स्नानें सर्व जीवांला ॥ महत्पुण्य प्राप्त होय ॥ ४८ ॥ तैं त्या धर्मशर्म्यानें मनांत ॥ चिंतिलें कीं काय करावें येथ ॥ वृद्धत्वामुळें ह्या अधिकमासांत ॥ नित्यस्नानार्थ शक्ति नाहीं ॥ ४९ ॥ तरी मासांतीं जरी त्रिदिन ॥ यथाविधि स्नान करीन ॥ अधिमास हा अघनाशन ॥ स्नानेंवीण दवडूं नये ॥ ५० ॥ यथाशक्ति धर्माचरण ॥ करावें ऐसें श्रुतिवचन ॥ म्हणून शक्त्यनुसार मी त्रिदिन ॥ स्नान करीन ह्या मासीं ॥ ५१ ॥ सिंधुंजे ऐसें त्या धर्मशर्म्यानें ॥ निर्धारिलें स्थिरबुद्धीनें ॥ पुढें मलमासांतीं बहुप्रीतीनें ॥ त्रिदिनस्नान आरंभिलें ॥ ५२ ॥ गौतमीमांजीं यथा- विधान ॥ दोन दिवस सारिलें स्नान ॥ तृतीयदिनींहि प्रत्यूषीं उठोन ॥ गौतमीलागुन पावला ॥ ५३ ॥ स्नान करूनियां नित्यवत ॥ शुद्ध कमंडलु जलपूरित ॥ हस्तीं घेऊनि स्वगृहाप्रत ॥ जावया त्वरित परतला ॥ ५४ ॥ ती अरुणोदयाची शुभवेळा ॥ नक्षत्रप्रकाश मंदावला ॥ तैं मार्गें जातां त्या ब्राह्मणाला ॥ प्रेत भेटला अवचित ॥ ५५ ॥ तो क्षुधाकूळ अत्यंत घोर ॥ नेत्र जैसे खँदिरांगार ॥ धर्मनीयुक्त शुष्क शरीर ॥ कांपवी थरथर सर्वदा ॥ ५६ ॥ पेटतां महावृक्षखुंट ॥ तैसा तेजें दिसे विकट ॥ करालं जिव्हा दाढा सर्दट ॥ सखोल पोट दरी जैसी ॥ ५७ ॥ पिंगटवर्ण बाबरेंझोटी ॥ अतिभयानक रुळे पृष्ठीं ॥ वारंवार हस्तचपेटीं ॥ हृदयपैंटीं ताडीतसे ॥ ५८ ॥ वारंवार मुख पसरित ॥ हाहाकारशब्दें गर्जत ॥ ऐसा भयंकर अत्यंत ॥ भयानक भूत होता पैं ॥ ५९ ॥ तया पाहूनि तो ब्राह्मण ॥ अत्यंत हळू बोले वचन ॥ अरे तूं ऐसा भयानक महान ॥ आहेसि कोण सांग मज ॥ ६० ॥ ती विप्रवाणी पडतां कर्णीं ॥ आणि तद्दृष्टिपात होतांक्षणीं ॥ त्या प्रेतासि किंचित् ज्ञान होउनि ॥ विवेकहि मनीं उद्भवला ॥ ६१ ॥ मग तो प्रेत हस्त जोडून ॥ धर्मशर्म्याप्रति नमस्कारून ॥ अति विनयें सूक्ष्म

१ कालगतीनें. २ पापनाशक. ३ लक्ष्मी. ४ निश्चय केला. ५ गोदावरीमध्यें. ६ पहांटे. ७ खैराचे निखारे. ८ शिरायुक्त. ९ कुरूप. १० विक्राळ. ११ मोठ्या. १२ मोकळे केश, जटा. १३ हृदय.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

वचन ॥ बोलता झाला साक्षेपें ॥ ६२ ॥ हे भगवन् विप्रेंद्रवरा ॥ सांगतों ऐकें मम समाचारा ॥ सकळजनांतें भीति देणारा ॥ ऐसा मी खरा प्रेत आहें ॥ ६३ ॥ आमुचें भक्षण निंद्य फार ॥ दुर्गंधि चिळस देणार ॥ आणि स्मशानादि स्थानें घोर ॥ तेथें निरंतर वास आम्हां ॥ ६४ ॥ छिद्रं पाहूनियां लोकांसी ॥ पीडावें हेंचि काम आम्हासी ॥ अत्यंत दुरात्मा मानसीं ॥ अहर्निशीं वसतसे ॥ ६५ ॥ परी त्वद्दृष्टि पडली मजवरी ॥ आणि कानीं पडली तव वैखरी ॥ तेणेंयोगें मम अंतरीं ॥ किंचित् ज्ञान उद्भवलें ॥ ६६ ॥ आणि विवेकहि झाला उत्पन्न ॥ म्हणोन प्रार्थितों कर जोडून ॥ तरी दयाळा कृपा करून ॥ मजलागुन उद्धरीं ॥ ६७ ॥ जें कां सकळ पुण्य-कारक ॥ आणि सर्व पापांचें नाशक ॥ तें तव दर्शन अलोलिक ॥ आज मज देख लाभलें ॥ ६८ ॥ तरी आतां सत्वर निश्चयेंसीं ॥ उत्तम सौख्य होणार मजसी ॥ ऐसें तो पिशाच धर्मशर्म्यासी ॥ आणि विनयेंसीं बोलतसे ॥ ६९ ॥ तंव धर्मशर्म्याच्या हृदयीं ॥ कृपा उपजली प्रेताविषयीं ॥ दीनदयाळुत्व संतांठायीं ॥ सर्वदा पाहीं वसतसे ॥ ७० ॥ कैसाहि महापापी असून ॥ जरीकां रिघेल संतांसि शरण ॥ तरी ते तत्काळ कृपा करून ॥ तयालागून उद्धरिती ॥ ७१ ॥ ऐसा सत्पुरुषांचा स्वभाव ॥ तेथें उच्चनीच हा नाहीं भाव ॥ यक्ष राक्षस पिशाच्च मानव ॥ इत्यादि सर्व सम त्यांसी ॥ ७२ ॥ असो तो धर्मशर्मा ब्राह्मण ॥ दीनदयाळु असे म्हणून ॥ त्या प्रेताविषयीं कनवाळून ॥ बोले वचन तयासी ॥ ७३ ॥ अरे प्रेता तुज हें असलें ॥ प्रेतत्व कोणत्या पापें आलें ॥ हें जर सांप्रत ज्ञान असलें ॥ तरी तूं वहिलें सांग मज ॥ ७४ ॥ त्या सर्व पापांचें निवारण ॥ मी यथा-शक्ति करीन जाण ॥ हें ऐकूनि त्या प्रेतासि तत्क्षण ॥ पूर्वस्मरण जाहलें ॥ ७५ ॥ मग तो जोडूनि उभय हस्त ॥ विनयें बोले धर्मशर्म्याप्रत ॥ हे दयार्णवा मी पूर्वजन्मांत ॥ पापें बहुत आचरलों ॥ ७६ ॥ स्वर्णादि बहु वस्तु चोरिल्या ॥ परदारा असंख्य धर्षिल्या ॥ अनेकविध सुरा सेविल्या ॥ कुमारी भोगिल्या बलात्कारें ॥ ७७ ॥ ब्राह्मणघात बहुत केले ॥ द्रव्यलोभें बाळक वधिले ॥ इत्यादि नानापापांचे आगळे ॥ पर्वत केले म्यां तेथें

१ कांहीं न्यूनपणा झालें अशी संधी. २ वाणी.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

॥ ७८ ॥ पुढें आयुष्यांतीं यमदूतांहीं ॥ मज दृढ बांधूनि लवलाहीं ॥ नेऊनियां यमपुरीठायीं ॥ नरकडोहीं टाकिलें ॥ ७९ ॥ तेथें अनंत संवत्सर ॥ नरकदुःखें भोगवूनि फार ॥ आतां मज हें प्रेतशरीर ॥ अत्यंत घोर दिलें असें ॥ ८० ॥ येथेंहि कोट्यावधि नाना ॥ म्यां भोगिल्या घोर यातना ॥ परी पापाचा परपार जाणा ॥ मज दिसेना अद्यापि ॥ ८१ ॥ किंवा ज्यापेक्षें हें चांगलें ॥ तव दर्शन मज लाभलें ॥ तस्मात् पापाचें परतीर भलें ॥ मिळालें ऐसेंहि दिसताहे ॥ ८२ ॥ ऐसें प्रेताचें ऐकितां वचन ॥ तो धर्मशर्मा दयाळु ब्राह्मण ॥ म्हणे रे प्रेता त्वत्पाप संपूर्ण ॥ नाशितों जाण आतांची ॥ ८३ ॥ ऐसें बोलूनि विप्रें सत्वरी ॥ काय केलें ऐकें सुंदरी ॥ श्रीहरीतें स्मरूनि अंतरीं ॥ उदक करीं घेतलें ॥ ८४ ॥ आणि स्वयें अधिमास त्रिदिन ॥ जें यथाविधि केलें स्नान ॥ तत्पुण्यदानाचा संकल्प करून ॥ सोडिलें जीवन प्रेतहस्तीं ॥ ८५ ॥ ऐसें तें पुण्य मिळतां समस्त ॥ दिव्यरूप झाला तो प्रेत ॥ मग वंदूनि त्या ब्राह्मणाप्रत ॥ स्तवूं लागला आनंदें ॥ ८६ ॥ तों नानाभोगीं परिपूर्ण ॥ आणि अप्सरागणीं संकीर्ण ॥ ऐसें तेथें अत्युत्तम विमान ॥ स्वर्गींहून उतरलें ॥ ८७ ॥ तयामाजीं तो बैसूनि तत्क्षणीं ॥ भावें स्तवीत विप्रालागुनी ॥ तत्प्रसादें निर्जरभुवनीं ॥ आनंदें पावता जाहला ॥ ८८ ॥ इंदिरे अधिमासीं त्रिदिन ॥ स्नान करितां ऐसें पुण्य ॥ मग तीस दिवस अनुदिन ॥ करितां कवण वर्णील तें ॥८९॥ ऐसें ऐकूनि सिंधुनंदिनी ॥ म्हणे हे भगवंता चक्रपाणी ॥ तुमची ही साधुतुल्य वाणी ॥ ऐकूनि धणी न पुरेच ॥ ९० ॥ तरी आतां कृपा करून ॥ आणीक सांगा स्नानमहिमान ॥ ऐसें ऐकूनियां नारायण ॥ पुनश्च सांगूं लागला ॥ ९१ ॥ ती कथा परम पवित्र ॥ पुढच्या प्रसंगीं होईल विचित्र ॥ तरी श्रोतीं देऊनि श्रोत्र ॥ एकाग्रचित्तें ऐकिजे ॥ ९२ ॥ इति श्रीअधिकमासमाहात्म्यसार ॥ बृहन्नारदीयपद्माधार ॥ सज्जन श्रोते ऐकोत चतुर ॥ एकविंशाध्याय गोड हा ॥ २१ ॥ इति एकविंशोऽध्यायः ॥ २१ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीभगवान् वैकुंठविहारी ॥ इंदिरेसि म्हणे वो सुंदरी ॥ पूर्वी मरुदेशामाझारीं ॥ विचित्र एक वर्तलें ॥ १ ॥ सप्तशत महाक्रूर प्रेत ॥ अधिमासप्रभावें झाले मुक्त ॥ ती कथा अत्यंत अद्भुत ॥ सांगतों समस्त ऐक तूं ॥ २ ॥ मरुदेशीं गोकर्णपर्वत ॥ तत्पार्श्वभागीं अति विस्तृत ॥ शिवपुरीनामें सर्वविख्यात ॥ एक नगरी आहे पैं ॥३॥ ती सर्वदा शिवासि प्रिय ॥ रैथ्याचत्वरीं अति रमणीय ॥ प्रासादगोपुरीं आश्चर्यमय ॥ अमरालयचि जैसें कीं ॥ ४ ॥ चतुर्वेदी सकळ ब्राह्मण ॥ तेथें सर्वदा वसती जाण ॥ क्षत्रिय वैश्य शूद्र संपूर्ण ॥ स्वाचारसंपन्न वर्तती ॥ ५ ॥ तैसेचि अन्यजातीचे लोक ॥ सत्यवादी असती सकळिक ॥ श्रौतस्मार्तादि कर्में अनेक ॥ यथाधिकार आचरती ॥ ६ ॥ ठायीं ठायीं श्रुतिघोषें ॥ सदा चालत असे विशेष ॥ शास्त्रचर्चाहि आसमास ॥ रात्रंदिवस होतसे ॥ ७ ॥ प्रतिमंदिरांतूनि सतत ॥ भगवद्भजनें कीर्तनें होत ॥ पुराणश्रवणाची तों मात ॥ काय तेथ वर्णावी ॥ ८ ॥ सर्व जातींचे सर्व लोक ॥ स्वस्वधर्मीचि वर्तती देख ॥ अधर्माचा लेशही एक ॥ कोणही तेथें नाचरती ॥९॥ ऐसी ती शिवपुरी उत्तम ॥ तेथें सदाचारसंपन्न परम ॥ ऐसा कोणी विप्रदास नाम ॥ शूद्र एक राहतसे ॥ १० ॥ तो सदा स्वनामानुसार ॥ विप्रदास्यत्व करी साचार ॥ आणि तयाची स्त्री शुभ सुंदर ॥ विप्रदासी नाम तियेचें ॥ ११ ॥ ती साध्वी पतिपरायण ॥ भ्रताराज्ञाच मानी प्रमाण ॥ ऐसीं तीं उभयतां अनुदिन ॥ धर्मेंकरून वर्तती ॥ १२ ॥ तों काळँपर्ययें कदाचित ॥ अधिकमास जाहला प्राप्त ॥ जो कां पुरुषोत्तमासि सतत ॥ प्रिय अत्यंत असे पैं ॥ १३ ॥ तें त्या शूद्रें स्वस्त्रीसहित ॥ विप्राज्ञा घेऊनि यथोक्त ॥ अधिकमासीं नित्यस्नानार्थ ॥ आणि दानार्थ आरंभिलें ॥ १४ ॥ गोकर्णगिरीचा पायथा चांग ॥ नाना धातु विचित्र सुंदर ॥ तेथें सारणेश्वरनामें अभंग ॥ लिंगरूप शिव आहे ॥१५॥ तो स्मरणमात्रें दुःख पाप दैन्यांसी ॥ सारूनि तारितो संसारियांसी ॥ म्हणोनि सारणेश्वर ऐसी ॥ संज्ञा तयासी झाली असे ॥१६॥ त्या सारणेश्वरास-

१ मारवाड देशांत. २ लहान गल्ल्या व राजमार्ग आणि पटांगणें यांनीं. ३ राजवाडे, देवालयें, पुरद्वारें इत्यादिकांनीं. ४ अग्निहोत्र, स्मार्ताग्नि इत्यादि. ५ वेदघोष. ६ पुष्कळ ७ कालगतीनें.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

कोणी न दिसे गा भाग्यवंता ॥ दुःखें भोगित फिरतां फिरतां ॥ फारचि आतां भागलों ॥ ४९ ॥ तरी बा सत्वर कृपा करी ॥ ऐसी प्रेतांची ऐकूनि वैखरी ॥ विप्रदासाच्या विशुद्ध अंतरीं ॥ कृपालहरी उचंबळल्या ॥ ५० ॥ मग तयें प्रेतमुक्तीविषयीं ॥ ऐसा उपाय योजिला पाहीं ॥ स्वयें अधिकमासाठायीं ॥ नित्यस्नान केलें होतें जें ॥ ५१ ॥ त्यांतून स्नानसप्तकाचें फळ ॥ सर्व प्रेतांसि दिधलें सोज्वळ ॥ तेणें योगें ते प्रेत सकळ ॥ झाले तत्काळ दिव्यरूपी ॥ ५२ ॥ सकळहि पापें लोपलीं ॥ तों तेथें दिव्य विमानें पातलीं ॥ मग त्यांमाजीं ती प्रेतमंडळी ॥ बैसती झाली आनंदें ॥ ५३ ॥ आणि ते त्या साधु विप्रदासास ॥ नमीत स्तवीत गेले स्वर्गास ॥ एवं त्या सप्तशत प्रेतांस ॥ स्वर्गलोकवास लाभला ॥ ५४ ॥ अधिमासींचें नित्यस्नान ॥ तयाचा महिमा वर्णील कोण ॥ स्नानाच्याच पुण्यें जाण ॥ सप्तशत प्रेत उद्धरले ॥ ५५ ॥ येथींच्या एक स्नानाचाही ॥ अत्यद्भुतचि महिमा राही ॥ एतद्विषयीं तुज ये समयीं ॥ पूर्वेतिहास सांगतों ॥ ५६ ॥ सौराष्ट्रदेशामाझारीं ॥ प्रभास नामक पुण्यनगरीं ॥ सोमशर्मा हें नामधारी ॥ सदाचारी विप्र वसे ॥ ५७ ॥ तो सकळगुणसंपन्न ॥ वेदशास्त्रपारंगत पूर्ण ॥ वाजपेयादि महायज्ञ ॥ केले असती तेणें बहु ॥ ५८ ॥ अनेकविध उत्तम दानें ॥ दीधलीं असतीं द्विजांकारणें ॥ वापी कूपादि पूर्तें तयानें ॥ ग्रामोग्रामीं बांधिलीं ॥ ५९ ॥ कार्तिकस्नानें माघस्नानें ॥ प्रतिवर्षी सारिलीं विधीनें ॥ अधिकमासही बहु प्रीतीनें ॥ स्नानादि व्रतीं पाळिले ॥ ६० ॥ तीर्थयात्रा आटोपिल्या बहुत ॥ व्रतेंहि केलीं असंख्यात ॥ ऐसा तो सद्धर्मे वर्ते सतत ॥ तों एक अद्भुत प्रवर्तलें ॥ ६१ ॥ कोणे एके दिवशीं प्रभातीं ॥ तो सोमशर्मा विप्र सुमती ॥ सरस्वतीसिंधुसंगमाप्रती ॥ स्नानार्थ त्वरित चालला ॥ ६२ ॥ तों मार्गामाजीं तयास ॥ अवचित भेटला एक राक्षस ॥ जयाच्या पाहूनि स्वरूपास ॥ देवही त्रास पावती ॥ ६३ ॥ पर्वताकार देह मोठा ॥ पिंगटवर्ण ऊर्ध्वजटा ॥ अत्यंत वक्र भ्रुकुटी विकटा[1] ॥ कपाळीं पट्टा शेंदुराचा ॥ ६४ ॥ अतिपसरट मुख थोर ॥ करा[2]ल जिव्हा लोंबे बाहेर ॥ उभय ओंठ अत्यंत घोर ॥ दाढा वक्रनांगर जैसे ॥ ६५ ॥ उभय नेत्र



१ भयानक, अद्भुत. २ विक्राळ.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

अति आरक्त ॥ जैसे खदिरांगार प्रदीप्त ॥ गिरिगंव्हरें खोल अत्यंत ॥ तैशा दिसत नाकपुड्या ॥६६॥ विकृताकार महा हनुवटी ॥ उंष्ट्रवत् ग्रीवा लांब मोठी ॥ वृक्षस्कंधापरि बाहुवटी ॥ तैशीच कटी मृदंगासम ॥ ६७ ॥ पाद तरी तालवृक्षाकार ॥ भयानक लांब उदर ॥ रात्रंदिवस क्षुधातुर ॥ दंत करकर वाजवी ॥ ६८ ॥ सर्वत्र निर्भय शूर अत्यंत ॥ हाहाकारें ओरडत ॥ सकळ जीवांचा करी घात ॥ नरां सतत भक्षी पैं ॥ ६९ ॥ ऐशा त्या राक्षसातें पाहुनी ॥ सोमशर्मा दचकला मनीं ॥ परी नृसिंहातें स्मरूनि तत्क्षणीं ॥ नांवेक उभा राहिलासे ॥ ७० ॥ तंव तो राक्षस ओरडत ॥ विप्रासि धरूं धांवला त्वरित ॥ परी स्वसामर्थ्य न चले तेथ ॥ म्हणोनि विस्मित जाहला ॥ ७१ ॥ आणि तपस्तेजें जाज्वल्यमान ॥ ऐसें विप्राचें रूप पाहून ॥ राक्षसाच्या अंतरीं तत्क्षण ॥ किंचिद्विवेक उद्भवला ॥ ७२ ॥ तैशीच लोपली दुर्मती ॥ मग तो राक्षस सोमशर्म्याप्रती ॥ दंडवत करूनियां प्रणती ॥ जोडिल्या हातीं विनवी पैं ॥ ७३ ॥ अहो स्वामी साधूपदेशेंसीं ॥ उत्तम योग साधला ज्यासी ॥ ते त्या योगें इतर जनांसी ॥ दुराधर्ष होत जैसे ॥ ७४ ॥ तैसे तपस्तेजें करून ॥ अग्निवत् तुम्ही जाज्वल्यमान ॥ म्हणोन मजसम दुष्टालागुन ॥ सर्वथा असा अधृष्य ॥ ७५ ॥ मी तों बहु पापांचा पर्वत ॥ राक्षस जाती दुष्ट अत्यंत ॥ परी मद्भाग्यें आज तुम्ही येथ ॥ साधु प्राप्त जाहलेती ॥ ७६ ॥ म्हणोनि मज राक्षसत्वींही ॥ हें दर्शन झालें येसमयीं ॥ तरी आतां दयाळीं लवलाहीं ॥ दुर्गतींतून उद्धरावें ॥ ७७ ॥ तुम्ही सत्पुरुष दयासिंधू ॥ दीनजनांचे केवळ बंधू ॥ मी तों दीन पापी असाधू ॥ कृपा अगाध कीजिये ॥ ७८ ॥ ऐसें राक्षसाचें वचन ॥ ऐकूनि तो सोमशर्मा ब्राह्मण ॥ स्वांतरीं धर्मतत्वाचा पूर्ण ॥ विचार करूं लागला ॥ ७९ ॥ जरी मी आतां ह्या निशाचरा ॥ निर्भर्त्सीन नानातरां ॥ तरी हा येथूनि माघारां ॥ जाईल खरा अन्यत्र ॥ ८० ॥ परी हा दुष्ट सर्वत्र फिरत ॥ आजवरी आला हिंसा करित ॥ येचरीतीं पुढेंहि सतत ॥ करील घात जीवांचा ॥ ८१ ॥ आणि

१ खैराचे निखारे. २ पर्वतांच्या गुहा. ३ चमत्कारिक आकृती. ४ उंटाप्रमाणें. ५ मान. ६ वृक्षांच्या खांद्याप्रमाणें. ७ उगाच. ८ नमस्कार. ९ साधूंच्या उपदेशानें. १० पराभव करण्यास कठीण. ११ दयेचे समुद्र.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

आज यातें मुक्त करितां ॥ हिंसानिवृत्ति होऊनि सर्वथा ॥ दयारूप[1] बहूपकृति कर्ता ॥ धर्महि माझा होईल ॥ ॥ ८२ ॥ तरी आपण हेंचि करावें ॥ राक्षसासि आतां उद्धरावें ॥ ऐसें विप्रें निश्चयूनि बरवें ॥ हस्तीं उदक घेतलें ॥ ८३ ॥ आणि स्वकृत जें अधिकमास स्नान ॥ त्यांतूनि एक स्नानाचें पुण्य ॥ यथोक्त संकल्प करून ॥ राक्षसालागून अर्पिलें ॥ ८४ ॥ तेणें पुण्यें तो निशाचर ॥ तत्काळ झाला दिव्यरूपधर ॥ तंव देवगणीं त्या विप्रावर ॥ पुष्पें सुंदर वर्षिलीं ॥ ८५ ॥ आणि मांडिलें तयाचें स्तवन ॥ म्हणती भलाभलारे तूं ब्राह्मण ॥ तुवां राक्षसातें उद्धरून ॥ जीव संपूर्ण वांचविले ॥ ८६ ॥ सर्वांवर तुवां उपकार केला ॥ तूं धन्य धन्य धन्य भला ॥ पुनःपुन्हा इत्यादि बोला ॥ बोलूनि स्तविला तो विप्र ॥ ८७ ॥ मग अतिसुंदर जें विमान ॥ नवरत्न-खचित महान ॥ सुवर्णकिंकिणीयुक्त असून ॥ प्रकाशमान सूर्यापरी ॥ ८८ ॥ ज्यामाजीं सर्व भोग असती ॥ किन्नरगंधर्वगण गाती ॥ अप्सरागण नृत्य करिती ॥ पक्षी बोलती अति मधुर ॥ ८९ ॥ ऐशा सुंदर विमानीं तत्क्षण ॥ त्या दिव्यरूपियासि बैसवून ॥ विमानासह देवगण ॥ स्वर्गभुवना चालले ॥ ९० ॥ तैं तो दिव्यरूप-धारी पुरुष ॥ स्तुतिपूर्वक वंदूनि विप्रास ॥ देवगणांसह स्वर्गास ॥ आनंदें जाता जाहला ॥ ९१ ॥ इंदिरे ऐसें अधिकमासाठायीं ॥ स्नानाचें फळ असे पाहीं ॥ यास्तव हेंचि नारी नरांहीं ॥ नानाउपायीं आचरावें ॥ ९२ ॥ जरी मानवजन्म पावून ॥ तेथें न करिती एकहि स्नान ॥ तरी तत्करींचें अमृत संपूर्ण ॥ गेलें गळून जाणिजे ॥ ९३ ॥ ऐसी स्नानमहिमाकथा ॥ श्रीविष्णूनें कथिली तत्वतां ॥ आतां एकांतरोपवासव्रता ॥ पुढील प्रसंगीं सांगिजेल ॥ ९४ ॥ इति श्रीअधिकमासमाहात्म्यसार ॥ बृहन्नारदीयपद्माधार ॥ सज्जन श्रोते ऐकोत चतुर ॥ द्वाविंशाध्याय गोड हा ॥ २२ ॥ ॥ इति द्वाविंशोऽध्यायः ॥ २२ ॥ ॥ ॥

१ दयारूप बहुत उपकार करणारा.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

॥ श्रीगणेशाय नमः ॥ इंदिरा म्हणे देवाधिदेवा ॥ मत्प्रियकरा प्रभो केशवा ॥ तुम्ही अधिमास स्नानाचा आघवा ॥ महिमा बरवा कथिलाती ॥ १ ॥ आतां देवा अधिकमासांत ॥ करितां एकांतरोपवासव्रत[1] ॥ काय फल होतें प्राप्त ॥ तें मज समस्त सांगिजे ॥ २ ॥ आणि हें व्रत कोणी केलें ॥ तयासि फळ काय मिळालें ॥ हेंही मजलागीं सगळें ॥ कृपें दयाळें सांगावें ॥ ३ ॥ ऐसें ऐकूनि वैकुंठनाथ ॥ म्हणे हे प्रिये अधिमासांत ॥ करितां एकांतरोपवासव्रत ॥ जें फल प्राप्त होतें पैं ॥ ४ ॥ तें देवालागीं दुर्मिळ ॥ ऐसें आहे अत्यंत सोज्वळ ॥ एतद्विषयीं तुज निर्मळ ॥ एक इतिहास सांगतों ॥ ५ ॥ विंध्यपर्वताचा एक भाग ॥ अमरकंटकनामें चांग ॥ जेथें सिद्धगण हर्षितान्तरंग[2] ॥ सदा अभंग वसताती ॥ ६ ॥ तेथें शिवाच्या हस्तापासुनी ॥ महासरिता उद्भवूनी ॥ नाना गिरींसी भेदीत जाऊनी ॥ समुद्रालागुनी मीनं[3]लीसे ॥ ७ ॥ तियेचें नाम नर्मदा ॥ सर्वत्रैलोक्यामाजीं प्रसिद्धा ॥ सिद्धचारणादि देवसुद्धां ॥ तियेतें सदा सेविती ॥ ८ ॥ जैसा साक्षात् श्रीशंकर ॥ सर्वजनांसि कल्याणकर ॥ तैसीच सर्वत्र निरंतर ॥ असे शुभकर सर्वां ती ॥ ९ ॥ तियेच्या स्मरणमात्रेंही ॥ सकळ पापें लोपती पाहीं ॥ महर्षि संघ नानाउपायीं ॥ सेविती सदाही तियेतें ॥ १० ॥ ऐसी ती महानदी पवित्र ॥ तियेचें तीर रम्य विचित्र ॥ जेथें तरुच्छायेचें होऊनि छत्र ॥ दिवसरात्र न समजे ॥ ११ ॥ हंस कारंडवादि विहंग[4] ॥ जेथें आनंदें वसती सुरंग ॥ आणि कमलादि पुष्पांची सुभंग[5] ॥ शोभा अभंग सर्वदा ॥ १२ ॥ ऐशा त्या नर्मदातीरीं ॥ भृगुकच्छनामें आहे नगरी ॥ जेथें मी शिव आणि गौरी ॥ सर्व देवांसह वसतसों ॥ १३ ॥ तये नगरीं भृगुकुलोत्पन्न ॥ ज्योतिर्वेत्ता[6] सदाचारसंपन्न ॥ सत्यवादी कुशलशर्माभिधान ॥ एक ब्राह्मण राहात ॥ १४ ॥ तत्पत्नि नामें कुशावती ॥ स्वरूपें सुंदर महासती ॥ अत्युत्तमधर्मैं तीं दंपती[7] ॥ वर्तत असतीं सर्वदा ॥ १५ ॥ तयांसि जाहली एक कन्या ॥ स्वरूप सुंदर सर्वमान्या ॥ केवळ साक्षात् श्रीचं[8] अन्या ॥ ऐसी धन्य त्रैलोक्यीं ॥ १६ ॥ तियेचें मेधावति अभिधान ॥ ती उपवर होतां तत्पितयान ॥ पद्मनाभ नामा द्विजनंदन ॥ वर उत्तम पाहिला ॥ १७ ॥ वेदशास्त्रसंपन्न तोही ॥

१ धारणा पारणाव्रत. २ हर्षित आहे अंतःकरण ज्यांचें असे. ३ मिळाली. ४ पक्षी. ५ सुंदर. ६ ज्योतिष जाणणारा. ७ नवराबायको. ८ लक्ष्मी.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

मान्यता विशेष सर्वांठायीं ॥ घटित पाहूनि ते समयीं ॥ तिथिनिश्चय पैं केला ॥ १८ ॥ सालंकृत कन्यादान ॥ करूनियां लाविलें लग्न ॥ चार दिवस यथाविधान ॥ सोहळा संपूर्ण जाहला ॥ १९ ॥ कांहीं दिन श्वशुरमंदिरीं ॥ राहिली असे ती सुंदरी ॥ अत्यंत प्रीती दोघांभीतरीं ॥ जडली जाण तात्काळ ॥ २० ॥ क्षण एक वियोगव्यथा ॥ सोसवेना त्या उभयतां ॥ तंव दैवयोगाची विचित्रता ॥ ऐसी घडोन आली कीं ॥ २१ ॥ एकदां तो ब्राह्मणसुत ॥ नर्मदेमाजीं जळक्रीडार्थ ॥ गेला असतां मगरें त्वरित ॥ ओढून नेला पाताळीं ॥ २२ ॥ विप्रसुत बुडाला म्हणोनी ॥ लोकांत हांक जाहली तत्क्षणीं ॥ समस्त जन आले धांवूनी ॥ जनकजननी धांवलीं ॥ २३ ॥ वक्षस्थळ ताडिती मातापिता ॥ आक्रोशत धांवली कांता ॥ श्वश्रूश्वशुर धांवूनि उभयतां ॥ हा हा म्हणून ओरडती ॥ २४ ॥ मृत्तिका घेऊनि स्ववदनीं ॥ घालीत ते ती कामिनी ॥ तियेच्या शोकें सर्व धरणी ॥ उलों पाहे साचार ॥ २५ ॥ म्हणे हा देवा जगन्नाथा ॥ कोठवरी भोगूं वैधव्यव्यथा ॥ कैसे प्राण ठेवूं आतां ॥ कोठें कांता गेलासी ॥ २६ ॥ बुडालें माझें सौभाग्यजहाज ॥ वोस पडली माझी सेज ॥ कोठें राजस गेले आज ॥ बोलूं गुज कोणासी ॥ २७ ॥ ऐसें वारंवार बोलून ॥ विलाप करी अति करुण ॥ मरणाहूनिहि अति कठिण ॥ दुःख जाहलें तियेसी ॥ २८ ॥ जीवनाविणें मासोळी ॥ तैसी रात्रंदिन तळमळी ॥ नानाउपायीं कदाकाळीं ॥ नये नव्हाळी सुखाची ॥ २९ ॥ पुढें ती कदाचित एकांतीं ॥ बैसूनियां विचारी चित्तीं ॥ आतां दुःखें दिवसराती ॥ तळमळोनि काय उपयोग ॥ ३० ॥ तरी संसारभ्रमणोद्भवदुःख ॥ जेणें निरसेल सकळिक ॥ ऐसें कांहीं तरी अलोलिक ॥ व्रत एक आचरावें ॥ ३१ ॥ ऐसा निश्चय करूनि मनें ॥ पित्यासी म्हणे ताता जयानें ॥ भवदुःख निरसेल निश्चयानें ॥ ऐसें कांहीं व्रत सांग ॥ ३२ ॥ ऐसें कन्येचें ऐकूनि भाषित ॥ तत्पिता म्हणे तियेप्रत ॥ बाळे एकांतरोपवासव्रत ॥ अधिकमासांत आचरावें ॥ ३३ ॥ तेणें सर्व पापांचें दहन ॥ सकळ दुःखांचें निवारण ॥ आणि घोर भवसागर तरण ॥ होतें जाण निश्चयें ॥ ३४ ॥ तयासम पुण्यफलदायक ॥ उत्तम व्रत नसे आणिक ॥ ऐसें पित्याचें ऐकुनि वाचिक ॥ मेधावती आनंदली ॥ ३५ ॥

१ नवीनपणा, वारंवार. २ जन्ममरणरूप भ्रमणापासून होणारें. ३ अनुपम.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

पुढें अधिकमास प्राप्त होतां ॥ ती कुशलशर्म्याची दुहिता ॥ एकांतरोपवासव्रता ॥ आरंभिती जाहली ॥ ३६ ॥ नित्य प्रभातीं उठोन ॥ नर्मदेमाजीं स्नान सारून ॥ पुरुषोत्तमासि पुजून ॥ विप्रांलागुन अर्चीतसे ॥ ३७ ॥ शयन करी भूमीठायीं ॥ एक दिन उपवासी राही ॥ एकांतरें हविष्यान्न खाई ॥ विप्रांसि भजे सर्वदा ॥ ३८ ॥ सुवर्णादि दानें बहुत ॥ नियमें देई ब्राह्मणाप्रत ॥ ऐसे रीतीं वर्ततां सतत ॥ अधिमास पूर्ण जाहला ॥ ३९ ॥ तेव्हां तियेनें उद्यापन ॥ यथाविधि सारिलें जाण ॥ इंदिरे एवं प्रकारें करून ॥ व्रत संपूर्ण संपादिलें ॥ ४० ॥ आणि पुढेंही प्रति अधिकमासांत ॥ त्याच रीतीं चालविलें व्रत ॥ ऐसें करितां तियेचे बहुत ॥ अधिकमास लोटले ॥ ४१ ॥ तंव ती विप्रकन्या[१] मेधावती ॥ कालपर्ययें[२] कृश होऊनि अति ॥ नर्मदाजीवनीं[३] बहु प्रीतीं ॥ प्राण सोडिती जाहली ॥ ४२ ॥ तों तेथें शिवदूतीं येउनी ॥ तियेसी नेलें कैलासभुवनीं ॥ तैं ती उमेची[४] प्रियसां-[५]जणी ॥ श्रेष्ठ जाहली सर्वांत ॥ ४३ ॥ आणि तेथें नाना भोग भोगून ॥ उमेच्या देहीं जाहली लीन ॥ पुढें लोक-सुखार्थ देवी होऊन ॥ काशींत येऊन राहिली ॥ ४४ ॥ तियेचें विशालाक्षी अभिधान ॥ ती स्मरण दर्शनादिकें करून ॥ सर्व जनांचे मनोरथ पूर्ण ॥ करिते जाण सर्वदा ॥ ४५ ॥ आणि आरोग्यता शरीराठायीं ॥ तैसाच अंतीं देते मोक्षही ॥ ऐसी ती मानवी असूनि पाहीं ॥ देवतामयी जाहली ॥ ४६ ॥ हा केवळ अधिकमासींच्या ॥ एकांतरोपवास व्रताचा ॥ प्रभाव असे पैं साचा ॥ ही मम वाचा सत्य जाण ॥ ४७ ॥ प्रिये सर्वांपेक्षां अधिक-मास ॥ पुरुषोत्तमासि प्रिय विशेष[६] ॥ त्यांत आचरितां नक्त व्रतास ॥ ऐसेंचि फळ लाभतें ॥ ४८ ॥ मेधावतीची सखी एक ॥ ब्राह्मणी होती कोमला नामक[७] ॥ तियेनें अधिमासीं पुण्यकारक ॥ नक्त[८] व्रत आचरिलें ॥ ४९ ॥ तेणें ती कैलासीं पावली ॥ गौरी शिवसंगें देवता झाली ॥ पुढें लोककल्याणार्थ भूतळीं ॥ येऊनि राहिली काशींत ॥ ५० ॥ तिचें मंगलागौरी अभिधान ॥ ती अद्यापि तेथें आहे जाण ॥ सदा लोकांचें कल्याण करून ॥ अंतीं मोक्षही देते पैं ॥ ५१ ॥ ऐसा अधिमासाचा प्रभाव थोर ॥ म्हणोनि सकळीं त्याभीतर ॥ नानाउपायीं

१ कन्या. २ कालगतीनें. ३ नर्मदानदीच्या उदकांत. ४ पार्वतीची. ५ सखी. ६ गुप्त. ७ नाम. ८ धारणा पारणाव्रताचा.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

निरंतर ॥ स्नानादि कर्मे आचरावीं ॥ ५२ ॥ अधिमासींचें पुण्य अद्भुत ॥ वर्णावया कोण समर्थ ॥ शिवविधि शेषादिकही तेथ ॥ होती तटस्थ सर्वही ॥५३॥ हे सिंधुतनये पद्मालये ॥ आतां फार काय सांगूं प्रिये ॥ अधिकमास सर्वार्तिहर आहे ॥ ऐसें निश्चयें जाण तूं ॥ ५४ ॥ तें ऐकूनि क्षीरोददुहिता ॥ म्हणे हे प्रभो श्रीभगवंता ॥ तुम्ही एकांतरोपवासकथा ॥ मज तत्वतां कथिलीत ॥५५॥ आतां अधिकमासीं केवळ ॥ विप्रसेवेचें काय फळ ॥ आणि तें कवणा लाधलें निर्मळ ॥ हें मज सकळ सांगिजे ॥ ५६ ॥ ऐसें श्रीचें वचन ऐकूनि ॥ श्रीहरि म्हणे गे सिंधुनंदिनी ॥ विप्रसेवाफळ तुजलागुनी ॥ सांगतों ऐकें सादर ॥ ५७ ॥ भरतखंडीं विराट नामक ॥ पुण्यात्मा देश आहे एक ॥ जेथें पुण्यवंत आणि धनिक ॥ ऐसे लोक सर्व असती ॥५८॥ ठायीं ठायीं अनेक तीर्थें ॥ पुण्यकारक असती जेथें ॥ आणि वापी कूपादि नाना पूर्तें ॥ शोभिवंतें ज्यामाजीं ॥ ५९ ॥ कोणेक राजाच्या पुण्येंकरूनी ॥ भगवंतें प्रसन्न होऊनी ॥ तयासी वर दीधला म्हणोनी ॥ कदा दुर्भिक्ष नसे जेथें ॥ ६० ॥ ऐशा त्या विराटदेशीं सुरेख ॥ जो सह्याद्रि पर्वतनायक ॥ तत्सन्निध महापुर नामक ॥ नगर एक आहे पैं ॥ ६१ ॥ तें महापुण्यकारक शुभ ॥ देवांसही अत्यंत दुर्लभ ॥ जेथें कलींतही धर्म सुप्रभ ॥ चतुष्पादचि राहील ॥ ६२ ॥ आणि जेथें परशुरामजननी ॥ रेणुका असे कामदायिनी ॥ तैसेचि देव देवर्षि मुनी ॥ आणि शूळपाणी वसे जेथें ॥ ६३ ॥ तैसेच सर्वदा चारी वर्ण ॥ स्वधर्मे जेथें वर्तती जाण ॥ ऐसें महापुराभिधान ॥ नगर आहे योग्य जें ॥ ६४ ॥ तेथें पूर्वीं धनदास नामक ॥ राहात होता महाशूद्र एक ॥ तो सर्वभावें सर्वदा देख ॥ विप्रसेवा करीतसे ॥ ६५ ॥ प्रिये यद्यपि तो होता धनिक ॥ आणि तद्दासहि होते अनेक ॥ तरी गर्व टाकुनि सकळिक ॥ स्वांगेंच करी विप्रसेवा ॥ ६६ ॥ तयांचे पाद प्रक्षाळणें ॥ तयांचीं अंगणें सारविणें ॥ तद्गृहीं सडासंमार्जन करणें ॥ अंगणीं काढणें स्वस्तिकादि ॥ ६७ ॥ तैशींच धुवावीं तद्वसनें ॥ क्रयं विक्रय करूनि देणें ॥ अभ्यंगपूर्वक स्नान



---

१ शंकर, ब्रह्मदेव व शेष इत्यादि. २ समुद्रकन्ये. ३ पद्मांत राहणारे. ४ सर्व पीडा निवारण करणारा. ५ क्षीरसागराची कन्या. ६ परशुरामाची माता. ७ इच्छा पूर्ण करणारी. ८ शंकर. ९ विकणें.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

घालणें ॥ आणि रगडणें पाय त्यांचे ॥ ६८ ॥ इत्यादि विप्रकार्यें सकळ ॥ स्वांगेंचि करी सर्वकाळ ॥ आणि तत्पत्नीची सेवा निर्मळ ॥ स्वपत्नीहस्तें करवीतसे ॥ ६९ ॥ तयाची भार्या प्रतिव्रता ॥ एकस्वभाव तीं उभयतां ॥ नुलंघी कधीं पतिवचनार्था ॥ धर्मपंथें वर्ततसे ॥ ७० ॥ तीहि आपुल्या अंगें सतत ॥ विप्र-स्त्रियांची सेवा करित ॥ जें जें मागती प्रिय वस्त ॥ तें तें पुरवी तयांसी ॥ ७१ ॥ ऐसीं तीं उभयतां दंपती ॥ विप्रकार्जीं धन वेंचिती ॥ परी वाचें न उच्चारिती ॥ सदा प्रीती विप्रांवरी ॥ ७२ ॥ कठिण काळ पडतांही ॥ चित्तीं खेद न मानितीच कांहीं ॥ उल्हासयुक्त सर्वदाही ॥ गर्वहि नाहीं तिळभर ॥ ७३ ॥ इंदिरे फार सांगूं काय ॥ तो धनदास शूद्रवर्य ॥ साधावया विप्रकार्य ॥ स्वधनव्ययही करीतसे ॥ ७४ ॥ ऐसी तेणें कापट्यरहित ॥ विप्रसेवा केली सतत ॥ आणि त्याहूनि विशेषें अधिमासांत ॥ स्नानादिपूर्वक संपादिलीं ॥ ७५ ॥ पुढें दैवयोगें तत् शरीर ॥ कुष्ठरोगें व्यापलें समग्र ॥ तेणें तो सर्व लोकांभीतर ॥ निंद्य फार जाहला ॥ ७६ ॥ रक्त पू गळे रात्रंदिवस ॥ तेणें चित्त झालें उदास ॥ म्हणे आचरतां स्वधर्मास ॥ काय हा विनाश ओढवला ॥ ७७ ॥ आतां विप्रसेवा कैंची मज ॥ शरीरीं क्षीणता आली सहज ॥ लोकांमाजीं जाहली लाज ॥ आतां काय वांचूनियां ॥ ७८ ॥ नेणवे पूर्वकर्माचा ठेवा ॥ आतां मरणचि देगा देवा ॥ पुढें वांचूनि ह्या निंद्य जीवा ॥ सुख कैंचें होणार ॥ ७९ ॥ विप्रसेवा न घडे हातून ॥ म्हणूनि तळमळे रात्रंदिन ॥ सन्निध असोनि अपार धन ॥ आतां काय कीजिये ॥ ८० ॥ ऐसा विचार करित चित्तीं ॥ आणि तयाची पत्नी मानवती ॥ तियेकरितांहि दिवसरातीं ॥ चिंता बहुत करितसे ॥ ८१ ॥ पुढें कालांतरें कदा-चित ॥ एकें सिद्धें येऊनि त्याप्रत ॥ कथिलें कीं तूं स्वस्त्रीसहित ॥ उदयीक मृत्यु पावशील ॥ ८२ ॥ आणि विप्रसेवाप्रभावेंकरून ॥ आपुल्या स्त्रीसहवर्तमान ॥ सुंदर विमानीं आरूढोन ॥ स्वर्गीं जाशील निश्चयें ॥ ८३ ॥ ती सिद्धाची वाणी ऐकुनी ॥ धनदास हर्षला मनीं ॥ मग आपुल्या द्रव्याचे तत्क्षणीं ॥ तीन भाग केले तयानें ॥ ८४ ॥ एक भाग ओपिला पुत्रास ॥ द्वितीय दिला कन्याद्वयास ॥ तृतीयभाग



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तो विप्रांस ॥ तीर्थी जाऊनि अर्पिला ॥ ८५ ॥ ऐसें आपुलें कोटि धन ॥ तयानें टाकिलें वांटून ॥ द्वितीयदिनीं स्त्रीसहवर्तमान ॥ स्वर्गभुवना पावला ॥ ८६ ॥ इंदिरे एवंप्रकारें सर्व ॥ द्विजसेवेचा असे प्रभाव ॥ इहपरलोकीं सुख अपूर्व ॥ होतें सदैव शूद्रांसिही ॥ ८७ ॥ आणि विशेषें अधिमासांत ॥ ऐसें विप्रांतें सेवितात ॥ ते होऊनि पापनिर्मुक्त ॥ मोक्षाप्रत पावती ॥ ८८ ॥ तयांसि नाहीं पुनरावृत्ती ॥ हें इंदिरे जाण निश्चिती ॥ ही पुण्यकथा पठती ऐकती ॥ तेहि उद्धरता निश्चयें ॥ ८९ ॥ इति श्रीअधिकमासमाहात्म्य-सार ॥ बृहन्नारदीयपद्माधार ॥ सज्जन श्रोते ऐकोत चतुर ॥ त्रयोविंशतितमोध्याय गोड हा ॥ २३ ॥ ॥

॥ इति त्रयोविंशातितमोऽध्यायः ॥ २३ ॥



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

॥ श्रीगणेशायनमः ॥ ॥ लक्ष्मी म्हणे हो मत्प्रियकरा ॥ देवाधिदेवा दामोदरा ॥ तुम्ही विप्रसेवेचा सारा ॥ महिमा बरा कथिलात ॥ १ ॥ आतां अधिकमासीं निर्मळ ॥ कोणत्या दानाचें काय फळ ॥ तें साद्यंत विवरूनि सकळ ॥ मज दयाळा सांगावें ॥ २ ॥ तें ऐकूनि वैकुंठनाथ ॥ म्हणे गे प्रिये लोकानुग्रहार्थ[1] ॥ तव प्रश्नाचें उत्तर समस्त ॥ सांगतों ऐकें साक्षेपें ॥ ३ ॥ जे कोणी अधिकमासांत ॥ उत्तम सुपात्र विप्राप्रत ॥ यथाशक्ति हेमदान[2] देतात ॥ त्यांचे मनोरथ सर्व पुरती ॥ ४ ॥ सुपात्र विप्रा देतां सुवर्ण ॥ देवतांसह तोषतो अन्न ॥ जन्मवरी दारिद्र्य दारुण ॥ न बाधेच कदापि ॥ ५ ॥ अधिकमासीं देतां गोप्रदान ॥ सकळ दुरितें[3] निरसून ॥ गोलोमसंख्या कल्प जाण ॥ वास होय ब्रह्मलोकीं ॥ ६ ॥ सर्व जनीं अधिकमासांत ॥ हेमादि दान द्यावें सतत ॥ तेणें योगें ब्रह्मलोक प्राप्त ॥ होईल जाण निश्चयें ॥७॥ जो भक्तिभावें अणुप्रमाण ॥ द्विजासि देतो रजत[4] दान ॥ तयाचे पितर संतोषून ॥ मनोरथ पूर्ण करितात ॥ ८ ॥ ताम्र अथवा ताम्रपात्र ॥ सुपात्रासि देतो पवित्र ॥ तयासि रुद्राणीसह[5] त्रिनेत्र ॥ सर्वद[6] सर्वत्र होतो पैं ॥ ९ ॥ पद्मरागादि[7] रत्नदान देतां ॥ महा भूपतित्व येतें हाता ॥ मौक्तिकाचें दान करितां ॥ भुक्तिमुक्ति लाभती ॥ १० ॥ कंबलदानें पाप लोपतें ॥ वस्त्रें चंद्रसालोक्य लाभतें ॥ और्णिकदान[8] देतां विप्रातें ॥ भय निरसतें सर्वही ॥ ११ ॥ ज्या कालीं जें महोपकारक[9] ॥ त्याकालीं तें देतां वस्त्रादिक ॥ स्वर्गादिक नाना उत्तम लोक ॥ मिळतात देख निश्चयें ॥ १२ ॥ धान्यदान हें महादान ॥ मम प्रीत्यर्थ अनुदिन ॥ श्रद्धें द्यावें विप्रांलागुन ॥ सर्वार्थ साधन होय त्यानें ॥ १३ ॥ अन्नार्थियातें अन्न ओपितां ॥ जलार्थियातें जलदान देतां ॥ अक्षय पुण्य येतें हाता ॥ संशय सर्वथा नसेचि ॥ १४ ॥ जे श्रद्धापूर्वक विप्राप्रत ॥ उपानह[10] दान अर्पितात ॥ ते यमयातनेविण त्वरित ॥ स्वर्गीं जातात सुखानें ॥ १५ ॥ घृत किंवा घृतपात्र देतां ॥ अक्षय सूर्यलोक ये हाता ॥ तिलपात्राचें दान करितां ॥ लाभतो सर्वथा रुद्रलोक ॥ १६ ॥ वर्षभर पुरेल इतुकें धान्य ॥ वस्त्राभरणीं संयुक्त



१ लोकांवर कृपा करण्याकरितां. २ सुवर्णदान. ३ पापें. ४ रुपें. ५ पार्वतीसहित. ६ सर्व देणारा. ७ हिरे, माणकें, पाच इत्यादि रत्नें. ८ लोंकरीच्या वस्त्राचें दान. ९ मोठा उपकार करणारें. १० चर्मी जोड्याचें दान.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

आन ॥ घृतादिक रसांसहवर्तमान ॥ अत्युत्तम घेऊनियां ॥ १७ ॥ आदीं शिवासह मजं अर्चुनी ॥ मग सदारद्विजांसि पूजुनी ॥ तयां अधिकमासीं द्वादशीदिनीं ॥ विशेषें दान देती जे ॥ १८ ॥ ते मानव कृतकृत्य ॥ होती हें प्रिये जाण सत्य ॥ त्या धान्य दानापरि पथ्यं ॥ नसेचि कृत्य संसारीं ॥ १९ ॥ सशक्त किंवा अशक्त जनानें ॥ स्वहितेच्छु असेल तयानें ॥ कैशाहि प्रयत्नें श्रद्धेनें ॥ घृतदान देणें द्विजासी ॥ २० ॥ घृतदानाहूनि श्रेष्ठ दान ॥ पृथ्वीमाजीं नाहींच जाण ॥ सप्त धान्यांचें करितां दान ॥ सप्तर्षि लोक लाभतो ॥ २१ ॥ गोमूत्ररंगीं कृष्ण श्वेत ॥ हे तीन जातींचे तिळ समस्त ॥ मज आणि सर्व देवांप्रत ॥ सदा अत्यंत आवडती ॥ २२ ॥ म्हणोनि प्रिये तिलदान ॥ भक्तिभावें करितां कीजे अनुदिन ॥ अधिकमासीं तों विशेषें जाण ॥ नित्य नियमानें करावें ॥ २३ ॥ ससुवर्ण तिलदान करितां ॥ अभीष्टसिद्धि होय सर्वथा ॥ अधिकमासीं नित्यदानापरता ॥ नियम नसे शुभकर ॥ २४ ॥ घृतएलादि पदार्थयुक्त ॥ शुद्धशर्करापाकें निर्मित ॥ बालाप्तजनां आनंद देत ॥ ऐसे लाडु करूनियां ॥ २५ ॥ ते अधिकमासीं भगवत्प्रीत्यर्थ ॥ स्नान करोनि विप्रासि देत ॥ तयांसि साक्षात् गोलोकनाथ ॥ प्रसन्न होतो निश्चयें ॥ २६ ॥ आणि नानावस्तुनिर्मित मधुर ॥ घृतपक्व मोदक सुंदर ॥ भगवत्प्रीत्यर्थ अधिमासाभीतर ॥ विप्रालागीं अर्पितो जो ॥ २७ ॥ तयाचीं सर्व कार्यें जगतीं ॥ निर्विघ्नपणें सिद्धीस जाती ॥ तैसीच अंतीं मोक्षप्राप्ती ॥ होते जाण निश्चयें ॥ २८ ॥ इंदिरे फार सांगूं कायी ॥ दानाहूनि श्रेष्ठ कांहीं नाहीं ॥ आणि तें इतर कर्माहूनि पाहीं ॥ पृथ्वीठायीं सुसाध्य असे ॥ २९ ॥ म्हणोनि सर्वीं सर्वत्र जगतीं ॥ दानचि करावें जाण निश्चितीं ॥ दानें देवही वश होती ॥ मग नर तेथें कायसे ॥ ३० ॥ दानें सुकीर्ति होय सर्वत्र ॥ दानेंचि सुख इहं परत्रं ॥ दानें धन धान्य पुत्र पौत्र ॥ मिळती सुमित्र दानेंची ॥ ३१ ॥ दानें सकळ वांच्छा पुरती ॥ दानेंचि सर्व पापें लोपतीं ॥ दानें सकळ रोग निरसती ॥ चतुर्वर्गप्राप्ती दानेंच ॥ ३२ ॥ म्हणोनि प्रिये जगीं मानवें ॥ सर्वदांही दान

१ विष्णूस. २ सपत्नीक ब्राह्मणांस. ३ हितकारक. ४ मनोरथसिद्धि. ५ तूप इलायची इत्यादि पदार्थांनीं युक्त. ६ बाल व आप्त यांस आनंद देणारें. ७ पुरुषोत्तम भगवान्. ८ ह्या भूलोकीं. ९ स्वर्गादि लोकीं. १० धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चार पुरुषार्थ.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

करावें ॥ आणि विशेष तों अधिमासीं भावें ॥ नित्य दान द्यावें अवश्यचि ॥ ३३ ॥ कारण कीं मानवांप्रत ॥ अन्य कालाहून अधिकमासांत ॥ सर्वदा सर्वदानजनित ॥ फल बहुत लाभतें ॥ ३४ ॥ सकळ व्रतें सकळ दानें ॥ सर्व जप होम देवार्चनें ॥ आणि सर्व मास यांहूनि गुणें ॥ विशेष असे अधिकमास ॥ ३५ ॥ यांत स्नान व्रत दीपदान ॥ गोपूजन आणि विप्रार्चन ॥ इत्यादि कवण्याहि प्रकारें पूर्ण ॥ व्याजेंही व्रत करिती जे ॥ ३६ ॥ तयांचे सकळ पापराशी ॥ नाश पावती समूळेंसीं ॥ आणि यम तयांच्या दृष्टीसी ॥ न पडेचि जाण निश्चयें ॥ ३७ ॥ अधिकमासव्रतोत्पन्न ॥ जो दैदीप्यमान पुण्यकृशांन ॥ तेणें शतजन्मपापेंधनें सघन ॥ जळून भस्म होताती ॥ ३८ ॥ सर्वैश्वर्येच्छू मानवांस ॥ जैसा पुरुषोत्तम मास ॥ पावन असे पैं विशेष ॥ तैसें इतर नच कांहीं ॥ ३९ ॥ सहस्र अश्वमेध यज्ञ ॥ कीं वाजपेय शतप्रमाण ॥ जरी त्रैलोक्यामाजीं महान ॥ पावन आहेत सत्यचि ॥ ४० ॥ तरी त्या महायज्ञालागुन ॥ अधिकमासींचें जें एकदिन ॥ तयाच्या षोडशांशासमान ॥ योग्यता जाण नसेची ॥ ४१ ॥ गंगा गया कांची पुष्कर ॥ रेवा मही शिवा कुरुक्षेत्र ॥ यमुना चंद्रभागादि पवित्र ॥ असती सर्वत्र क्षेत्रतीर्थें ॥ ४२ ॥ परी तीं अधिमासा न सम ॥ तेथें लागती बहुत श्रम ॥ येथें अनायासें परम ॥ वैष्णवपद पाविजेतें ॥ ४३ ॥ अधिमासीं जे करिती स्नान ॥ तयीं जन्मफळ मिळविलें पूर्ण ॥ यापरि सर्वगुणसंपन्न ॥ नसे आन कांहींच ॥ ४४ ॥ येथें धरून उपोषणव्रत ॥ पुरुषोत्तमाप्रति पूजित ॥ ते होऊनि पापनिर्मुक्त ॥ वैकुंठीं सतत वसताती ॥ ४५ ॥ अधिकमास व्रतासमान ॥ त्रिजगीं नाहीं कांहीं पावन ॥ ज्ञानाज्ञानें आचरितां पूर्ण ॥ चतुर्वर्गफळ लाभतें ॥ ४६ ॥ जोंवरि नाहीं अधिकमास प्राप्ती ॥ तोंवरि मेदिनी पापें गर्जती ॥ यमयातनाही तैसेच रीती ॥ तोंवरी ख्याती मिरवीतसे ॥ ४७ ॥ सुभूमीस पेरतां बीज ॥ जैसें असंख्य होय सहज ॥ किंवा अमृतवल्ली सतेज ॥ असंख्यांकुरीं विस्तरे ॥ ४८ ॥ कीं लावितां दुर्वांकुर एक ॥ वेगें तयाचे होती अनेक ॥ तैसें

---

१ सर्व दानांपासून उद्भवलेलें. २ कपटानें ( निमित्तांतरानें ). ३ पुण्यरूप अग्नि. ४ शतजन्मींचीं पापरूपी काष्ठें. ५ मोठीं. ६ अन्य. ७ गुळवेल.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

अधिकमासींचें अलोलिक[1] ॥ पुण्य सकळिक वाढतें ॥ ४९ ॥ म्हणोनि सकळीं सर्वभावें ॥ अधिकमासव्रत आचरावें ॥ ऐसें सांगतां श्रीमाधवें ॥ लक्ष्मी तयातें विनवित ॥ ५० ॥ अहो देवा अधिकमासव्रता ॥ यथाशक्ति भावें आचरितां ॥ कैसें काय फळ ये हातां ॥ तें मज तत्वतां सांगिजे ॥ ५१ ॥ तें ऐकूनि चक्रपाणी ॥ लक्ष्मीसि म्हणे हे सिंधुनंदिनी ॥ एतदर्थ तुजलागुनी ॥ पूर्वेतिहास सांगतों ॥ ५२ ॥ पूर्वी अरुंधती आणि गिरिसुता[2] ॥ यांचा संवाद चालला असतां ॥ गिरिजेलागीं[3] वसिष्ठकांता ॥ जोडूनि हस्तां विनवीत ॥ ५३ ॥ म्हणे उमे सर्व मासांतील ॥ व्रतें तुवां कथिलीं सकळ ॥ आतां अधिकमासांत निर्मळ ॥ काय करावें सांगिजे ॥ ५४ ॥ ऐसें ऐकूनियां पार्वती ॥ म्हणे गे साध्वी अरुंधती ॥ अधिमासव्रताचें तुजप्रती ॥ वृत्त सांगत्यें ऐक पां ॥ ५५ ॥ एकदां मी पतिसहित ॥ बैसलें असतां आनंदांत ॥ मन्माता मेना येऊनी मजप्रत ॥ स्नेहें बोलूं लागली ॥ ५६ ॥ अगे बाळे तूं मजपासुनी ॥ उत्पन्न झालीस असोनी ॥ स्वकीयप्रभावें त्रिभुवनीं ॥ विख्यात झाली आहेस ॥ ५७ ॥ आणि तुझ्या योगें हें चराचर ॥ विख्यात झालें साचार ॥ परी मत्प्रीति असोनि तुजवर ॥ मज तिळमात्र लाभ नाहीं ॥ ५८ ॥ तूं सर्वप्रसिद्ध त्रिजगतीं ॥ माझी तों गृहांतचि ख्याती ॥ तुझें नाम सर्वजन गाती ॥ माझें न जाणती कोणीच ॥ ५९ ॥ जेथें कोठेंहि तूं राहसी ॥ तेथें ब्रह्मादि स्तविती तुजसी ॥ मी पावलें महास्थानासी ॥ तरी कोणीहि मजशीं बोलेना ॥ ६० ॥ मास पक्ष पर्वें आणि दिन ॥ तव व्रतीं व्यापिले संपूर्ण ॥ सर्वकाळहि सुव्रती जन ॥ तव पूजन करिताती ॥ ६१ ॥ परी मम मस्तकीं कोणीही ॥ कदा न घालिती पुष्प एकही ॥ तरी त्वन्माता मी जगाठायीं ॥ असोनि काय उपयोग ॥ ६२ ॥ वर्षांचे तीनशें साठ दिन ॥ तव व्रतीं गेले व्यापून ॥ मदर्थ नाहीं अर्धघटी प्रमाण ॥ काय हें मोठें मद्भाग्य ॥ ६३ ॥ पार्वती म्हणे गे अरुंधती ॥ ऐशी मातेची ऐकूनि भारती ॥ मी किंचित हांसोनि तिजप्रती ॥ बोलिल्यें वचन ऐक तें ॥ ६४ ॥ अगे माते मेनके मजसी ॥ ऐसें लावून कां बोलसी ॥ यद्यपि सकळ बारा मासीं ॥ मज अहर्निशीं पूजितात ॥ ६५ ॥ तरी

१ अनुपम. २ पार्वती. ३ पार्वतीप्रत.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

धार्मिक ऐशा अधिकमासांत ॥ मज कोणी नाहीं पूजित ॥ आणि अन्य सर्व क्रियाहि तेथ ॥ टाकिजेतात सकळिकीं ॥ ६६ ॥ यास्तव माते मी अधिमासीं ॥ व्रत करूनि पूजीन तुजसीं ॥ ऐसें बोलूनि पुढें त्या मासीं ॥ व्रतें तियेसी पूजिलें ॥ ६७ ॥ ऐसें शिवेचें वचन ऐकुनी ॥ अरुंधती म्हणे गे कल्याणी ॥ तें त्वत्कृत व्रत मजलागुनी ॥ कृपा करून सांग तूं ॥ ६८ ॥ अत्यंत धार्मिक अधिकमास ॥ तो न व्हावा कदापि वोस ॥ तरी तेथींचा नियम विशेष ॥ विवरूनि मज सांग तूं ॥ ६९ ॥ ऐसी अरुंधतीची वाणी ॥ ऐकूनियां श्रीभवानी ॥ म्हणे गे ऋषिपत्नि साजणी ॥ उत्तम विनवणी केलीस ॥ ७० ॥ तरी प्रतिअधिकमासीं जें व्रत ॥ करावें तें सांगत्ये यथार्थ ॥ मी मेनामातेच्या ख्यात्यर्थ[1] ॥ हा मास तियेतें अर्पियेला ॥ ७१ ॥ अधिमास शुक्लतृतीया दिनीं ॥ शुक्लवस्त्र परिधान करूनी ॥ गुरूच्या आज्ञेनें पूर्वाह्णीं ॥ व्रतनियम घेईजे ॥ ७२ ॥ मग सुशोभित शुद्धस्थानीं ॥ पवित्र पालाशकाष्ठासनीं ॥ धत्तूरफळें पांच ठेवुनी ॥ देवतास्थापन कीजिये ॥ ७३ ॥ नानालंकारीं मंडित अती ॥ पतिपुत्रांसह गजावरुती ॥ बैसली ऐसी मेनेची मूर्ती ॥ मेणानें सुंदर करूनियां ॥७४॥ ती पांच गौरींसहवर्तमान ॥ त्या पालाशकाष्ठासनीं ठेवून ॥ विप्रवचनें यथाविधान ॥ प्रतिष्ठापन करावें ॥ ७५ ॥ पाद्यार्घ्यगंधपुष्पादिक ॥ उपचार अर्पावे सकळिक ॥ निरांजन[2]दीप अनेक ॥ यथाशक्ति उजळावे ॥ ७६ ॥ वित्तशाठ्येंविण प्राप्त ॥ भावें अर्पावे नाना पदार्थ ॥ मासपर्यंत अखंडित ॥ एक दीप स्थापावा ॥ ७७ ॥ सखये अधिकमास होत पूर्ण ॥ तोंवरी कीजे ऐसें पूजन ॥ आणि एकभुक्त व्रताचरण ॥ प्रतिदिन जाण करावें ॥ ७८ ॥ परी नसेल देहीं शक्ती ॥ तरी तें कीजे आदी अंतीं ॥ तेणें शक्तिहीनासि निश्चिती ॥ संपूर्ण फल लाभतें ॥ ७९ ॥ ऐसे रीतीं व्रत आचरोन ॥ अंतीं करावें उद्यापन ॥ मेनेची सुवर्णमूर्ती करून ॥ यथाविधान पूजावी ॥ ८० ॥ मग पुरोहित ब्राह्मणासी ॥ पूजूनि सर्वोपचारेंसीं ॥ ती मेनेची स्वर्णमूर्ति त्यासी ॥ दान दीजिये विधीनें ॥ ८१ ॥ मग पाद्यार्घ्यादि उपचार ॥ नानावस्त्रें नानालंकार ॥ इत्यादिकीं बहु सादर ॥ पांच विप्रवर पूजावे



१ प्रसिद्धीकरितां. २ आरतीकरितां दीप.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

॥ ८२ ॥ आणि सदार[1] बहु विप्रांप्रती ॥ भोजन घालिजे यथाशक्ती ॥ ऐसें करितां व्रताची पूर्ती ॥ यथासांग होतसे ॥८३॥ अरुंधती गे या व्रताप्रती ॥ अधिकमासीं ज्या आचरती ॥ तयांसि सुख सौभाग्य संतती॥अखंड निश्चिती लाधते ॥ ८४ ॥ हें मेनाव्रत अतिपावन ॥ मज आनंदकारक पूर्ण ॥ म्हणून सर्वी साक्षेपें करून ॥ अधिकमासीं आचरावें ॥ ८५ ॥ ऐसें गौरी अरुंधतीप्रत ॥ सांगती झाली मेनाव्रत ॥ तेंचि इंदिरे म्यां समस्त ॥ तुजलागीं वर्णियेलें ॥ ८६ ॥ ऐसें बोलूनि घनसांवळा ॥ अन्य कथा सांगूं लागला ॥ ती परम पावन सोज्वळा ॥ पुढच्या प्रसंगीं वर्णिजेल ॥ ८७ ॥ इति श्रीअधिकमासमाहात्म्यसार ॥ बृहन्नारदीयपद्माधार ॥ सज्जन श्रोते ऐकोत चतुर ॥ चतुर्विंशतितमोध्याय गोड हा ॥ २४ ॥ ॥ इति चतुर्विंशतितमोऽध्यायः ॥ २४ ॥

१ स्त्रीसहित.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

# अध्याय २५वा.




CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

॥ श्रीगणेशाय नमः ॥ ॥ श्रीविष्णु म्हणे लक्ष्मीप्रत ॥ प्राणप्रिये सर्वजनीं सतत ॥ स्नानदानादिरूप यथोक्त ॥ मलमासव्रत आचरावें ॥ १ ॥ तेणें सर्व पापें निरसती ॥ इहलोकीं सर्व सुखें लाभती ॥ अंतीं होऊनि मोक्ष-गती ॥ फेरे चुकती जन्माचे ॥ २ ॥ याविषयीं तुज कथा एक ॥ सांगतों सर्व पापनाशक ॥ जी ऐकतां ब्रह्म-हाहि देख ॥ पुनरपि नये जन्मासी ॥ ३ ॥ इंदिरे पूर्वी पृथ्वीवरुती ॥ वीरबाहू नामें होता नृपती ॥ तो महादाता प्रसिद्ध जगतीं ॥ यजनशील सर्वदा ॥ ४ ॥ आणि रूपें सुंदर भाग्यवान ॥ सर्वजनप्रिय क्षमी महान ॥ अति बलिष्ठ बुद्धिमान ॥ ऐसा गुणवान असे पैं ॥ ५ ॥ तद्भार्या नामें यशोमती ॥ रूप सुंदर अभिमानवती ॥ धनयौवनें गर्विष्ठ अती ॥ ऐसी निरुती होती पां ॥ ६ ॥ आणि त्या रायाचा जो प्रधान ॥ तयाचें नाम होतें मंडन ॥ तो स्वामि-भक्त अति श्रीमान ॥ शूर महान असे पैं ॥ ७ ॥ प्रधानाची भार्या सती ॥ तियेचें नाम गुणवती ॥ ती क्षणिक मानूनि धनसंपत्ती ॥ दानधर्म करीतसे ॥ ८ ॥ ऐशाप्रकारें तीं चौघेंजणें ॥ मंडित असती स्वस्वगुणें ॥ परी राजा राणी तीं अभिमानें ॥ नाडलीं कैसीं तें एक ॥ ९ ॥ वीरबाहूनें राज्यभार ॥ सर्व टाकिला प्रधानावर ॥ स्वयें संसार मानूनि स्थिर ॥ भोग निरंतर भोगीतसे ॥ १० ॥ यशोमतीसहवर्तमान ॥ विहार करावे अनुदिन ॥ नाना आरामवनांतून ॥ भ्रमत असावें सर्वदा ॥ ११ ॥ नानावस्त्रें नानाभूषणें ॥ नानाभोजनें नानापानें ॥ नानायानें नानावाहनें ॥ नित्य नवीन करी पैं ॥ १२ ॥ तयाची राणी तीहि अनुदिन ॥ नानाभोगचि भोगी जाण ॥ दान व्रत कीं देवतार्चन ॥ स्वल्पहि कदा न करीच ॥ १३ ॥ ऐसा लोटतां काळ बहुत ॥ तयांसि दोन झाले सुत ॥ सुबाहु शतबाहु ऐशीं त्यांप्रत ॥ नामें ठेविलीं यथाविधी ॥ १४ ॥ पुढें ते अनुदिन वाढून ॥ झाले रूपयौवनसंपन्न ॥ तों कदाचित् कालपर्ययेंकरून ॥ अधिकमास पातला ॥ १५ ॥ तैं मंडनप्रधानाची कांता ॥ गुणवती महापतिव्रता ॥ नित्यवत् राणीच्या सेवेकरितां ॥ राजसदना पावली ॥ १६ ॥ तें राजमंदिर अति सुंदर ॥ केवळ जैसें महेंद्रमंदिर ॥ धनरत्नादिमंडित समग्र ॥ दासदासींनीं पूर्ण असे ॥ १७ ॥ तया पाहूनि

१ ब्रह्महत्या करणारा महापापीही. २ यज्ञ करणारा. ३ अपराधांची क्षमा करणारा. ४ सौंदर्यादिकांविषयीं अभिमानी. ५ इंद्राचें घर.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

 

ती गुणवती ॥ विचार करी स्वकीयचित्तीं ॥ पूर्व पुण्यें ही संपत्ती ॥ यशोमतीतें लाभली असे ॥ १८ ॥ परी इयेचा न करितां सद्व्यय ॥ सख्यांसह रात्रंदिन निर्भय ॥ केवळ भोग भोगूनि क्षय ॥ करित आहे अविचारें ॥ १९ ॥ एश्वर्यबळें राजा मस्त ॥ जैसा केवळ अजांत बस्तं ॥ त्याहूनिही राणी जास्त ॥ अज्ञान स्वस्त जाहलेंसे ॥ २० ॥ याणें ह्या उभयतांप्रत ॥ पुढें दुःखचि होईल प्राप्त ॥ तरी ह्या राणीसि सत्कर्मार्थ ॥ बोध किंचित करावा ॥ २१ ॥ ही होतां सत्कर्माचरणी ॥ राव आहे इयेच्या वचनीं ॥ म्हणोनि तोहि सत्कर्मी होउनी ॥ पुढील दुःखासि टाळील ॥ २२ ॥ ऐसा परोपकारार्थ ॥ विचार करूनि अतरांत ॥ त्या प्रधानपत्नीनें राणीप्रत ॥ निरखूनियां पाहिलें ॥ २३ ॥ तैं तियेच्या मुखचर्येवरून ॥ एधवां आहे ही सुप्रसन्न ॥ ऐसें अंतरीं जाणून ॥ तियेस बोलूं लागली ॥ २४ ॥ हे सखये यशोमती राणी ॥ तूं आमुची आहेस स्वामिनी ॥ तरी माझी एक विनवणी ॥ ऐकूनि घेईं प्रीतीनें ॥ २५ ॥ जो श्रीहरिचा प्रिय अत्यंत ॥ तो हा अधिकमास आला सांप्रत ॥ यांत सत्कर्म करितां किंचित ॥ फल अनंत लाभतें ॥ २६ ॥ यांत करितां स्नानादि नियम ॥ येथें सुख लाभूनि उत्तम ॥ अंतीं अक्षयीं वैकुंठधाम ॥ लाभतें जाण निश्चयें ॥ २७ ॥ ऐसा हा मासोत्तम मास ॥ सर्व पर्वांहुनिहि विशेष ॥ म्हणोनि तूं या मासव्रतास ॥ विधिपूर्वक आचरे ॥ २८ ॥ तेणें येथें तुझे समस्त ॥ पूर्ण होतील मनोरथ ॥ आणि अंतीं भ्रतारासहित ॥ वैकुंठीं जाशील निश्चयें ॥ २९ ॥ ऐसें ऐकोनियां ती राणी ॥ गुणवतीसि नाक मुरडुनि ॥ हंतस हंसत म्हणे गे साजणी ॥ ऐक मम वाणी साचार ॥ ३० ॥ पृथ्वीवरुती प्रजाजन ॥ जें तीर्थव्रतादि करिती पुण्य ॥ तयाचा भाग राजालागुन ॥ मिळतो जाण निश्चयें ॥ ३१ ॥ आणि मी रायाचें अर्धांग ॥ म्हणोनि मजहि तो लाभतो भाग ॥ मग व्रतादिकीं आपुलें अंग ॥ उगाच कां गे सुकवावें ॥ ३२ ॥ तपें किंवा ब्रह्मचर्येंसीं ॥ काय फळ येणार हातासी ॥ दैवें लाधल्या संपत्तीसी ॥ अहर्निशीं भोगावें ॥ ३३ ॥ सांडून इतर गोष्टीस ॥ कोठूनि

१ चांगल्या कर्माकडे व्यय. २ शेळ्यांत. ३ बोकड.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

काढिला अधिमास ॥ इत्यादि प्रकारें किंचित् सरोष ॥ साक्षेपं वचन बोलली ॥ ३४ ॥ तैं गुणवतीच्या अंतरांत ॥ दुःख जाहलें असे बहुत ॥ परी राणीच्या समाधानार्थ ॥ इतर गोष्टी काढिल्या ॥ ३५ ॥ पराधीनता फार कठिण ॥ मारणाहुनि अति दारुण ॥ म्हणूनि मधुर वचनें बोलून ॥ केलें समाधान राणीचें ॥ ३६ ॥ मग तियेची घेऊनि आज्ञा ॥ गुणवती आली स्वसदना ॥ आणि वंदूनियां पतिचरणा ॥ व्रतार्थ अनुज्ञा याचिली ॥ ३७ ॥ यथाविधि अधिकमासव्रत ॥ गुणवतीनें केलें समस्त ॥ तेणें तियेचें लोपूनि दुरित ॥ सौभाग्य वाढत चाललें ॥ ३८ ॥ प्रिये यशोमतीनें वहिलें ॥ अधिकमासव्रत अवमानिलें ॥ तेणें तियेप्रति आगळें ॥ दुःख पातलें अवचित ॥ ३९ ॥ यौवनारूढ[2] रूपसुंदर ॥ ऐसे तियेचे दोन कुमार ॥ तयांसि भरूनि महाज्वर ॥ एकाएकीं निवर्तले ॥ ४० ॥ तयांच्या दुःखें पोळोनि अती ॥ निश्चेष्ट पडली यशोमती ॥ तैसाच[3] वीरबाहु नृपती ॥ दुःखित अति जाहला ॥ ४१ ॥ सकळ लोकांसहवर्तमान ॥ विलाप करी हृदय पिटून ॥ म्हणे रे कटकटा[3] काय हा महान ॥ प्रसंग दारुण[4] आणिलासी ॥ ४२ ॥ इकडे राणी यशोमती ॥ मस्तक आपटी पृथ्वीवरती ॥ बहु दासीजन सांवरिती ॥ परी उपाव न चलेच ॥ ४३ ॥ पुत्रमुखांतें कुरवाळुनी ॥ विलाप करी दीनवाणी ॥ तो ऐकूनि सकळ मेदिनी ॥ उलों पाहें साचार ॥ ४४ ॥ ऐसा महा आकांत वर्तला ॥ प्रधानें राजा बहु बोधिला ॥ परी तो असे अज्ञानें भरला ॥ म्हणोनि समजला नाहींच ॥ ४५ ॥ प्रिये मलमासव्रत वहिलें ॥ यशोमतीनें अवमानिलें ॥ तया पापाचें ऐसें आगळें ॥ फळ उदेलें दारुण ॥ ४६ ॥ तैं गुणवती होती स्वसदनीं ॥ तियेनें लोकमुखांतूनी ॥ राजसुतमृत्यूची वार्ता ऐकुनी ॥ शोकसंतप्त जाहली ॥ ४७ ॥ आणि लगेचि सत्वरगती ॥ पावली राजसदनाप्रती ॥ तों पुत्रशोकें आक्रंदत क्षितीं[6] ॥ यशोमती लोळतसे ॥ ४८ ॥ तियेसि कवटाळूनि गुणवती ॥ विलाप करूं लागली अती ॥ त्या दोघींच्या शोकाची मितीं[7] ॥ कोण जगतीं करील ॥ ४९ ॥ उक्साबुक्सीं बहुत ॥ पुत्रांचे गुण आठवीत ॥ पुनःपुन्हा वक्षस्थल पिटित ॥ भूमीसि पडत आक्रोशें ॥ ५० ॥ ऐसें चाललें बहुत वेळ ॥ तैं

१ निंदायुक्त. २ तारुण्यावस्थेंत आलेले. ३ प्रारब्धा. ४ कठिण, भयंकर. ५ अधिक. ६ पृथ्वीवर. ७ प्रमाण. ( इयत्ता ).

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

ज्या दासी होत्या जवळ ॥ तयीं त्या दोघींसिहि निर्मळ ॥ बहुत प्रकारें बोधिलें ॥ ५१ ॥ आक्रंदन[1] किंचित राहिलें ॥ राणीनें गुणवतीकडे पाहिलें ॥ तों तियेचें मुख तांबूलें ॥ अत्यंत रंगलें असे पैं ॥ ५२ ॥ भांगीं भरला असे शेंदूर ॥ भाळीं कुंकुम अति सुंदर ॥ नयनीं अंजनाची[2] कोर ॥ कुसुमहार वेणींत ॥ ५३ ॥ ऐसी सौभाग्य-भूषणीं मंडित ॥ पाहूनियां गुणवतीप्रत ॥ यशोमती राणी अंतरांत ॥ क्रोधसंतप्त जाहली ॥ ५४ ॥ आणि म्हणे सखये गुणवती ॥ काय ही ऐशी तव रीती ॥ दुःखपर्वत मजवरुती ॥ कोसळूनियां पडलासे ॥ ५५ ॥ यावेळीं मुखमंडन करून ॥ आणि वस्त्राभरणें लेऊन ॥ येथें तूं आलीस नटून ॥ हें तुज योग्य दिसतें कीं ॥ ५६ ॥ ऊठ ऊठ येथूनि लवकरी ॥ सुखें जाईं आपुल्या मंदिरीं ॥ मी अभागिणी आहें खरी ॥ तरी दुःखचि भोगिलें ॥ ५७ ॥ तूं सदा सुखें राहीं नटत ॥ ऐसें बोलूनि राणीनें त्वरित ॥ बलात्कारें गुणवतीप्रत ॥ घरीं परत प्रेषिलें ॥ ५८ ॥ तिणें येऊनि स्वगृहासीं ॥ बहु विचारलें मानसीं ॥ परी राणीच्या अभिप्रायासी ॥ जाणवेना साचार ॥ ५९ ॥ तैं ती गुणवती स्वपतीप्रत ॥ विनयें म्हणे हो प्राणनाथ ॥ आज मी यशोमतीराणीप्रत ॥ गेल्यें होतें भेटावया ॥ ६० ॥ परी तिणें मज विलोकून ॥ कांहीं विपरीत केलें भाषण ॥ आणि लगेचि रागें तेथून ॥ परत दवडून लाविलें ॥ ६१ ॥ म्हणोनि मी आल्यें सत्वरी ॥ विचार केला नानापरी ॥ परी तियेच्या वाक्याचा अंतरीं ॥ अभिप्राय समजेना ॥६२॥ स्वयें दुःखीं पडली असोनी ॥ तिणें ऐसी कां केली करणी ॥ याचा विचार प्राणनाथांनीं ॥ स्वकीय मनीं करावा ॥ ६३ ॥ तैं ऐकूनि मंडन प्रधान ॥ म्हणे प्रिये तें व्यर्थ वचन ॥ पुत्रशोकें राणी त्रासून ॥ कांहीं तरी बडबडली ॥ ६४ ॥ त्याचा कीजे कासया विचार ॥ प्रभातीं तेथें जाईं सत्वर ॥ बोधवचनें सांगोनि चार ॥ बरें समजावीं तियेसीं ॥ ६५ ॥ मीहि उठोनि प्रातःकाळीं ॥ सभेंत जाईन राजा-जवळी ॥ ऐसें बोलूनि तेकाळीं ॥ स्वस्थ राहिलीं दोघेंजणें ॥ ६६ ॥ द्वितीय दिनीं सूर्योदयीं ॥ उभयतां गेलीं राजगृहीं ॥ मंडन पावला सभेठायीं ॥ गुणवती गेली राणिंवसा[3] ॥ ६७ ॥ तैं राणीनें गुणवतीचें वदन ॥ पूर्ववत्

१ ओरडत रडणें. २ काजळाची. ३ राणीच्या मंदिरांत.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

सुमंडित पाहून ॥ कोपें दासीमुखें तत्क्षण ॥ रायासि सांगून पाठविलें ॥ ६८ ॥ दासी जाऊनि रायाप्रती ॥ म्हणे राणीची ऐका विनंती ॥ प्रधानाची पत्नी गुणवती ॥ राणिवंसामाजीं आली असे ॥ ६९ ॥ हा आपुला दुःखाचा दिवस ॥ तिणें मंडन केलें विशेष ॥ तियेसि ऐशी कैशी हौस ॥ हें आम्हांस न कळेची ॥ ७० ॥ बाहेर प्रेम दाविती मोठें ॥ परि यांच्या अंतरीं असे खोटें ॥ नातरी ऐसी रीत कोठें ॥ आहे पहावें विचारोनी ॥ ७१ ॥ माझे दोघेहि पुत्र मरावे ॥ हिणें नटूनथटून यावें ॥ हें मज कैसें वाटेल बरवें ॥ मनीं पहावें विचारोनी ॥ ७२ ॥ माझें सुखोदक वोसरलें ॥ इयेच्या नटण्या भरतें आलें ॥ तुम्हां खोटें वाटेल वहिलें ॥ तरी प्रत्यक्ष विलोकिजे ॥ ७३ ॥ ऐसा ऐकतांचि निरोप ॥ राणीच्या प्रेमास्तव तो भूप ॥ राणिवसामाजीं सांटोप ॥ येऊनियां पोंचला ॥ ७४ ॥ गुणवतीच्या मंडनाप्रत ॥ पाहूनि कोपला अत्यंत ॥ म्हणे कथिलें समस्त ॥ तें यथार्थ असे पैं ॥ ७५ ॥ मग रायें गुणवतीसहित ॥ मंडनासि बांधूनि त्वरित ॥ तद्गृहींचें द्रव्यहि समस्त ॥ अपहारूनियां घेतलें ॥ ७६ ॥ आणि त्या प्रधानदंपत्यालागुनी ॥ कारागृहामाजीं कोंडुनी ॥ पुनःपुन्हा राजाराणी ॥ भर्त्सितीं झालीं बहुसाल ॥ ७७ ॥ मंडन म्हणे स्वस्त्रीप्रत ॥ प्रिये हें काय झालें प्राप्त ॥ कोणत्या कर्माचा हा अद्भुत ॥ विपाक झाला नकळे पैं ॥ ७८ ॥ तें ऐकूनियां गुणवती ॥ म्हणे व्यर्थ कां करितां खंती ॥ सेवकजनांची जीवितगती ॥ धन्याहातीं निरंतर ॥ ७९ ॥ कोपिष्ठ रायाची कथा ॥ कोपें उगाचि कां करितां ॥ आम्हां दुःखाब्धींतूनि तारिता ॥ असे सर्वथा श्रीधर ॥ ८० ॥ तो सकळब्रह्मांडाचा भार ॥ स्वशिरीं वाहतो निरंतर ॥ सर्व दुःखनाशक परमेश्वर ॥ दयासागर असे तो ॥ ८१ ॥ तोचि संसारीं सारभूत ॥ पुरवितो भक्तांचे मनोरथ ॥ तयाची कृपा होतां त्वरित ॥ दुःख समस्त निरसेल पैं ॥ ८२ ॥ ऐसें बोलूनि गुणवती ॥ लोहशृंखलें पीडित अती ॥ झांकूनियां नयनपातीं ॥ क्षितीवरुती पडियेली ॥ ८३ ॥ तैसाचि मंडन प्रधानही ॥ दुःखें पडला

१ राणीच्या मंदिरांत. २ सुखरूपी उदक. ३ मोठ्या त्वरेनें. ४ प्रधान व त्याची स्त्री या दोघांस. ५ तुरुंगांत. ६ लोखंडाचे सांखळीनें ( बिडीनें ).

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

धरित्रीठायीं ॥ इतुक्यामाजीं हरीनें हृदयीं ॥ तद्दुःखबंधन जाणियेलें ॥ ८४ ॥ मग रात्रीं केलें अद्भुत ॥ राजाराणींच्या स्वप्नांत ॥ स्वयें जाऊनि त्वरित ॥ सकळ वृत्त कथियेलें ॥ ८५ ॥ हरि म्हणे रे वीरबाहुराया ॥ मंडन तयाची जाया ॥ यांसि त्वां मूर्खें बांधोनियां ॥ कारागारीं घातिलेंस ॥ ८६ ॥ तीं दोघेंही महापुण्यवंत ॥ तयां तूं सोडीं सोडीं त्वरित ॥ नातरी सर्वस्वें तुजप्रत ॥ नाशीन निश्चित जाण हें ॥ ८७ ॥ अरे अधिमासव्रताचें फळ ॥ जें सर्वदा अक्षय निर्मळ ॥ तें त्या उभयतांसी सकळ ॥ सांप्रत प्राप्त झालेंसे ॥ ८८ ॥ पूर्वजन्मींहि त्या दोघांनीं ॥ स्वयें अति निर्धन असोनी ॥ मज श्रीहरीसि उद्देशूनी ॥ अधिमासव्रत आचरिलें ॥ ८९ ॥ तेणें कुंकुम अंजन सिंदूर ॥ स्रक्[1] तांबूलादि समग्र ॥ मुखालंकार अति सुंदर ॥ अक्षय लाभले आहेती ॥ ९० ॥ गुणवतीचें धुतलें वदन ॥ तरी तें न लोपेचि मंडन ॥ म्हणोनि ती आणि प्रधान ॥ असती जाण निर्दोषी ॥ ९१ ॥ त्वत्पत्नीनें अधिकमासांत ॥ न आचरितां माझें व्रत ॥ सांक्षेपवचनें[2] त्या मासाप्रत ॥ अवमानिलें एकदां ॥ ९२ ॥ तेणेंच यशोमतीलागून ॥ पुत्रशोक झाला हें जाण ॥ ऐसें बोलूनि श्रीभगवान ॥ अंतर्धान पावला ॥ ९३ ॥ तैं तो राव उठोनि बैसला ॥ चित्तीं स्वप्नाचा विचार केला ॥ मग संबोधूनियां[3] राणीला ॥ सर्वहि कथिला वृत्तांत ॥ ९४ ॥ तैं ती म्हणे रायालागुनी ॥ मीहि ऐसेंच पाहिलें स्वप्नीं ॥ तरी या गोष्टीचा याच क्षणीं ॥ विचार केला पाहिजे ॥ ९५ ॥ तें ऐकूनियां राणीसहित ॥ राव पातला कारागृहांत[4] ॥ गुणवतीचें मुख त्वरित ॥ दासीहस्तें प्रक्षाळिलें ॥ ९६ ॥ परी जैसें तैसेंचि दिसलें ॥ न्यूनाधिक्य कांहीं न झालें ॥ मग रायें स्वहस्तें आगळें ॥ चोळूनि धुतलें पुनरपि ॥ ९७ ॥ तरी तैसेंचि शोभे अत्यंत ॥ रायें दाविलें राणीप्रत ॥ कुंकुमादिमंडनें समस्त ॥ देखिलीं पूर्ववत तियेनें ॥ ९८ ॥ तैं ती राणी परम लाजली ॥ तैसीच रायाची अवस्था झाली ॥ दास दासी सकळ मंडळी ॥ आनंद पावली अत्यंत ॥ ९९ ॥ तंव त्या राजेश्वरें त्वरेंसीं ॥ गुणवतीसह प्रधानासी ॥ बंधमुक्त करूनि विशेषीं ॥ वस्त्रादिकेंसीं पूजिलें ॥ १०० ॥ आणि राणीसहित

१ फुलांची माळ. २ निंदायुक्त वचनानें. ३ हांक मारून. ४ तुरुगांत ( बंदिखान्यांत ).



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

आपण ॥ त्या दोघांसिहि हस्त जोडून ॥ म्हणे अपराध घडला नेणोन ॥ तरी क्षमा कीजे सज्जनीं ॥ १ ॥ ऐसें विनवूनि राणीसहित ॥ राव पावला स्वगृहाप्रत ॥ प्रधानहि स्त्रीसमवेत ॥ स्वकीयसदना पातला ॥ २ ॥ प्रिये ऐसें अधिमासव्रतें ॥ फळ लाभलें गुणवतीतें ॥ हें प्रत्यक्ष येतां अनुभवातें ॥ सर्व लोक विश्वासले ॥ ३ ॥ पुढें अधिमास होतां प्राप्त ॥ सर्वीं केलें यथोक्त व्रत ॥ तत्प्रभावें ते लोक समस्त ॥ भाग्यवंत जाहले ॥ ४ ॥ आणि तेव्हांपासूनि हें व्रत ॥ मेदिनीसि झालें विख्यात ॥ याणें संतति संपत्ति सतत ॥ होते अखंडित निश्चयें ॥ ५ ॥ समूळ दारिद्र्य लोपतें ॥ सर्वदा सर्व सुख लाभतें ॥ ब्रह्महत्त्यादि सर्व दुरितें ॥ निरसती जाण याचेनी ॥ ६ ॥ आणि इहलोकीं इच्छा पुरती ॥ देहांतीं होय मोक्षप्राप्ती ॥ ऐसी ह्या श्रेष्ठ व्रताची गती ॥ असे जाण इंदिरे ॥ ७ ॥ ऐसें सांगूनि रमारमण ॥ कथूं लागला उद्यापनविधान ॥ तें पुढील प्रसंगीं संपूर्ण ॥ विवरिजेल यथामती ॥ १०८ ॥ इति श्रीअधिकमासमाहात्म्यसार ॥ बृहन्नारदीयपद्माधार ॥ सज्जन श्रोते ऐकोत चतुर ॥ पंचविंशतितमोध्याय गोड हा ॥ २५ ॥ ॥ श्रीपुरुषोत्तमार्पणमस्तु ॥ इति पंचविंशतितमोऽध्यायः ॥ २५ ॥

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection




CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

श्रीगणेशायनमः ॥ श्रीविष्णु म्हणे लक्ष्मीलागुन ॥ प्रिये तूं सावध ठेवीं मन ॥ अधिकमासव्रतोद्यापन ॥ सांगतों संपूर्ण ऐक पां ॥ १ ॥ पूर्वोक्तरीतीं अधिकमासीं ॥ नित्य पूजावें पुरुषोत्तमासी ॥ आणि व्रतपूर्ति व्हावयासी ॥ उद्यापन कीजिये ॥ २ ॥ कृष्णपक्षीं चतुर्दशीस ॥ कीं नवमी किंवा अष्टमीस ॥ दिनशुद्धि पाहूनि विशेष ॥ उद्यापन करावें ॥ ३ ॥ नित्यवत् प्रभातीं उठोन ॥ शौच मुखमार्जन करून ॥ दंतधावनपूर्वक स्नान ॥ यथाविधि आचरावें ॥ ४ ॥ मग शुद्ध वस्त्र नेसुनी ॥ शुचिर्भूतपणें गृहीं येउनी ॥ अन्यंकथालाप[1] सोडुनी ॥ प्रक्षाळिजे हातपाय ॥ ॥ ५ ॥ त्यावरी आचमन करावें ॥ संध्यादेवार्चनादिक भावें ॥ नित्यवत् पूर्वाह्णिक[2] सारावें ॥ अंतरीं ध्यावें पुरुषोत्तमा ॥ ६ ॥ मग सदाचारसंपन्न ॥ श्रीकृष्णभक्तिपरायण ॥ ऐसे सदार[3] तीस ब्राह्मण ॥ पाचारूनियां आणावे ॥ ७ ॥ किंवा इतुकी नसेल शक्ती ॥ तरी स्ववित्तानुसार निरुती ॥ सात किंवा पांचचि प्रीतीं ॥ पाचारावे सादर ॥ ८ ॥ मध्याह्नसमय होतां प्राप्त ॥ पूजासंभार[4] घेऊनि समस्त ॥ मंगलवाद्यगर्जना करित ॥ उत्सव बहुत मांडावा ॥ ९ ॥ चतुरस्त्र कीजे शुभमंडप ॥ वितानमालादिकीं[5] सुरूप ॥ ध्वज पताका उभारिजे अमूप ॥ विपुल दीप लावावे ॥ १० ॥ चतुर्द्वारीं बांधावीं तोरणें ॥ तैसेचि मंगल घट ठेवणें ॥ सभोंवतीं पल्लव बांधणें ॥ शोभा करणें सर्वथा ॥ ११ ॥ त्या मंडपामध्यें निर्मळ ॥ पूजार्थ कल्पिलें जें शुद्धस्थळ ॥ तेथें चतुरस्त्र किंवा वर्तुळ ॥ गोमयें मंडळ करूनियां ॥ १२ ॥ त्यावरी एक द्रोण[6]प्रमाण ॥ कीं तदर्ध[7] किंवा तत्पाद[8]मान ॥ यथाशक्ति पंचधान्यीं पूर्ण ॥ सर्वतोभद्र करावें ॥ १३ ॥ मग त्यावरी चार दिशांस ॥ चार ठेवावे अव्रण कलश ॥ हैम[9] राजत[10] कीं ताम्र अशेष ॥ किंवा मृण्मय असावे ते ॥ १४ ॥ वित्त असोन शाठ्या न करावें ॥ स्वशक्तीतें अनुसरावें ॥ चतुर्व्यूहप्रीत्यर्थ[11] भावें ॥ ऐसे स्थापावे घट चार ॥ १५ ॥ मग त्यांमाजीं भरोनि उदक ॥ पंचपल्लव घालावे अनेक ॥ आणि सद्वस्त्रें वेष्टूनि सुरेख ॥ मुखीं श्रीफळें ठेवावीं ॥ १६ ॥ आणि त्या घटाठायीं क्रमानें ॥ एकेक देवता स्थापावी जाण ॥

२६

१ दुसऱ्या गोष्टी सांगणें. २ प्रातःकाळचें नित्यकर्म. ३ सपत्नीक. ४ पूजासामुग्री. ५ छत माळा इत्यादिकांनीं. ६ आदमण. ७ त्याचें अर्ध. ( पावमण ). ८ अदमणाचा पाव हिस्सा. ९ सुवर्णाचे. १० चांदीचे. ११ संकर्षण, वासुदेव, प्रद्युम्न, अनिरुद्ध या चतुर्व्यूहता त्यांच्या प्रीत्यर्थ.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

संकर्षण वासुदेव प्रद्युम्न ॥ तैसाचि चवथा अनिरुद्ध ॥ १७ ॥ मग जो व्रतारंभीं प्रथम ॥ राधिकेसह पुरुषोत्तम ॥
परंज्योती परंधाम ॥ कलशावरी स्थापिलासे ॥ १८ ॥ तो त्या कलशासह दोंकरीं ॥ आणूनि सर्वतोभद्रावरी ॥
चार कलशांच्या अभ्यंतरीं ॥ स्थापूनियां साचार ॥ १९ ॥ वेदवेदांगवेत्ता ब्राह्मण ॥ मुख्य आचार्य करावा
जाण ॥ आणि जपालागीं महाविद्वान ॥ चार ब्राह्मण वरावे ॥ २० ॥ तयांलागीं एकेकाकारणें ॥ दोन दोन
द्यावीं वसनें[1] ॥ मुद्रिकादिक करभूषणें ॥ तींहीं अर्पिणें यथाशक्ती ॥ २१ ॥ आणि नानावस्त्र भूषादिकेंसीं ॥ अलं-
कारूनियां आचार्यांसी ॥ देहशुद्ध्यर्थ विधानेंसी ॥ प्रायश्चित्त आचरावें ॥ २२ ॥ तदनंतर स्वस्त्रीसहित ॥ बैसो-
नियां एकाग्र चित्त ॥ पूर्वोक्तविधीनें साद्यंत ॥ भगवत्पूजन करावें ॥ २३ ॥ पंचामृतस्नानपूर्वक ॥ उपचार अर्पिजे
सकळिक ॥ भक्ष्य भोज्य लेह्य पेयादिक ॥ नैवेद्य अनेक समर्पावे ॥ २४ ॥ आणि त्या चार विप्रांकडून ॥ चतुर्व्यू[2]-
हजप कीजे जाण ॥ चार दिशांसि चार महान ॥ दीप क्रमानें उजळावे ॥ २५ ॥ तदनंतर नारिकेळें ॥ आणि
यथालब्ध अन्यफळें ॥ तैशींच पंचरत्नें सोज्वळें ॥ करसंपुटीं घेऊनियां ॥ २६ ॥ त्यांत गंधपुष्पाक्षतानीरें[3] ॥ घेऊ-
नियां मग सदार ॥ जांनु[4] टेंकूनि भूमीवर ॥ अर्घ्य सादर समर्पावें ॥ २७ ॥ देवदेवनमस्तुभ्यमिति ॥ मंत्रें अर्घ्य
द्यावें प्रीतीं ॥ नंतर श्रीभगवंताप्रती ॥ नमस्कार करावा ॥ २८ ॥ मग वाद्य गीत नर्तन ॥ स्तोत्रपाठ पुराणप-
ठण ॥ आणि छत्रचामरादि संपूर्ण ॥ राजोपचार अर्पावे ॥ २९ ॥ मग पुष्पांजलि समर्पूनी ॥ प्रार्थना कीजे
हस्त जोडुनी ॥ राधासहित कृष्णाचें मनीं ॥ ध्यान करीत साचार ॥ ३० ॥ रात्रौ करावें जागरण ॥ प्रभातीं
पुनश्च स्नान करून ॥ नित्यनियम सर्व सारून ॥ पूर्ववत्पूजन करावें ॥ ३१ ॥ मग भक्तिभावें यथाविधान ॥ नाममंत्रीं
करावें हवन ॥ तदनंतर सारूनि तर्पण ॥ कीजे मार्जन यथोक्त ॥ ३२ ॥ इतुकें कृत्य झाल्यावरुती ॥ राधेसह भग-
वंताप्रति ॥ नीराजयामि देवेशमिति ॥ मंत्रें आरती कीजिये ॥ ३३ ॥ मग राधेसह पुरुषोत्तमासी ॥ ध्याऊनियां
शुद्ध मानसीं ॥ सुगंधपुष्पांजलि तयासी ॥ सादर पूर्ण अर्पावा ॥ ३४ ॥ आणि स्वस्त्रीसह भूमीवर ॥ कीजे

॥ १ ॥

१ वस्त्रें. २ संकर्षणादि चार देवतांचा जप. ३ उदक. ४ गुडघे.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

साष्टांग नमस्कार ॥ तदनंतर जोडूनि कर ॥ प्रार्थना सादर करावी ॥ ३५ ॥ इतुका विधी झाल्यानंतर ॥ ब्राह्मणासि पूजूनि सादर ॥ सुवर्णसहित पूर्णपात्र ॥ दान द्यावें यथाविधी ॥ ३६ ॥ आणि सपत्निकआचार्यब्राह्मणा ॥ पूजूनि द्यावी बहु दक्षणा ॥ वस्त्रें भूषणें अर्पूनि नाना ॥ तयांच्या मना तोषवावें ॥ ३७ ॥ आणिक द्यावें गोप्रदान ॥ सुशीला गाय सुलक्षण ॥ बहु दुग्धवती अति तरुण ॥ चतुःस्तनी सवत्स ॥ ३८ ॥ ताम्रपृष्ठी निरोगी साजिरी ॥ न्यायार्जिता पुष्टशरीरी ॥ स्वर्णशृंगी रौप्यखुरी ॥ वस्त्रालंकारीं सुभूषित ॥ ३९ ॥ ऐसी धेनू द्यावी एक ॥ ऋत्विज पूजावे सकळिक ॥ वस्त्रें भूषणें देऊनि अनेक ॥ दक्षिणा द्यावी तयांसी ॥ ४० ॥ यथाशक्ति दंपत्यांलागुन ॥ वस्त्रभूषणादिकीं पूजून ॥ अष्टविध पदांचें दान ॥ यथाविधी कीजिये ॥ ४१ ॥ आणि तिलपात्र घृतपात्र ॥ जलपात्र उपानंह[1] छत्र ॥ सोपस्करशय्या[2] पवित्र ॥ ऊर्णावस्त्रं[3] कबल ॥ ४२ ॥ रेशमी वस्त्र कृष्णाजिन[4] ॥ कार्पासवस्त्र रजत सुवर्ण ॥ नाना रत्नें भक्ष्य भोज्यान्न ॥ तैशींच धान्यें सवही ॥४३॥ इत्यादि दानें यथाशक्ती ॥ भावें द्यावीं दंपत्यांप्रती ॥ श्रीमद्भागवतदान प्रीतीं ॥ वैष्णवद्विजासी पैं द्यावें ॥ ४४ ॥ आपणा शक्ति असेल तरी ॥ विलंब न कीजे क्षणभरी ॥ आयुष्य चंचल बुदबुदापरी[5] ॥ हेंचि अंतरीं विचारावें ॥ ४५ ॥ श्रीमद्भागवत साक्षात ॥ भगवत्स्वरूप आहे अद्भुत ॥ हें जे वैष्णव ब्राह्मणाप्रत ॥ दान देतात भक्तीनें ॥ ४६ ॥ ते कोटिकुळांसि उद्धरूनी ॥ अप्सरागणयुक्त विमानीं ॥ अनायासें आरूढोनी ॥ जातात गोलोकालागुनी ॥ ४७ ॥ श्रीमद्भागवतदानासमान ॥ इंदिरे आणिक नाहीं दान ॥ याणें साक्षाच्छ्रीभगवान ॥ राधारमण तोषतो ॥ ४८ ॥ सहस्रावधि कन्यादानें ॥ कीं वाजपेय शत करणें ॥ कीं धान्यासहित क्षेत्रें देणें ॥ कीं तुळादानें शतावधी ॥ ४९ ॥ कीं महादानें अष्टविध ॥ कीं दान देणें चारी वेद ॥ इत्यादिक जीं कर्मे विविध ॥ पुण्यफलद असती पैं ॥ ५० ॥ तीं भागवतदानाच्या षोडशांशाशीं ॥ न तुळती जाण निश्चयेंसी ॥ तस्मात् मानवें बहु यत्नेंसी ॥ भागवत दान दीजिये ॥ ५१ ॥ आणि त्रिंशद्दंपत्यांकारणें ॥ भावें द्यावीं अपूपदानें ॥ तयाचा प्रकार कैसा करणें ॥

१ चर्मी जोडा. २ गाद्यागिरद्यादिकांसहित पलंग. ३ धाबळी. ४ हरिणाचें कातडें. ५ बुडबुड्यासारखें.

सांगतों ऐकें समस्त ॥५२॥ अडीच अडीच प्रस्थांचे विशेष ॥ कांस्यसंपुट घ्यावे तीस ॥ प्रत्येकामाजीं तेहतीस ॥ अपूप सरस घालावे ॥ ५३ ॥ त्या अपूपालागीं प्रत्येकीं ॥ छिद्रें असतील पैं जितुकीं ॥ तितुकीं वर्षसहस्रें सुखी ॥ दाते वैकुंठीं वसतात ॥ ५४ ॥ मग तेथूनि गोलोकाठायीं ॥ जाऊनि सुखें वसत अक्षयीं ॥ जेथूनि पुनरावृत्ति नाहीं ॥ ज्योतिर्धाम सनातन जो ॥ ५५ ॥ असो ऐशीं अपूपदानें ॥ करावीं वित्तशाठ्याविणें ॥ केवळ निर्धन असेल त्यानें ॥ शक्तिप्रमाणें कीजिये ॥ ५६ ॥ अडीच प्रस्थांचा संपुट एक ॥ त्यांत तेहतीस अपूप सुरेख ॥ घालूनियां विधिपूर्वक ॥ दान द्यावें एकासी ॥ ५७ ॥ किंवा अपूपसामग्री समस्त ॥ अपक्कचि घालूनि संपुटांत ॥ श्रीपुरुषोत्तमप्रीत्यर्थ ॥ दान द्यावें यथाविधी ॥ ५८ ॥ मग आमंत्रित दंपत्यांलागुनी ॥ सुभोजन देतों म्हणोनी ॥ पुरुषोत्तमाच्या सन्निधानीं ॥ संकल्प झणीं करावा ॥ ५९ ॥ आणि प्रार्थूनियां श्रीकृष्णासी ॥ भावें स्मरत शुद्ध मानसीं ॥ त्या सर्वही द्विजदंपत्यांसीं ॥ हर्षे विधिवत् पूजूनियां ॥ ६० ॥ त्या ब्राह्मणरूपी श्रीहरी ॥ आणि स्त्रीरूपी राधिका सुंदरी ॥ आहे ऐसें मानूनि अंतरीं ॥ भोजन द्यावें उत्तम ॥६१॥ अपूप मोदक मांडे घीवर ॥ पोळ्या लाडू करंज्या सुंदर ॥ जिलब्या उंडे मोतीचूर ॥ सांदणें आणि अनरसे ॥ ६२ ॥ शेवया बोटदे बासुंदी ॥ दूधपाक आणि क्षीर साधी ॥ पुऱ्या कडबू धारगे बुंदी ॥ इत्यादि अनेक पक्वान्नें ॥ ६३ ॥ साखरभातादि भात अनेक ॥ भजीं शेंगोळीं माषवटक ॥ अलाबूवादि[1] शाका रुचिक ॥ सांडगे फेण्या पापड ॥ ॥ ६४ ॥ पाटवड्या विविध बेसनें ॥ मुद्गादिक[2] रुचिक वरान्नें ॥ रायतीं मुरंबे अनेक पानें[3] ॥ तैशींच नाना पंचामृतें ॥ ६५ ॥ श्रीखंड लापशा नानापरी ॥ कढी सारें अनेक सांबारीं ॥ लिंबु आर्द्रक कोशिंबिरी ॥ दूध दहीं घृत मंड ॥ ६६ ॥ आणि चोष्य[4] पेयें[5] चर्व्यें[6] पदार्थ ॥ नाना चटण्या लोणचीं बहुत ॥ द्राक्षादि फळें मुळें अद्भुत ॥ नाहीं गणित तयांसी ॥ ६७ ॥ ऐसे पदार्थ नानापरी ॥ परिवेषूँनियां[7] पात्रांवरी ॥ प्रोक्षण करूनि पात्रें सारीं ॥ प्रीतीं उदक सोडावें ॥ ६८ ॥ राधाकृष्णार्पणमस्तु म्हणून ॥ तयां सांगावें भोजनालागुन ॥ मग



१ काळा भोपळा इत्यादि. २ मूग आदिकरून. ३ पन्हीं. ४ चोखून खाण्याचे. ५ पिण्याचे. ६ चावण्याचे. ७ वाढून.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

पाणिपल्लव जोडून ॥ मृदुवचनें विनवावें ॥ ६९ ॥ स्वादु स्वादु हे पदार्थ ॥ आपणासाठीं केले समस्त ॥ तरी आनंदें बैसोनि स्वस्थ ॥ तृप्तिपर्यंत भक्षावे ॥ ७० ॥ ह्या सर्व सिद्ध पदार्थांतून ॥ रुचेल तें घ्यावें मागुन ॥ अंतरीं न कीजे अनमान ॥ विपुळ संपूर्ण आहे पैं ॥ ७१ ॥ तुम्ही अनुग्रह केला आजी ॥ धन्य झालों त्रैलोक्यामाजीं ॥ मम जन्माचें सार्थक सहजीं ॥ झालें असे साचार ॥ ७२ ॥ ऐशी करूनियां प्रार्थना ॥ मग भोजनोत्तर त्या ब्राह्मणा ॥ यथाशक्ति देऊनि दक्षिणा ॥ तांबूलें द्यावीं सादर ॥ ७३ ॥ पूगं[1] एलां[2] लवंग कर्पूर ॥ जायपत्री जातीफळं[3] केशर ॥ कस्तुरी कंकोळ सुधा[4] खैरादिर[5] ॥ आणि नागवल्लीदळें ॥ ७४ ॥ ऐसे सर्व पदार्थ मिळून ॥ उत्तम तांबूल होतें जाण ॥ तें भगवंतासि प्रिय म्हणोन ॥ ब्राह्मणालागुन अर्पावें ॥ ७५ ॥ ऐसें तांबूल द्विजाग्र्यासी ॥ जो कां अर्पितो भक्तिभावेंसी ॥ तो भोगुनी सर्व सौभाग्यासी ॥ अंतीं मोक्षास पावतो ॥ ॥ ७६ ॥ असो मग त्या विप्रांचे हातीं ॥ मोदक द्यावे बहुप्रीतीं ॥ आणि यथाविधी तत्पत्नींप्रती ॥ द्यावीं सौभाग्यवायनें ॥ ७७ ॥ मग ग्रामसीमेपयत भावें ॥ त्यां दंपत्यांतें बोळवावें ॥ तयां वंदूनियां भावें ॥ परत यावें सदनासी ॥ ७८ ॥ मग पुरुषोत्तमसन्निधानीं ॥ एकाग्रचित्तें बैसोनी ॥ मंत्रहीनेतिमंत्रेंकरूनी ॥ जोडूनि पाणी प्रार्थावें ॥ ७९ ॥ आणि यस्यस्मृत्येति मंत्रेंसीं ॥ वंदूनियां पुरुषोत्तमासी ॥ न्यून तें सर्व संपूर्णतेसी ॥ पाववावें साचार ॥ ८० ॥ मग सकळ भूतांलागून ॥ यथाविभाग अन्न वांटून ॥ सर्व स्वजनासह आपण ॥ शेवटीं भोजन करावें ॥ ८१ ॥ प्रिये हें उद्यापन तत्वतां ॥ तुज कथिलें असे आतां ॥ परी हें मध्येंच केलें असतां ॥ पुढचें वर्तन सांगतों ॥ ८२ ॥ शेषदिनीं प्रत्येक दिवशीं ॥ प्रथमदिन स्थापित कलशीं ॥ राधिकेसह पुरुषोत्तमासीं ॥ नित्यव्रताचि पूजूनियां ॥ ८३ ॥ पुढें दर्श होतां प्राप्त ॥ सर्व रात्र जागर करित ॥ पुरुषोत्तममूर्ति राधेसहित ॥ यथाविधी पूजूनियां ॥ ८४ ॥ अंतीं करावा नमस्कार ॥ मग आनंदें व्रतियें सदार ॥ त्या भगवन्मूर्तीचें सादर ॥ विसर्जन करावें ॥ ८५ ॥ आणि त्या मूर्तीसहवर्तमान ॥ आचार्यासि द्यावें पीठदान ॥ आणि यथायोग्य अन्न-

१ सुपारी. २ वेलची. ३ जायफळ. ४ चुना. ५ कात.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

दान ॥ स्वेच्छानुसार करावें ॥ ८६ ॥ जैशा कैशाही उपायेंसी ॥ हें व्रत कीजे अधिकमासीं ॥ वित्तानुसार भक्तिभावेंसी ॥ विविध दानें कीजिये ॥ ८७ ॥ नारी अथवा नर जे कोण ॥ करित मासव्रताचरण ॥ दुःख दारिद्र्य तयांलागुन ॥ प्राप्त नव्हे कदाच ॥ ८८ ॥ आणि तयांचे सर्व मनोरथ ॥ येथेंचि पूर्ण होऊनि त्वरित ॥ अंतीं बैसोनि विमानांत ॥ गोलोका जात निश्चयें ॥ ८९ ॥ इति श्रीअधिकमासमाहात्म्यसार ॥ बृहन्नारदीय पद्माधार ॥ सज्जन श्रोते ऐकोत चतुर ॥ षड्विंशतितमाध्याय गोड हा ॥ ९० ॥

॥ इति षड्विंशतितमोऽध्यायः ॥ २६ ॥



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

श्रीगणेशायनमः ॥ ॥ पूर्वाध्यायींचें वर्तमान ॥ कथिलें मासव्रतोद्यापन ॥ जेणें आचरित व्रतालागुन ॥ पूर्णता होय साचार ॥ १ ॥ आतां पुनः वैकुंठविहारी ॥ रमेसी म्हणे गे प्रिये सुंदरी ॥ तें पूर्वोक्तमासव्रत निर्धारीं ॥ सर्वां उपरि असे पैं ॥ २ ॥ हें पुरुषोत्तममासव्रत ॥ यथोक्तविधीनें आचरत ॥ तया पाहतांचि यमदूत ॥ पळोनी जात दिगंतरीं ॥ ३ ॥ सिंहालागीं विलोकुनी ॥ जैसे गज पळती रानीं ॥ कीं वैनतेया[1] पाहतां क्षणीं ॥ सर्प विवरीं जातात ॥ ४ ॥ कीं उदेतांचि दिनपती[2] ॥ दिवाभीतें[3] सर्व लपती ॥ तैशीच यमदूतांची गती ॥ होय व्रती देखतांच ॥ ५ ॥ यथोक्त मासव्रत करित ॥ तदंगीं सर्व तीर्थें वसत ॥ आणि पुण्यक्षेत्रें देवता समस्त ॥ त्याहि राहत तेथेंची ॥ ६ ॥ तयांच्या पुण्या नाहीं माप ॥ नाना दुःखें दारिद्र्य पाप ॥ समूळ नासूनि आपेंआप ॥ पुण्यस्वरूप होती ते ॥ ७ ॥ पुरुषोत्तमाच्या सेवेविषयीं ॥ जयाचें मन निश्चळ राही ॥ तयालागीं विघ्नें कदाही ॥ स्पर्शूं न देई भगवान ॥ ८ ॥ हें अधिमास व्रत करित ॥ ते यत्रकुत्रापि[4] वसोत ॥ तयांपुढें पिशाच प्रेत ॥ भूतादि न येत कोणीही ॥ ९ ॥ नानाशतयज्ञांहूनिही ॥ हें मासव्रत श्रेष्ठ राही ॥ क्रतूंनीं[5] स्वर्गप्राप्ति होई ॥ आणि हें तों नेई गोलोका ॥ १० ॥ हें मासव्रत यथाविधान ॥ जो भक्तिभावें करितो जाण ॥ तयाच्या फळाचें सर्व वर्णन ॥ शेषाचेनही नव्हेच ॥ ११ ॥ ऐसें हें पुरुषोत्तमव्रत ॥ सर्वांहूनि श्रेष्ठ अत्यंत ॥ म्हणोन प्रत्येक अधिमासांत ॥ सर्वीं यथोक्त आचरावें ॥ १२ ॥ परी इतुकें नव्हे कोणाचेनी ॥ त्यांणीं काय करावी करणी ॥ ती सांगतों ऐकें साजणी ॥ एकाग्र चित्त करूनियां ॥ १३ ॥ अधिकमास येतां क्षण ॥ कांहींहि नियम धरावा जाण ॥ स्नान दान जप तर्पण ॥ पुराणश्रवण देवपूजा ॥ १४ ॥ तैलत्याग भूमिशयन ॥ एकजाति पत्रावलि भोजन ॥ अपूपदान नखकेशधारण ॥ एकान्नभोजन तैसेंचि ॥ १५ ॥ नित्य दीपदान सांग ॥ दंपत्यभोजन उपानहत्याग[6] ॥ धान्यवर्जन नियम अभ्यंग ॥ धात्रीस्नाननियम ॥ १६ ॥ फलत्याग लवणवर्जन ॥ तिलतांबूलधान्यादिदान ॥ हेम रौप्य सौभाग्यवायन ॥ भागवतश्रवण तैसेंचि ॥ १७ ॥ उपो-

२७

१ गरुडास. २ सूर्य. ३ घुबडें. ४ कोणत्याही ठिकाणीं. ५ यज्ञांनीं. ६ जोडा त्यागणें. ( अनवाणी चालणें ).

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

षण अयाचित नक्त ॥ धारणापारणा एकभुक्त ॥ हविष्याशन मौनव्रत ॥ तुलसीपूजा यथाविधी ॥ १८ ॥ श्रीकृष्णनामसंकीर्तन ॥ शालिग्रामशिलार्चन ॥ अपूजितमूर्तिपूजन ॥ इत्यादि पूर्वोक्त नियम जे ॥ १९ ॥ तयांतूनि स्वेच्छानुसार ॥ एक दोन तीन चार ॥ स्वशक्त्यनुरूप साचार ॥ नियम घ्यावे यथाविधी ॥ २० ॥ नियमाचा भंग न होई ॥ तैसें वर्तावें सर्वदाही ॥ नियमभंगें पूर्वार्जितही ॥ पुण्य जातें विलयास ॥ २१ ॥ एकहि नेम केल्याशिवाय ॥ अधिमास जयाचा व्यर्थ जाय ॥ तया दारिद्र्यादि दुःखें अतिशय ॥ प्राप्त होत निश्चयें ॥ २२ ॥ यास्तव येतांचि अधिकमास ॥ उद्देशूनि पुरुषोत्तमास ॥ एक तरी नियम विशेष ॥ मानवीं अवश्य कीजिये ॥ २३ ॥ जे कोणी अधिकमासीं ॥ एके किंवा अनेक नेमेंसीं ॥ आराधिती पुरुषोत्तमासी ॥ अखंड तयांसी सुख होय ॥ २४ ॥ इंदिरे आतां अधिमासीं ॥ मनुष्यमात्रें ज्या नियमांसी ॥ अवश्य पाळावें ते तुजसी ॥ सांगतों ऐक साचार ॥ ॥ २५ ॥ राजिका[१] राजमाष[२] द्विदल[३] ॥ मधु मांस कांजी तिलतैल ॥ पलांडु लशुन मुस्ता[४] मूल[५] ॥ छत्राक[६] शिग्रु[७] गृंजन[८] ॥ २६ ॥ आणि मादक[९]वस्तु संपूर्ण ॥ अधिमासीं सोडाव्या जाण ॥ जितुक्या वस्तु आमिषाभिधान ॥ तितुक्या समस्त वर्जाव्या ॥ २७ ॥ प्राण्यंगचूर्ण[१०] तें आमिष ॥ फळांमाजीं जंबीर[११] आमिष ॥ धान्यांमाजीं मसुरा आमिष ॥ अन्नामाजीं शिळें अन्न ॥ २८ ॥ अजामहिषी गोदुग्धांहून ॥ अन्य दुग्ध आमिष जाण ॥ द्विज[१२]विक्रीत रस[१३] संपूर्ण ॥ आणि भूमिजलवण आमिष ॥ २९ ॥ ताम्रपात्रस्थ गव्य[१४] विशेष ॥ त्यासहि बुधें[१५] म्हणती आमिष ॥ आत्मार्थ[१६] पाचित अन्न अशेष ॥ तेंहि आमिष बोलिजेतें ॥ ३० ॥ असो परद्रोह परनिंदा ॥ अधिमासीं वर्जावीं सदा ॥ परदारागमन कदा ॥ करूं नयेचि साचार ॥ ३१ ॥ शल्यदुष्ट[१७] भावदुष्टान्न[१८] ॥

---

१ राई ( मोहरी ). २ पावटे. ३ तुरी चणे इत्यादि दोन डाळींचीं धान्यें. ४ नागरमोथा. ५ मुळा. ६ वांगें. ७ शेवगा. ८ गाजर. ९ अमलीपदार्थ. १० शिंपीचा चुना. ११ जांबरी लिंबू. १२ ब्राह्मणानें विकलेलें. १३ गूळ दूध इत्यादि. १४ दूध, तूप, इत्यादि गाईपासून झालेले. १५ विद्वान लोक. १६ आपणासाठीं ( पंचमहायज्ञार्थ नव्हे ) शिजविलेलें. १७ विष कांच वगैरेंनीं दूषित. १८ हें अमक्या अमंगळ पदार्थासारखें आहे असें मनांत आणलेलें.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

क्रियादुष्ट शब्ददुष्टान्न ॥ दग्धान्न द्विपाचितान्न ॥ अधिकमासीं वर्जावें ॥ ३२ ॥ द्विजद्विट्पतितम्लेंछांशीं ॥ व्रात्यांशीं आणि वेदबाह्यांशीं ॥ तेवींच सर्व रजस्वलांशीं ॥ अधिकमासीं बोलूं नये ॥ ३३ ॥ आणि तयीं पाहिलेलें अन्न ॥ काकदृष्ट आणि सूतकान्न ॥ तेंहि अधिकमासामाजीं जाण ॥ भक्षूं नये कदापी ॥ ३४ ॥ वेद द्विज भूपाळ ॥ स्त्री गो व्रती महंत निर्मळ ॥ यांची निंदा कदाकाळ ॥ अधिकमासीं करूं नये ॥ ३५ ॥ ऐसे हे विशेष नियम समस्त ॥ पाळिले असतां अधिकमासांत ॥ साक्षात् भगवान राधाकांत ॥ पुरुषोत्तम तोषतो ॥ ३६ ॥ श्रीमद्भागवत अधिमासीं ॥ भावें ऐके नित्य नियमेंसी ॥ तयाचें पुण्य वर्णावयासी ॥ चतुर्मुखही शकेना ॥ ३७ ॥ आणि पुरुषोत्तममासांत ॥ जे शाळिग्राम शिळेप्रत ॥ तुळसीदळलक्षें पूजित ॥ तयांचें पुण्य अनंत असे ॥ ३८ ॥ इंदिरे जे अधिकमासांत ॥ एकान्नभक्षण व्रत करित ॥ ते चतुर्भुज होऊनि त्वरित ॥ परमगतीतें पावती ॥ ३९ ॥ एकान्नव्रतापरतें कांहीं ॥ इतर व्रत पवित्र नाहीं ॥ एकान्नेंचि सिद्ध मुनिही ॥ निर्वाणपद पावले ॥ ४० ॥ अधिकमासीं नक्त करित ॥ ते मानव नराधिप होत ॥ आणि सर्व सुख भोगूनि येथ ॥ मोक्षाप्रत पावती ॥ ४१ ॥ नक्तभोजी नर निर्मळ ॥ सर्व पुण्यात्मा होय केवळ ॥ प्रतिदिनीं अश्वमेधाचें फळ ॥ लाभे सकळ तयासी ॥ ४२ ॥ असो ऐसे हे नियम चांग ॥ इंदिरे तुज कथिले अभंग ॥ आतां गृहीतनियमत्याग ॥ विधिपूर्वक सांगतों ॥ ४३ ॥ नक्तभोजी मानवें पूर्ण ॥ अंतीं करावें ब्राह्मणभोजन ॥ अयाचिताचें उद्यापन ॥ स्वर्णदान हें होय ॥ ४४ ॥ अमावास्याशन मानवें ॥ सदक्षिणाक गोदान द्यावें ॥ धात्रीस्नान नरें करावें ॥ दधि किंवा दुग्धदान ॥ ४५ ॥ ज्या ज्या फळाचा धरावा नेम ॥ तें तें दान द्यावें उत्तम ॥ तेणें सांगता होऊनि परम ॥ फल निःसीम लाभतें ॥ ४६ ॥ तैलस्थानीं घृतदान द्यावें ॥ घृतस्थानीं दुग्धदान करावें ॥ धान्यनियमसांगतार्थ द्यावे ॥ गोधूम शालि तंडुल ॥ ४७ ॥ भूशयनकर्त्यां नरानें ॥ सपँरिच्छद शय्या देणें ॥ आपणा आणि परासी जियेनें ॥ अत्युत्तम सुख होय ॥ ४८ ॥

---

१ वाईट कृतीन केलेलें. २ शब्दानें रक्तासारखें आहे इत्यादि दूषित. ३ करपलेलें. ४ दोन वेळां शिजविलेलें ( उकडी मोदक वगैरे ) ५ ब्रह्मदेवही. ६ घेतलेले नियम सोडणें. ७ गादी उशी वगैरे साहित्यासहित.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

पत्रावळीवरचें भोजन ॥ तयाचें ऐसें उद्यापन ॥ घृतंशर्करासह उत्तमान्न ॥ जेवूं घालणें ब्राह्मणासी ॥ ४९ ॥ मौनभोजन जे करित ॥ तयीं शेवटीं सांगतार्थ ॥ घंटा आणि हिरण्यसहित ॥ तिलदान देऊनियां ॥ ५० ॥ घृतप्रचुर उत्तमान्नें ॥ जेवूं घालणें दंपत्याकारणें ॥ नखकेशधर मानवानें ॥ दान देणें आदर्श ॥ ५१ ॥ उपानह-त्यागाची सांगता ॥ उपानहदानें होय तत्वतां ॥ लवणाचा परित्याग करितां ॥ नानारसदान द्यावें ॥ ५२ ॥ दीपदान व्रताच्या अंतीं ॥ कराया तद्व्रतसंपूर्ती ॥ पात्रासहित दीप निरुती ॥ दान द्यावा विप्रास ॥ ५३ ॥ पल-प्रमाण ताम्रपात्र ॥ त्यांत घालावें घृत पवित्र ॥ सुवर्णवर्ती घालूनि विचित्र ॥ दान द्यावा दीप तो ॥ ५४ ॥ धारणापारणासांगतार्थ ॥ अंतीं सवस्त्रकांचनोपेत ॥ मृण्मय किंवा हेमनिर्मित ॥ अष्टकुंभ समर्पावे ॥ ५५ ॥ आणि छत्रोपानहासहवर्तमान ॥ त्रिंशत मोदक द्यावे दान ॥ तैसाचि एक वृषभ महान ॥ दान द्यावा यथाविधी ॥ ॥ ५६ ॥ ऐशाप्रकारीं नियमसांगता ॥ यथाविधी केली असतां ॥ गृहीत नियमाची होऊनि पूर्णता ॥ यथोक्त फळ लाभतें ॥ ५७ ॥ आणि उक्तिविधिसाधनार्थ ॥ जरी कां कोणी असमर्थ ॥ किंवा वेळीं यथोक्त पदार्थ ॥ दुर्लभ होत निर्धारें ॥ ५८ ॥ तरी मग काय करावें ॥ तें सांगतों ऐक आघवें ॥ केवळ विप्रासि पूजूनि भावें ॥ द्यावी दक्षिणा यथाशक्ती ॥ ५९ ॥ आणि तयांच्या मुखेंकरून ॥ व्रतपूर्ति वदवावी जाण ॥ द्विजवाक्य श्रवणें तत्क्षण ॥ यथोक्त पूर्ण व्रत होय ॥ ६० ॥ आणि प्रिये अधिमासांत ॥ श्रीपुरुषोत्तमप्रीत्यर्थ ॥ नियम घेऊनियां यथोक्त ॥ जो जो पदार्थ वर्जिलासे ॥ ६१ ॥ तो तो पदार्थ अधिकमासांतीं ॥ दान देऊनि विप्राप्रती ॥ तन्मुखें ऐकूनि व्रतपूर्ती ॥ नंतर स्वयें भक्षावा ॥ ६२ ॥ ऐसा गृहीतनियमत्याग ॥ करतां होऊनि यथासांग ॥ यथोक्त नियमाचें चांग ॥ भगव-त्कृपें लाभतें फळ ॥ ६३ ॥ दक्षिणा देऊनि विप्राप्रती ॥ तन्मुखें ऐकावी व्रतपूर्ती ॥ व्रतांतीं दक्षिणा न अर्पिती ॥ ते पैं पडती नरकांत ॥ ६४ ॥ आणि व्रतवैकल्य पावून ॥ महाकुष्ठी होती जाण ॥ तस्मात् दक्षिणा देऊन ॥



१ ज्यांत घृतयुक्त पदार्थ पुष्कळ आहेत, किंवा ज्यांत घृत पुष्कळ आहे अशीं. २ आरसा. ३ अनवाणी चालण्याची. ४ सोन्याची वात. ५ वस्त्र व सुवर्ण यांसहित.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

व्रतपरिपूर्ति वदवावी ॥ ६५ ॥ ऐसें भक्तिभावें करितां ॥ सकळ व्रतफळ ये हाता ॥ आणि अनंतवाजपेयांचें तत्वतां ॥ फळ लाभतें निश्चयें ॥ ६६ ॥ सकळ पापें होती दहन ॥ मनोरथ पुरती संपूर्ण ॥ आणि अंतीं मोक्ष-सदन ॥ लाभतें जाण साचार ॥ ६७ ॥ इंदिरे ऐसा अधिकमास ॥ पुण्यफलदाता आहे विशेष ॥ एतदर्थ एक इतिहास ॥ सांगतों ऐकें सादर तूं ॥ ६८ ॥ ऐसें बोलून दामोदर ॥ कथा सांगूं लागला मधुर ॥ तियेचें विवरण सुंदर ॥ पुढच्या प्रसंगीं होईल पां ॥ ६९ ॥ इति श्रीअधिकमासमाहात्म्यसार ॥ बृहन्नारदीयपद्माधार ॥ सज्जन श्रोते ऐकोत चतुर ॥ सप्तविंशतितमोध्याय गोड हा ॥ ७० ॥ ॥ इति सप्तविंशतितमोऽध्यायः ॥ २७ ॥ ॥



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

॥ श्रीगणेशाय नमः ॥ ॥ अहो सकळ श्रोते सज्जन ॥ ऐका कथा परम पावन ॥ वैकुंठविहारी भगवान ॥ लक्ष्मीलागून सांगत ॥ १ ॥ प्रिये पूर्वीं कृतयुगांत ॥ सोमवंशोत्पन्न विख्यात ॥ सप्तद्वीपा पृथ्वीचा नार्थ ॥ सुमतिनामें नृप असे ॥ २ ॥ तो धर्मात्मा दाता महान ॥ शांत दांत सदाचारसंपन्न ॥ सर्वसंपद्विभूषित पूर्ण ॥ अहंकृतिहीन सर्वदा ॥ ३ ॥ सदा श्रीहरिभक्तितत्पर ॥ हरिपूजा करी निरंतर ॥ हरिकथाश्रवणीं सादर ॥ हरि-चीच करी शुश्रूषा ॥ ४ ॥ पूज्यजनांसि पूजी सतत ॥ सर्वभूतहिताविषयीं रत ॥ पुत्रवत्प्रजा पाळी समस्त ॥ एवं गुणसंपन्न असे ॥ ५ ॥ तयाची स्त्री महाभाग्यवती ॥ सर्वलक्षणसंपन्न सती ॥ तियेचें नाम सुष्ठुमती ॥ सर्व जगतीं विख्यात ॥ ६ ॥ तीं दोघेंहि भक्तिपरायण ॥ तयांसि पूर्वजन्मींचें स्मरण ॥ प्रति अधिमासीं यथाविधान ॥ पूर्वोक्त व्रतें आचरती ॥ ७ ॥ अन्नदान सदा करिती ॥ उदकदान सर्वदा देती ॥ वापी कूप तडाग बांधिती ॥ प्रासादे निर्मित असंख्यात ॥ ८ ॥ ऐसें वागतां निरंतर ॥ कीर्ति पसरली त्रैलोक्यभर ॥ एकदां आंगिरस ऋषी-श्वर ॥ तयां पहावया निघाला ॥ ९ ॥ सवें असती शिष्य बहुत ॥ राजगृहा आला अवचित ॥ पाहूनि राव स्वस्त्रीसहित ॥ सामोरा त्वरित पावला ॥ १० ॥ उभयतीं मुनीसि वंदुनी ॥ आणूनि बैसविलें सिंहासनीं ॥ आणि पाद्यादि उपचारांनीं ॥ भक्तिभावें पूजिलें ॥ ११ ॥ शिरीं वंदूनि पादोदकाला ॥ राव नीचासनीं बैसला ॥ जोडूनियां हस्तकमळाला ॥ बोलूं लागला सादर ॥ १२ ॥ सुमति म्हणे हो मुनिवरा ॥ तुमचें येणें झालें मम घरा ॥ याचिये योगें आजि मी बरा ॥ कृतकृतार्थ जाहलों ॥ १३ ॥ सज्जनागमन सुखकारक ॥ ऐसें बोलती संतलोक ॥ जेथें संतांचें प्रेम अधिक ॥ संपदा सकळिक येत तेथें ॥ १४ ॥ संतप्रेमें सत्कीर्ति चढे ॥ संतप्रेमें बहु धन जोडे ॥ संतप्रेमें संतति वाढे ॥ दुर्बुद्धि मोडे सत्प्रेमें ॥ १५ ॥ जे सद्धर्में वर्तती सतत ॥ त्यांवरि दया करिती संत ॥ संतजनांपरि दयावंत ॥ नाहीं त्रिजगांत कोणीही ॥ १६ ॥ संतपादोदक शिरीं धरिती ॥ ते सुस्नातचि सकळ तीर्थीं ॥ तयांपरि पुण्यात्मे जगतीं ॥ नाहीं निश्चिती जाणिजे ॥ १७ ॥ ऐसे तुम्ही संत महान ॥ तुमचें

१ स्वामी ( राजा ). २ इंद्रियदमन करणारा. ३ अहंकाररहित. ४ पतिव्रता. ५ देवालयें. ६ संतांच्या पायांचें तीर्थ.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

झालें मज दर्शन ॥ म्हणोन आज मजसमान ॥ नसे धन्य कोणीच ॥ १८ ॥ मम पुत्र दारा[1] संपत्ती ॥ आणि देहहि अर्पिला तुम्हांप्रती ॥ तरी कोणकार्या योजूनि चित्तीं ॥ आगमन केलेंती सांगिजे ॥ १९ ॥ स्वामी जैशी कराल आज्ञा ॥ तैसा मी वर्तेन जाणा ॥ तरी कृपा करूनि करुणाघना ॥ कांहीं आज्ञा कीजिये ॥ २० ॥ ऐसें रायाचें नम्र भाषित ॥ ऐकूनि मुनि अति हर्षित ॥ तयाच्या अंगीं फिरवूनि हात ॥ बोले उचित ऐक तें ॥ २१ ॥ मुनि म्हणे राया तूं सांप्रत ॥ बोलिलासि तें तुज उचित[2] ॥ विनययुक्त सज्जनाप्रत ॥ श्रेयं[3] समस्त लाभतें ॥ २२ ॥ धर्म अर्थ काम मोक्ष ॥ विनयें लाभती प्रत्यक्ष ॥ विनयें होय लोकाध्यक्ष[4] ॥ विनयें लाभे सर्वही ॥ २३ ॥ विनयें नाहीं लाभत ॥ ऐसें काय आहे जगांत ॥ राया तव विनयें मजप्रत ॥ आनंद बहुत झाला असे ॥ २४ ॥ सर्वदा असो तव कल्याण ॥ हें मम अमोघ[5] आशीर्वचन ॥ राया मी तुज करितों प्रश्न ॥ तयाचें उत्तर सांग मज ॥ २५ ॥ तूं सदा सदाचाररत ॥ सर्वैश्वर्यसंपन्न सुशोभित ॥ आणि ही तव भार्या सतत ॥ व्रतें बहुत करिताहे ॥ २६ ॥ ऐसा तुम्हांसि विलोकून ॥ मज संतोष झाला महान ॥ म्हणोन राया तुजलागुन ॥ प्रश्न करित आहें मी ॥ २७ ॥ श्रीहरीची व्हावया प्रीति ॥ व्रतादि उपाव बहुत असती ॥ परी कवणें ही ऐशी तुज प्राप्ती ॥ झाली तें मज सांगिजे ॥ २८ ॥ ऐसें ऋषीचें वचन ऐकुनी ॥ सुमति राजा हस्त जोडुनी ॥ म्हणे हो मुनींद्रा मज-लागुनी ॥ जें कां तुम्ही प्रश्निलेंती ॥ २९ ॥ तें आमुचें अद्भुत चरित ॥ तुम्हां सांगतों ऐका समस्त ॥ मुनिवर्या मी पूर्वजन्मांत ॥ वीरनामा वैश्य होतों ॥ ३० ॥ तैं म्यां पापें केलीं बहुत ॥ विप्रद्रव्यें हरावीं सतत ॥ सदा कुमार्गाठायीं निरत ॥ लोकांचें अहित करावें ॥ ३१ ॥ सर्वजनांची निंदा करावी ॥ देवां द्वेषूनि तद्द्रव्यें[6] हरावीं ॥ निष्ठुर वाक्यें नित्य बोलावीं ॥ गोविप्रवध आचरावे ॥ ३२ ॥ बहु वेश्या भोगाव्या सतत ॥ प्राणिमात्राचा करावा घात ॥ ऐसा सदा असतां वर्तत ॥ काळ बहुत लोटला ॥ ३३ ॥ वडिलार्जित गेलें वतन ॥ बंधूंनीं दवडिलें घरांतून ॥ आप्त मित्र सुहज्जन ॥ मजशीं कोणी बोलेना ॥ ३४ ॥ गांवांत कोणी आपुल्या द्वारीं ॥ क्षणमात्र

१ स्त्री. २ योग्य. ३ कल्याण. ४ लोकांत प्रमुख. ५ व्यर्थ न होणारें. ६ देवांचीं द्रव्यें.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

मज उभा न करी ॥ तैं मी दुःखित होऊनी अंतरीं ॥ वनांतरीं प्रवेशलों ॥ ३५ ॥ तेथें मार्ग निरोधून ॥ वाटसरूंसि पीडीं जाण ॥ नाना मृग पक्षि मारून ॥ मांस भक्षण करीं पैं ॥ ३६ ॥ परी तेंहि न मिळे पोटभर ॥ रात्रंदिन असे क्षुधातुर ॥ ऐसा निर्जनवनाभीतर ॥ दुःखें फार गांजलों ॥ ३७ ॥ एकदां क्षुधातृषेनें पीडित ॥ फिरतां फिरतां निर्जनवनांत ॥ श्रीविष्णूचें मंदिर तेथ ॥ जीर्ण अत्यंत देखिलें ॥ ३८ ॥ तत्सन्निध रमणीय सुंदर ॥ एक होतें सरोवर ॥ जयाच्या तीरीं द्विजवरें ॥ राजहंसादि विहरंती ॥ ३९ ॥ तेथें म्यां जाऊनि त्वरित ॥ उदक प्राशिलें तृप्तिपर्यंत ॥ तेणें जाऊनि श्रम समस्त ॥ तत्तीरीं स्वस्थ बैसलों ॥ ४० ॥ तंव ही मत्कांता सुष्ठुमती ॥ त्याजन्मींहि मद्भार्याच होती ॥ इयेचें कुलीना ऐसें तेथीं ॥ नाम असे विख्यात ॥ ४१ ॥ तैं माझ्या मागें बंधुजनांनीं ॥ इयेसि दवडिलें घरांतूनी ॥ कोठें न मिळे अन्नपाणी ॥ शरीरें जीर्ण जाहली ॥ ४२ ॥ क्षुधातृषाक्रांत सतत ॥ मम दुष्कर्में आठवित ॥ दुःखें सर्वत्र फिरत फिरत ॥ निर्जन वनांत प्रवेशली ॥ ४३ ॥ जेथें मी बैसलों होतों स्वस्थ ॥ तेथें ही दैवें आली अवचित ॥ इयेसि पाहूनियां दुःखित ॥ दया मजप्रत उपजली ॥ ४४ ॥ मग वनफळें आणि पाणी ॥ म्यां दीधलें इयेलागुनी ॥ तेणें ही गतश्रम होउनी ॥ मत्सन्निधानीं बैसली ॥ ४५ ॥ आणि मम दुःखें दुःखित ऐसी ॥ विनयें बोलली मजपाशीं ॥ स्वामी अद्यापि पापराशी ॥ कराया कैसे प्रवर्ततां ॥ ४६ ॥ अहो ज्ञानें किंवा अज्ञानेंकरून ॥ जे नर करिती पापाचरण ॥ ते स्वकर्मक्षयपर्यंत पूर्ण ॥ नरकीं पतन पावती ॥ ४७ ॥ महा पातकी ते समस्त ॥ आँचंद्रार्कतारापर्यंत ॥ रौरवादि घोर नरकांत ॥ राहती पचत सर्वदा ॥ ४८ ॥ पूर्वसंचित सर्व पापांची ॥ कांहीं निष्कृती न करितां साची ॥ पुनःपुन्हां पापकर्मैंची ॥ किमर्थ आतां आचरतां ॥ ४९ ॥ वेदांतपरिशीलनेंकरून ॥ होऊनियां आत्मज्ञान ॥ परब्रह्मचि होतों आपण ॥ हें सत्य असे निःसंशय ॥ ५० ॥ परी तद्धर्माचरणार्थ ॥ अज्ञ जन असती असमर्थ ॥ म्हणोनि आर्यनियतधर्मा-

---

१ श्रेष्ठ पक्षी. २ क्रीडा करिती. ३ माझी स्त्री. ४ चंद्र सूर्य व नक्षत्रें आहेत तोंपर्यंत. ५ वेदांतशास्त्राच्या अभ्यासानें. ६ आर्यजनांस उचित अशा धर्माला.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

प्रत ॥ सांगत्यें यथार्थ ऐकिजे ॥ ५१ ॥ अंतकाळीं ज्याची नामवार्ता ॥ विवशपणेंहि मुखें येतां ॥ नाश होऊनि सर्व दुरिता ॥ सालोक्यता लाभते ॥ ५२ ॥ तैसीच प्राणोत्क्रमणकाळीं ॥ ऐकतां जयाची नामावळी ॥ सर्व पापें जळूनि समूळीं ॥ परमस्थान प्राप्त होय ॥ ५३ ॥ ऐसा जयाच्या नामाचा गुण ॥ तया गोलोकनाथालागुन ॥ भक्तिभावें सेवितां अनुदिन ॥ काय कीं प्राप्त न होय ॥ ५४ ॥ जे कां येती श्रीविष्णुभक्त ॥ तयांची सेवा करितां सतत ॥ होऊनि सर्व पापनिर्मुक्त ॥ भगवद्भक्ती लाधते ॥ ५५ ॥ भगवद्भक्तीनें भुक्तिमुक्ति ॥ लाभती हे जाणा निश्चिती ॥ हरिभक्तांच्या सेवेची ख्याति ॥ असे त्रिजगतीं साचार ॥ ५६ ॥ मुहूर्त अथवा अर्ध मुहूर्त ॥ जो कां बैसे हरिमंदिरांत ॥ तयाचे सर्व पापपर्वत ॥ विरोनियां जातात पैं ॥ ५७ ॥ श्रीहरिमंदिरांत जे कोण ॥ करिती सडासंमार्जन लेपनं ॥ तयांसि इह परत्र संपूर्ण ॥ उत्तम फळ लाभतें ॥ ५८ ॥ इत्यादिक सद्धर्म बहुत ॥ वांच्छित फलदाते आहेत ॥ तैसेंचि म्यां अधिमासव्रत ॥ सविस्तर ऐकिलें असे ॥ ५९ ॥ तयाच्या आचरणें तत्काळ ॥ भुक्ति मुक्ति लाभती सोज्वळ ॥ तुम्हां कल्याणाची इच्छा असेल ॥ तरी तें निर्मळ आचरावें ॥ ६० ॥ ऐसें इयेचें वाक्य ऐकुनी ॥ तैसाचि निश्चय केला मनीं ॥ पूर्वोक्त सर्व सद्धर्माचरणीं ॥ यथाशक्ति मी प्रवर्तलों ॥ ६१ ॥ यथाशक्ति अधिमासव्रत ॥ आमरण केलें स्त्रीसहित ॥ तत्प्रभावें पूर्वजन्मार्जित ॥ पापें समस्त लोपलीं ॥ ६२ ॥ आणि ह्या राजकुलीं जननं ॥ तेणेंचि लाभलें आम्हांलागुन ॥ तैसेंचि पूर्वजन्मींचें स्मरण ॥ असे आम्हां उभयतां ॥ ६३ ॥ म्हणोनि आम्ही अधिमासाचें ॥ सामर्थ्य जाणोनियां साचें ॥ येथेंहि त्या अधिमासव्रताचें ॥ आचरण करितों सर्वदा ॥ ६४ ॥ तेणें हें ऐश्वर्य सकळ ॥ प्राप्त झालें असे निर्मळ ॥ आणि तेणेंचि ही बुद्धि सोज्वळ ॥ जाहली जाण मुनींद्रा ॥ ६५ ॥ श्रीहरी म्हणे गे सिंधुनंदिनी ॥ ऐसा सुमतिराजापासुनी ॥ अधिमासमहिमा ऐकुनी ॥ आंगिरसमुनी आनंदला ॥ ६६ ॥ मग राजाचा निरोप घेऊनी ॥ मुनी पावला स्वस्थानीं ॥ पुढें राव स्त्रीसहवर्तमान ॥ तैसेंचि व्रत करीतसे ॥ ६७ ॥ तेणेंयोगें तो जन्मपर्यंत ॥ सुख भोगूनियां अत्यंत ॥ अंतीं

१ असावधपणानें, सहज. २ सारविणें. ३ मरेतोंपर्यंत. ४ जन्म.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

स्वराष्ट्रीय लोकांसहित ॥ गोलोकाप्रत पावला ॥ ६८ ॥ इंदिरे ऐसा अधिकमास ॥ पुण्यकारक आहे विशेष ॥ आणि सकळ वांच्छितार्थांस ॥ सर्वकाळ पुरवितो ॥ ६९ ॥ म्हणोनि भगवद्भक्तजनीं ॥ यथाशक्ति सद्भावेंकरुनी ॥ अधिमासव्रतानुष्ठानीं ॥ प्रवर्तिजे साक्षेपें ॥ ७० ॥ तेणें यथोक्त फळें समस्त ॥ प्राप्त होती जाण निश्चित ॥ अधिमाससमान जगांत ॥ अन्य तारक नसेची ॥ ७१ ॥ इंदिरे त्वां जें पुशिलें मजसी ॥ तें तें म्यां सर्व कथिलें तुजसी ॥ आदि कवि श्रीवाल्मीकि ऋषी ॥ दृढधन्व्यासी बोलत ॥ ७२ ॥ हे महाभाग्यवंता नृपाळा ॥ तुवां मज जो प्रश्न केला ॥ कीं पुरुषोत्तममासाला ॥ कवणें प्रकारें सेवावें ॥ ७३ ॥ त्यांत कोणाची पूजा करावी ॥ कोणतीं दानें कधीं द्यावीं ॥ कोणतीं कर्में आचरावीं ॥ कैसा विधि तयांचा ॥ ७४ ॥ त्या प्रश्नाचें उत्तर तुजसी ॥ रमाविष्णुसंवादरूपेंसी ॥ विवरूनियां विस्तरेंसी ॥ कथिलें असे साचार ॥ ७५ ॥ राया अधिकमाससम ॥ कांहींच नाहीं पावनतम ॥ तयाचा स्वामी पुरुषोत्तम ॥ म्हणोनि परम श्रेष्ठ तो ॥ ७६ ॥ त्यांत यथोक्त व्रत ॥ करितां ॥ कीं अन्यहि कर्में आचरतां ॥ दुरितक्षय होऊनि सर्वथा ॥ इहपरत्रीं सुख होय ॥ ७७ ॥ यास्तव सकळ नारीनरीं ॥ पुरुषोत्तममासामाझारीं ॥ उक्त कर्मांतूनि एक तरी ॥ यथोक्त कर्म कीजिये ॥ ७८ ॥ ऐसें बोलून वाल्मीकि मुनी ॥ उगाच राहिला असतां क्षणी ॥ स्त्रीसह रायें आनंदोनी ॥ पूजन केलें तयाचें ॥ ७९ ॥ तें स्वीकारूनि तो मुनिवर ॥ आशीर्वाद देत सादर ॥ म्हणे गा राया निरंतर ॥ असो तुझें सुकल्याण ॥ ८० ॥ आतां मी जातों शरयूप्रति ॥ बोलतां सायंकाळ झाला अती ॥ ऐसें बोलूनि त्वरितगती ॥ वाल्मीकि चालता जाहला ॥ ८१ ॥ तया बोळवित राव वहिला ॥ ग्रामसीमेपर्यंत गेला ॥ मग वंदूनियां तच्चरणांला ॥ परत आला गृहासी ॥ ८२ ॥ आणि स्वकांता जी गुणसुंदरी ॥ तियेसि म्हणे गे प्रिये सुंदरी ॥ ह्या असार संसारामाझारीं ॥ काय कीं सुख मानवा ॥ ८३ ॥ जैसें मिथ्या गंधर्वनगर ॥ तैसाचि हा संसार असार ॥ कामादि सहा शत्रु क्रूर ॥ घातुक यांत वसताती ॥ ८४ ॥ आणि हें तों शरीर सगळें ॥ मलमूत्रादिकीं असे भरलें ॥ वातपित्त



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

कफांचे उमाळे ॥ यांत चालले आहेत ॥ ८५ ॥ हें केवळ अध्रुव जाण ॥ याचें मज काय प्रयोजन ॥ जन्म साफल्य कीजे आपण ॥ ऐसें मन झालें असे ॥ ८६ ॥ तरी सोडूनि संसारासी ॥ स्मरत श्रीपुरुषोत्तमासी ॥ अविनाशपद संपादण्यासी ॥ जातों वनासि मी आतां ॥ ८७ ॥ ऐसी रायाची ऐकूनि वैखरी ॥ महासाध्वी गुणसुंदरी ॥ मस्तक ठेवूनि चरणांवरी ॥ हस्त जोडुनी विनवित ॥ ८८ ॥ म्हणे हो राया प्राणनाथा ॥ मीहि संगें येतें आतां ॥ पतिव्रतांची मुख्य देवता ॥ पतिच तत्वतां असे पैं ॥ ८९ ॥ पति वनवासा गेलियावरी ॥ स्नुषा-धीन जी राहे घरीं ॥ ती परवेश्मस्थ शुनीपरी ॥ होय निर्धारीं सर्वथा ॥ ९० ॥ तनय बंधु आणि जनक ॥ मितचि देऊनि होती पोषक ॥ आणि अमितदाता तो देख ॥ भर्ताचि एक असे पां ॥ ९१ ॥ तस्मात् भर्त्यासि अनुसरोन ॥ वर्तणार नाहीं साध्वी कोण ॥ ऐसें राणीचें ऐकून वचन ॥ राव अत्यंत आनंदला ॥ ९२ ॥ आणि पाचारूनि प्रजा समस्त ॥ राज्यीं स्थापिला ज्येष्ठ सुत ॥ मग तो राजेंद्र पत्नीसहित ॥ तेथूनि त्वरित निघूनियां ॥ ९३ ॥ महर्षिसेवित पुण्यवनासी ॥ जाता झाला आनंदेंसी ॥ ऐसें श्रीमन्नारायणऋषी ॥ नारदासि कथिते जाहले ॥ ९४ ॥ इति श्रीअधिकमासमाहात्म्यसार ॥ बृहन्नारदीयपद्माधार ॥ सज्जन श्रोते ऐकोत चतुर ॥ अष्टाविंशतितमाध्याय गोड हा ॥ २८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

॥ इति अष्टाविंशतितमोऽध्यायः ॥ २८ ॥

---

१ नाश पावणारें. २ वाणी. ३ सुनेच्या स्वाधीन. ४ दुसऱ्याच्या घरांत राहणारी. ५ कुत्रीप्रमाणें. ६ थोडेंच. ७ पुष्कळ देणारा.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

॥ श्रीगणेशाय नमः ॥ ॥ पूर्वाध्यायीं दृढधन्वनरेश ॥ राज्यीं स्थापूनियां पुत्रास ॥ स्वपत्नीसह गेला वनास ॥ ऐशी कथा जाहली ॥ १ ॥ आतां पुढील वृत्तांत ॥ सांगतों तो ऐका समस्त ॥ नारायणमुनि नारदाप्रत ॥ प्रेमें कथित साक्षेपें ॥ २ ॥ म्हणे गा नारदा ब्रह्मात्मजा ॥ मग तो दृढधन्वमहाराजा ॥ पुढें जातां जातां सहजां ॥ गंगातीरीं पावला ॥ ३ ॥ तें परम पवित्र स्थान ॥ पाहूनि तेथेंचि राहिला जाण ॥ उभयतां त्रिकाळ गंगास्नान ॥ नित्य नेमान करूनियां ॥ ४ ॥ स्वधर्मकृत्य सर्व सारूनी ॥ रमत असती भगवद्ध्यानीं ॥ कंद मूल फळें भक्षुनी ॥ उपजीविका चालवित ॥ ५ ॥ ऐसे लोटतां कित्येक दिवस ॥ आला श्रीपुरुषोत्तममास ॥ जो साक्षात् पुरुषोत्तमास ॥ प्रिय विशेष असे पैं ॥ ६ ॥ तैं त्यामाजीं यथाविधान ॥ चालविलें तपोनुष्ठान ॥ पुरुषोत्तमासि रात्रंदिन ॥ अंतरीं स्मरत दोघेंही ॥ ७ ॥ त्यांत तो स्वयें राजेश्वर ॥ ऊर्ध्वबाहु निराधार ॥ एकेचि पादांगुष्ठावर ॥ सदा उभा राहूनियां ॥ ८ ॥ दृष्टि लावूनि आकाशांत ॥ मुखें श्रीकृष्णनाम वदत ॥ निराहार ऐसा सतत ॥ व्रत करित साक्षेपें ॥ ९ ॥ तेव्हां तयाची ती कांता ॥ गुणसुंदरी महापतिव्रता ॥ पतीच्या सेवेमाजीं सर्वथा ॥ तत्पर असती जाहली ॥ १० ॥ ऐसें करितां तपोनुष्ठान ॥ अधिमास झाला संपूर्ण ॥ तंव तेथें आकाशांतून ॥ दिव्य विमान पातलें ॥ ११ ॥ नाना रत्नांच्या दिव्य कांती ॥ त्यांहीं प्रकाशली वनंक्षिति[1] ॥ स्वर्णकिंकिणी[2] रुणझुण वाजती ॥ माजी नाचती देवांगना ॥ १२ ॥ पुण्यशील सुशीलाभिधान ॥ आंत असती पुरुष दोन ॥ ऐसें तें सुंदर देवयान[3] ॥ अकस्मात पातलें ॥ १३ ॥ तया पाहूनि दृढधन्वराय ॥ पत्नीसह झाला साश्चर्य ॥ आणि त्या दिव्यपुरुषांचे पाय ॥ प्रेमें तत्काळ वंदिले ॥ १४ ॥ मग त्या सुशीलपुण्यशीलांनीं ॥ तीं उभयतां राजाराणी ॥ सत्कारपूर्वक त्या विमानीं ॥ स्वहस्तीं धरूनि बैसविलीं ॥ १५ ॥ तैं तें विमान आकाशमार्गें ॥ उपरि चाललें मनोवेगें ॥ तों राजाराणींचीं सर्वांगें ॥ परम दिव्य जाहलीं ॥ १६ ॥ स्वर्गादि लोकां अति क्रमुनी ॥ विमान गेलें गोलोकालागुनी ॥ पुरुषोत्तमाच्या सन्निधानीं ॥ राजाराणी पावलीं ॥ १७ ॥ ऐसा तो दृढधन्वा भूप ॥



१ अरण्यासंबंधीं पृथ्वी. २ सुवर्णाच्या घंटा. ३ विमान.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

अधिमासीं आचरला तप ॥ तेणें होऊनि दिव्यस्वरूप ॥ गोलोकाप्रत पावला ॥ १८ ॥ आणि तो तप करित असतां ॥ तत्पत्नी जी पतिव्रता ॥ तिणें पतीची सेवा सर्वथा ॥ केली असे अधिमासीं ॥ १९ ॥ तेणें पुण्यें ती राणीहि तत्क्षण ॥ गोलोकाप्रत पावली जाण ॥ नारदा मी अधिमासाचें पुण्य ॥ काय वर्णूं एकमुखें ॥ २० ॥ पुरुषोत्तममासासम ॥ जगीं नाहीं कांहींच उत्तम ॥ त्याचा स्वामी श्रीपुरुषोत्तम ॥ म्हणोन परम श्रेष्ठ तो ॥ २१ ॥ अधिकमासालागीं सेवितां ॥ जें अत्युत्तम फळ ये हाता ॥ तें सहस्त्रजन्महि तप करितां ॥ प्राप्त नव्हेचि साचार ॥ २२ ॥ पुरुषोत्तममासाठायीं ॥ कोणत्याहि निमित्तें नरांहीं ॥ स्नानदानजपादि कांहीं ॥ सत्कर्म केलें असतां पां ॥ २३ ॥ तयाच्या पुण्यप्रभावेंसी ॥ कोटिजन्मकृतपापांचे राशी ॥ तत्काळ जाऊनि विलयासी ॥ गोलोकासी पावतात ॥ २४ ॥ जेवीं एके शाखामृगासी ॥ नेणतपणें अधिकमासीं ॥ पांच दिवस शीतनीरेंसी ॥ सहज स्नान घडतांच ॥ २५ ॥ त्याचीं प्राक्तनकर्में सकळ ॥ विलय पावोनि तत्काळ ॥ श्रीकृष्णापरि तो निर्मळ ॥ दिव्यदेही जाहला ॥ २६ ॥ आणि सर्वेचि विमानीं बैसून ॥ गोलोकाप्रति गेला जाण ॥ आधि व्याधि जरा मरण ॥ जेथें नसती कदाही ॥ २७ ॥ तस्मात् सर्व मासांहूनि पमर ॥ श्रेष्ठ मास पुरुषोत्तम ॥ तया न सेवी तो नराधम ॥ महामूर्ख जाणिजे ॥ २८ ॥ आणि जे त्या मासालागुनी ॥ स्नान दान जप होमांनीं ॥ तैसेच नाना व्रतनियमांनीं ॥ विधिपूर्वक सेवितात ॥ २९ ॥ ते कृतकृत्य धन्य सकळ ॥ तयांचे जन्म होऊनि सफळ ॥ इहपरलोकीं सर्वकाळ ॥ सुखचि अचळ भोगिती ॥ ३० ॥ ऐशी नारायणऋषीची वाणी ॥ ऐकून चकित नारदमुनी ॥ पुनश्च तया हस्त जोडुनी ॥ मधुरवाणीं विनवित ॥ ३१ ॥ अहो ह्या सकळ विश्वाठायीं ॥ सर्व अर्थ साधण्याविषयीं ॥ नृजन्मचि उपयोगा येई ॥ ऐसें सर्वांहीं बोलिजेतें ॥ ३२ ॥ ऐसें असतां आजि आपण ॥ कथिलें कीं व्याजस्नानेंकरून ॥ शाखामृगहि उद्धरोन ॥ मुक्त तत्क्षण जाहला ॥ ३३ ॥ तरी त्याची ती कथा समस्त ॥ मज सांगावी लोकहितार्थ ॥ तो शाखामृग कोण किमर्थ ॥ कैसा कोण कोठें उद्धवला ॥ ३४ ॥ वसत होता कवणे

१ वानर. २ थंड पाण्यानें. ३ काय म्हणून.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

देशीं ॥ स्नानें घडलीं कोठें त्यासी ॥ व्याजस्नानें अधिकमासीं ॥ काय पुण्य लाभलें ॥ ३५ ॥ तें सकळहि विस्तारून ॥ सांगावें आतां मजलागुन ॥ कथामृत आपणापासून ॥ ऐकतां धणी पुरेना ॥ ३६ ॥ ती देवर्षीची ऐकूनि वाणी ॥ तया सांगत नारायणमुनी ॥ केरळदेशामाजीं कोणी ॥ एक द्विज राहतसे ॥ ३७ ॥ तो महालोभी सर्वत्र फिरत ॥ मधुमक्षिकेपरि सतत ॥ दक्ष असे धनसंचयार्थ ॥ धनचि अत्यंत प्रिय त्यासी ॥ ३८ ॥ सदन्न[1] किंवा सद्वसन[2] ॥ कदाहि नाहीं भोगिलें तयान ॥ श्राद्ध पूजा देवकृत्य सण ॥ तेही कदा न करीच ॥ ३९ ॥ कीर्तिसाठींहि नाचरे कांहीं ॥ पोष्यवर्गेहि न पोशी कदाही ॥ अन्यायसंचित धन सर्वही ॥ पुरून ठेवी भूमींत ॥ ४० ॥ यद्यपि जाऊं लागले प्राण ॥ तरी न वेंची तयांतून ॥ व्ययाचें नाम काढितां तत्क्षण ॥ तयाचे प्राण घुटवळती ॥ ४१ ॥ ऐसा तो कृपण अत्यंत ॥ म्हणोनि त्यासी कदर्य म्हणत ॥ तयाचें नाम पितृकल्पित[4] ॥ चित्रशर्मा ऐसें असे ॥ ४२ ॥ माघमहिन्यांत तिलदान ॥ कार्तिकमासीं दीपदान ॥ वैशाखामाजीं धान्यदान ॥ स्वर्णदान व्यतिपातीं ॥ ४३ ॥ रजतदान वैधृतिदिनीं ॥ सर्वदानें रविसंक्रमणीं[5] ॥ आणि अन्यहि दानें अन्य पर्वीं ॥ पुण्यकारक आहेत ॥ ४४ ॥ परी त्यांतूनि तयें कधींही ॥ एकहि दान केलें नाहीं ॥ आणि चंद्रसूर्यग्रहण-समयीं ॥ जपादि कांहींच नाचरिलें ॥ ४५ ॥ कैशीहि पर्वणी आली तरी ॥ स्वयें सत्कर्म कांहीं न करी ॥ महा पापात्मा दुराचारी ॥ धनचि अंतरीं चिंतित ॥ ४६ ॥ अंगावरी न घे वसन ॥ वर्षशीतातप[6] करी सहन ॥ सर्वांग जर्जर कृष्ण मळिण ॥ पाहतां मन कंटाळे ॥ ४७ ॥ धनलोभें भूतळीं फिरत ॥ जो जो भेटे तयासि याचित ॥ मुखें दीनवाणी वदत ॥ पाणी काढित नेत्रांतुनी ॥ ४८ ॥ रडत रडत वारंवार ॥ नगरीं हिंडे दारोदार ॥ गोदो-हनमात्रकाळभर ॥ कोठेंही स्थिर न राहे ॥ ४९ ॥ ज्यांच्या सन्निध जाई ॥ ते ते धिक्कारिती सर्वही ॥ तेणें उद्विग्न होऊनि सदाही ॥ हिंडत राही सर्वत्र ॥ ५० ॥ ऐसा तो नष्ट कदर्य देख ॥ तयाचा मित्र कोणी एक ॥

---

१ इच्छा. २ चांगलें अन्न. ३ चांगलें वस्त्र. ४ त्याच्या बापानें ठेविलेलें. ५ सूर्यसंक्रातीच्या दिवशीं. ६ पाऊस, थंडी व ऊन.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

माळाकार[1] वाटिकानायक[2] ॥ वाटिकेमाजी राहतसे ॥ ५१ ॥ तेथें तो कदर्य जाऊन ॥ वारंवार करित रुदन ॥ आपलें दुःख त्या मित्रालागुन ॥ संपूर्ण कथिता जाहला ॥ ५२ ॥ म्हणे गा सखया करूं काय ॥ आतां न चले माझा उपाय ॥ दुर्भाग्याचा झाला उदय ॥ दुःखें हृदय कढताहे ॥ ५३ ॥ नगरवासी जन समस्त ॥ मज तिरस्कारिती सतत ॥ यास्तव आतां त्या नगरांत ॥ वसाया समर्थ मी नव्हे ॥ ५४ ॥ कोठें भिक्षा मागूनि पाहीं ॥ जरी शुष्कान्न[3] मिळविलें कांहीं ॥ तरी तें पकाया स्थळ नाहीं ॥ म्हणोन उपाशी मरताहें ॥ ५५ ॥ पुढें कर्तव्य न सुचे एक ॥ माझीं मेटें बसलीं देख ॥ तें तयाचें दीन वाचिक ॥ ऐकूनियां सर्वही ॥ ५६ ॥ तो माळाकार वाटिकानाथ ॥ कृपें कळवळला अत्यंत ॥ आणि तया मानूनि शरणागत ॥ दया करिता जाहला ॥ ५७ ॥ म्हणे कदर्या तूं सांप्रत ॥ सुखें राहें या वाटिकेंत ॥ ऐसें मित्राचें ऐकूनि भाषित ॥ कदर्य अत्यंत आनंदला ॥ ५८ ॥ आणि त्याच दिवसापासून ॥ तेथें वसता झाला जाण ॥ सतत माळ्यानिकट राहून ॥ आज्ञा पाळित तयाची ॥ ५९ ॥ आणि तो जें जें काम सांगे ॥ तें करूनि दावी वेगें ॥ रात्रंदिन झटूनि स्वांगें ॥ वाटिकेलागीं रक्षित ॥ ६० ॥ तेणें योगें तो माळाकार ॥ विश्वासला कदर्यावर ॥ बहुतेक सर्व कारभार ॥ तयाहातीं ओपिला ॥ ६१ ॥ आपुलिया हाताखालतीं ॥ तयासि केला वाटिकापती ॥ सर्वात्मभावें तयावरुती ॥ जडली प्रीति अत्यंत ॥ ६२ ॥ जैसा बंधु किंवा तनय[4] ॥ तैसाच हा आपला कदर्य ॥ ऐसा अंतरीं केला निश्चय ॥ सर्व संशय सोडिला ॥ ६३ ॥ मग सकळ चिंता टाकून ॥ राजगृहा गेला माळी आपण ॥ तेथेंच तयास कार्य[5] मिळोन ॥ सदा रहावें लागलें ॥ ६४ ॥ तैं पराधीनपणें त्या माळ्यास ॥ मिळेना वाटिकेंत जायास ॥ परी कदर्यावरी दृढ विश्वास ॥ म्हणोन निश्चिंत असे तो ॥ ६५ ॥ इकडे कदर्य काय करित ॥ पक्वफळें काढूनि समस्त ॥ स्वयें आनंदें यथेच्छ भक्षित ॥ उरलीं टाकित विकूनियां ॥ ६६ ॥ तयांचें जें कां द्रव्य येई ॥ तें सर्व गाडी भूमीठायीं ॥ अंतरीं पापाची भीति नाहीं ॥ सर्वदा राही निःशंक ॥ ६७ ॥ जेव्हां केव्हां पक्षमासांतीं ॥

१ माळी. २ वाडीचा ( बागेचा ) धनी. ३ कोरान्न. ४ पुत्र. ५ काम.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

वाटिकेंत येऊनि वाटिकापती ॥ फळार्थ पृच्छी त्या कदर्याप्रती ॥ तैं तो तयातें सांगत ॥ ६८ ॥ मी तों नित्य नगरीं फिरोन ॥ भिक्षान्नेंचि पोट भरून ॥ तुझी वाटिका रात्रंदिन ॥ रक्षिताहें साचार ॥ ६९ ॥ तथापि दुष्ट पक्षी सांप्रत ॥ बहुतेक फळें भक्षितात ॥ त्यांतील कित्येक पक्षी येथ ॥ म्यां मारूनियां टाकिले ॥ ७० ॥ तयांचीं मांसें आणि पिसारें ॥ सर्वत्र पडले हें पाहें सारे ॥ ऐसें बोलूनि तेणें स्वकरें ॥ दाविलें त्वरें उचलूनियां ॥ ७१ ॥ तें पाहूनि तो वाटिकापती ॥ मालाकार त्या कदर्यावरती ॥ पूर्वींपेक्षेंहि विश्वासुनि अती ॥ निघोनि जाता जाहला ॥ ७२ ॥ तैं पासुनि तो दुष्ट कदर्य ॥ अत्यंताचि होऊनि निर्भय ॥ पूर्वींहूनिहि अधिक चौर्य ॥ करूं लागला साक्षेपें ॥ ७३ ॥ ऐसा क्रम चालतां सतत ॥ संवत्सर लोटले बहुत ॥ कदर्याचा आयुष्यांत ॥ सन्निध प्राप्त जाहला ॥ ७४ ॥ सत्यांयशीं वर्षें झालीं पूर्ण ॥ तों तो कदर्य पावला मरण ॥ तयाच्या जीवात्म्यासि बांधून ॥ यमदूत घेऊन चालले ॥ ७५ ॥ वाटिकेमाजीं राहिलें प्रेत ॥ कोणीच मनुष्य नाहीं तेथ ॥ कोण तयासि अग्नि देत ॥ ठायींच कुजलें सर्वही ॥ ७६ ॥ असो पापाची दारुणगती ॥ भोगिल्याविण न चुके ती ॥ ऐसें वेदवेत्ते बोलती ॥ त्याची प्रचीति ॥ आली तया ॥ ७७ ॥ ते यमधर्माचे दूत क्रूर ॥ जीवासि ताडित वारंवार ॥ मुद्गरांचा मार कठोर ॥ यातना घोर सोसवेना ॥ ७८ ॥ तैं तो जीवात्मा हाहा करित ॥ कृतकर्मासि आठवित ॥ म्हणे हो हें माझें अद्भुत ॥ केवढें पहा अज्ञान ॥ ७९ ॥ देवांसिहि दुर्लभ परम ॥ जें भरतखंडीं नरजन्म ॥ तें मज येथें अत्युत्तम ॥ प्राप्त झालें असूनियां ॥ ८० ॥ धनलोभें म्यां काय केलें ॥ सर्व जन्म व्यर्थ दवडिलें ॥ चिरंकालार्जित तें सगळें ॥ धनहि ठेविलें भूमींत ॥ ८१ ॥ आतां मी झालों पराधीन ॥ काळपाशीं पावलों बंधन ॥ मानवजन्मातें पावून ॥ कांहींच पुण्य नाचरलों ॥ ८२ ॥ कधींच दान न दिलें कांहीं ॥ अग्नींत हवन केलें नाहीं ॥ बैसोनि पुण्यवनाठायीं ॥ तपहि नाहीं आचरिलें ॥ ८३ ॥ मकरमासामाझारीं ॥ न्हालों नाहीं गंगानीरीं ॥ कीं अधिकमासांतीं त्रिदिन तरी ॥ नाहींच केले उपवास ॥ ८४ ॥ कार्तिकस्नानहि नाहीं केलें ॥

१ पुसे. २ पुष्कळ दिवसांपासून मिळविलेलें.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

शरीरहि नाहीं पोशिलें ॥ कष्टार्जित द्रव्यहि वहिलें ॥ व्यर्थ घातलें भूमींत ॥ ८५ ॥ जीवासि कष्टविलें सदाही ॥ कधीं सुवस्त्र नेसलों नाहीं ॥ नानाविध अन्नीं कदाही ॥ जठराग्नि नाहीं शांतविला ॥ ८६ ॥ ज्ञाति बांधव स्वजन ॥ भाचे मामे जामात नंदन ॥ पिता माता अनुज ब्राह्मण ॥ सती पत्नी आणि कन्या ॥ ८७ ॥ यांस म्यां जन्मांत एकदांही ॥ मिष्टान्न जेवूं घातलें नाहीं ॥ मजसम ह्या त्रैलोक्याठायीं ॥ महामूर्ख कोण आहे ॥ ८८ ॥ ऐसा कदर्य विलपे बहुत ॥ यमदूत तयासि ओढित नेत ॥ वायुवेगें मार्ग क्रमित ॥ यमपुरींत पावले ॥ ८९ ॥ आणि जेथें साक्षात्सूर्यतनय ॥ बैसला होता धर्मराय ॥ तयांपुढें तो दुष्ट कदर्य ॥ पाशबद्ध उभा केला ॥ ९० ॥ तया पाहुनियां कृतांत ॥ पुसता झाला चित्रगुप्ताप्रत ॥ ती कथा रसाळ समस्त ॥ पुढच्या प्रसंगीं वर्णिजेल ॥ ९१ ॥ इति श्रीअधिकमासमाहात्म्यसार ॥ बृहन्नारदीयपद्माधार ॥ सज्जनश्रोते ऐकोत चतुर ॥ एकोनत्रिंशत्तमाध्याय गोड हा ॥ २९ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

॥ इति एकोनत्रिंशत्तमोऽध्यायः ॥ २९ ॥



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

॥ श्रीगणेशाय नमः ॥ ॥ यम म्हणे चित्रगुप्तालागुन ॥ अरे हा आणिला आहे कोण ॥ याचें शुभाशुभ विलोकून ॥ सांगें संपूर्ण सत्वर ॥ १ ॥ ती यमधर्माची ऐकूनि वाणी ॥ चित्रगुप्त म्हणे तयालागुनी ॥ अहो प्रभो हा कदर्य म्हणोनी ॥ द्विजाधम पैं आहे ॥ २ ॥ हा धनलोभी दुष्ट अत्यंत ॥ याचें नाहीं कांहींच सुकृत[1] ॥ याणें वाटिकेंत[2] राहूनि सतत ॥ पापचि बहुत केलें असे ॥ ३ ॥ वाटिकापतीचा[3] विश्वास ॥ याचियेवरी असोनि विशेष ॥ तेथील नाना फळें अशेष[4] ॥ धनलोभें चोरूनियां ॥ ४ ॥ पक्क तितुकीं भक्षी आपण ॥ उरतील तीं टाकी विकून ॥ आणि द्रव्य येई तें संपूर्ण ॥ ठेवी पुरून भूमींत ॥ ५ ॥ ऐसा हा धनलोभी अती ॥ ह्याचीं अत्युग्रपापें दोन असती ॥ एक फलचौर्यकृत निरुती ॥ दुसरें विश्वासघातज ॥ ६ ॥ आणि ह्यांवांचूनिहि बहुत ॥ ह्याचीं पापें विविध[5] आहेत ॥ ऐसें चित्रगुप्ताचें भाषित ॥ ऐकूनि कृतांत[6] कोपला ॥ ७ ॥ आणि म्हणे रे चित्रगुप्ता ॥ सांगतों तैसें करीं आतां ॥ यासि सहस्रवार तत्वतां ॥ वानरजन्म देऊनियां ॥ ८ ॥ तदनंतर विश्वासघाताचें ॥ फळ भोगवूनियां साचें ॥ मग इतरहि सर्व पापांचें ॥ यथानुक्रमें भोगवीं ॥ ९ ॥ तें प्रभूचें[7] ऐकूनि भाषित ॥ तो महान्यायी चित्रगुप्त ॥ स्वांतरीं[8] विचारूनियां अत्यंत ॥ दूतांप्रत बोलत कीं ॥ १० ॥ अहो हा कदर्य अत्यधम ॥ लोभाविष्ट झाला प्रथम ॥ तदनंतर चौर्यकर्म ॥ करिता झाला साचार ॥ ११ ॥ यास्तव आधीं प्रेतत्व घोर ॥ पावोनि मग हा होवो वानर ॥ तदनंतर अति भयंकर ॥ नरकयातना भोगवाव्या ॥ १२ ॥ हाच क्रम यमधर्माच्या गृहीं ॥ श्रेयस्कर असे सर्वदाही ॥ ऐसें चित्रगुप्तें सांगतां सर्वही ॥ दूत लवलाही धांविन्नले ॥ ॥ १३ ॥ ते सर्वही अत्यंत भीषण[9] ॥ कदर्यासि करित ताडण ॥ प्रेतयोनीमाजीं तत्क्षण ॥ प्रथम टाकिते जाहले ॥ ॥ १४ ॥ तैं तो निर्जन घोरवनीं ॥ जेथें न मिळे फळ कीं पाणी ॥ तेथें भयंकर प्रेत होऊनी ॥ सर्वत्र फिरूं लागला ॥ १५ ॥ क्षुत्तृषांनीं व्याकुळ अती ॥ वारंवार तळमळे क्षितीं ॥ रडे ओरडे दिवसरातीं ॥ न सोसवे म्हणो-

१ पुण्य. २ बागेंत. ३ बागेच्या धन्याचा. ४ सर्व. ५ नानाप्रकारचीं. ६ यम. ७ धन्याचें ( यमाचें ). ८ आपल्या अंतःकरणांत. ९ भयंकर.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

नियां ॥ १६ ॥ ऐसें बहुकाळपर्यंत ॥ प्रेतयोनिगत दुःख समस्त ॥ भोगूनि मग फलचौर्यजनित ॥ कपित्वाप्रत पावला ॥ १७ ॥ दिव्य कालंजर पर्वतावर ॥ जेथें जंबुखंडं मनोहर ॥ शीतळ छाया नीरं मधुर ॥ आणि अपार फलपुष्पें ॥ १८ ॥ तेथें इंद्रनिर्मित सुरेख ॥ सत्सेव्य परम पुण्यकारक ॥ पापनाशक कुंड एक ॥ सरोवरासम आहे ॥ १९ ॥ तें सुरांसिहि दुर्लभ अत्यन्त ॥ तयाचें नाम मृगतीर्थ ॥ तेथें श्राद्ध करितां यथोक्त ॥ पितर मुक्त होताती ॥ २० ॥ दैत्यभयें सर्व सुरवरं ॥ मृग होऊनि निरंतर ॥ त्या इंद्रनिर्मित कुंडीं सादर ॥ स्नान करिते जाहले ॥ २१ ॥ तेणें ते निर्भय होऊन ॥ पुनश्च पावले स्वर्गभुवन ॥ यास्तव त्या कुंडालागुन ॥ मृगतीर्थ बोलूं लागले ॥ २२ ॥ असो ऐसें जें तीर्थ उत्तम ॥ तेथें तो कदर्य द्विजाधम ॥ फलचौर्यकृतपापें प्रथम ॥ वानरजन्म पावला ॥ २३ ॥ ऐसें नारायणाचें भाषित ॥ ऐकून साश्चर्य ब्रह्मसुतं ॥ म्हणे हो मुने तें मृगतीर्थ ॥ त्रैलोक्यपावन असोनियां ॥ २४ ॥ तेथें त्या दुष्ट पापी वानरास ॥ कैसें मिळालें रहावयास ॥ तें कारण सांगोनि अशेषं ॥ संशय माझा निरसावा ॥ २५ ॥ भवादृश गुरु स्वशिष्याप्रती ॥ गोप्य तेंहि विवरूनि सांगती ॥ ऐशी देवर्षींची ऐकूनि भारती ॥ नारायणमुनी आनंदला ॥ २६ ॥ आणि म्हणे गा नारदा ऐक ॥ प्रश्निलेंस तें सांगतों सकळिक ॥ चित्रकुंडलनामें महाधनिक ॥ कोणीएक वैश्य असे ॥ २७ ॥ आणि त्याची स्त्री पुण्यसरिता ॥ तारका नामें पतिव्रता ॥ अधिमासासि तीं उभयतां ॥ भावें सेवितीं जाहलीं ॥ २८ ॥ मासपूर्तीपर्यंत यथोक्त ॥ त्यांहीं केलें पुरुषोत्तमव्रत ॥ चरमंदिन होतां प्राप्त ॥ उद्यापन आरंभिलें ॥ २९ ॥ वेदशास्त्रसंपन्न ब्राह्मण ॥ सपत्नीक पाचारिले जाण ॥ आणि इतरहि महाविद्वान ॥ द्विज बहुत बोलाविले ॥ ३० ॥ तेव्हां तेथें तो कदर्यही ॥ धनलोभें पातला पाहीं ॥ असो मग त्या वैश्यें सर्वही ॥ पूजासंभार घेऊनियां ॥ ३१ ॥ नाना



१ प्रेतयोनींतील. २ फळें चोरल्याच्या योगानें झालेलें. ३ जांभळीच्या झाडांची दाटी. ४ उदक. ५ सत्पुरुषांनीं सेविण्यास योग्य. ६ देव. ७ ब्रह्मदेवाचा पुत्र ( नारद. ) ८ सर्व. ९ तुमच्यासारखे. १० उघड करून. ११ वाणी. १२ महिना पूर्ण होईपर्यंत. १३ शेवटचा दिवस. १४ पूजासामुग्री.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

वाद्यांची गर्जना करित ॥ उत्सव चालविला बहुत ॥ पूजा होमहवनादि यथोक्त ॥ विधि समस्त सारिला ॥ ३२ ॥
मग सर्व दंपत्यांकारणें ॥ यथाविधि दीधलीं दानें ॥ तांबूल दक्षिणा वस्त्रें भूषणें ॥ ऋत्विजांकारणें दीधलीं ॥ ३३ ॥
तैशीच इतर ब्राह्मणांसी ॥ यथाशक्ति दीधली भूयसी ॥ तेणें ते संतोषूनि मानसीं ॥ स्वगृहा जाते जाहले ॥ ३४ ॥
परी तो महालोभी कदर्य ॥ कांहीं केल्या परत न जाय ॥ वैश्यापुढें मोकलूनि धाय ॥ रडत उभा राहिला ॥ ३५ ॥
आणि विनयें जोडूनि हात ॥ गद्गदवाणी तया बोलत ॥ हे वैश्यवर्या तूं महासमर्थ ॥ भगवद्भक्त आहेसी ॥ ३६ ॥
त्वां हें जैसें पुरुषोत्तमव्रत ॥ यथाविधी केलें सांप्रत ॥ ऐसें जगीं आजपर्यंत ॥ कोणीच नाहीं आचरिलें ॥ ३७ ॥
आणि तूं श्रीपुरुषोत्तमास ॥ परमभक्तीनें सेविलेंस ॥ तस्मात् सर्वप्रकारें विशेष ॥ भाग्यवान धन्य आहेसी ॥ ३८ ॥
आणि तव मातापितरेंही ॥ धन्य हो त्रिजगाठायीं ॥ तुजऐसा हा हरिप्रिय ज्यांहीं ॥ उत्तम पुत्र उत्पादिला ॥ ३९ ॥
आणि हा धन्यांहूनिहि विशेष ॥ धन्य आहे पुरुषोत्तममास ॥ कीं जयाच्या सेवे उभयत्र अशेष ॥ सुख सर्वांस लाभतें ॥ ४० ॥ वैश्यवर्या त्वत्कृतपूजन ॥ पाहूनि चकित झालों जाण ॥ तुवां हें महत्कर्माचरण ॥ केलें यांत संशय नसे ॥ ४१ ॥ आजि त्वां सर्व ब्राह्मणांसी ॥ बहु धन दीधलें आनंदेंसी ॥ परी मज भाग्यहीनासी ॥ कैसें नाहीं दीधलेंस ॥ ४२ ॥ मी पामर अत्यंत दीन ॥ तूं बहु धनदाता असून ॥ मज न मिळावें तुजपासून ॥ हें तुज योग्य होईल कीं ॥ ४३ ॥ ऐसें कदर्यें विनवितांक्षण ॥ वैश्यें तयासी दीधलें धन ॥ तें तो घेऊनि आनंदेंकरून ॥ पुरून ठेविता जाहला ॥ ४४ ॥ असो एवं त्या कदर्यें वहिली ॥ पुरुषोत्तमाची पूजा पाहिली ॥ आणि त्या मासाची चांगली ॥ स्तुति केली धनलोभें ॥ ४५ ॥ त्या पूर्वपुण्यें वानरास ॥ मृगतीर्थीं जाहला वास ॥ ज्यांजेंहि भजतां पुरुषोत्तमास ॥ ऐसें विशेष फळ असे ॥ ४६ ॥ ऐसें नारायणाचें ऐकूनि वचन ॥ नारद पावला समाधान ॥ आणि पुनश्च तयालागुन ॥ हात जोडूनि प्रश्नित ॥ ४७ ॥ म्हणे हो मुनींद्रा ज्याठायीं ॥ सुफळयुक्त वृक्ष सर्वही ॥ निबिड छाया सर्वत्र राही ॥ आणि सुशीतळ जळ असे ॥ ४८ ॥ ऐशा त्या रम्य वनीं निर्गुती ॥

१ हंबरडा. २ इहपरलोकीं. ३ याप्रमाणें. ४ निमित्तांतरानें. ५ खरोखर.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

त्या दुष्टकपींची व्हावया स्थिती ॥ कारण काय तें मजप्रती ॥ सांगें संप्रती मुनींद्रा ॥ ४९ ॥ तें ऐकूनि म्हणे नारायण ॥ नारदा सांगतों ऐकें कारण ॥ जयाच्या श्रवणमात्रें तत्क्षण ॥ सर्व पापक्षय होय ॥ ५० ॥ पूर्वीं श्रीरामचंद्राची कांता ॥ सीता रावणें चोरूनि नेतां ॥ श्रीरामचंद्रें झुंजोनि सर्वथा ॥ दुष्ट रावण मारिला जैं ॥५१॥ तैं त्या युद्धीं बिभीषणाविण ॥ राक्षस उरले नाहींच कोण ॥ तैसेचि बहुतेक वानरगण ॥ पावले निधनं साचार ॥ ॥ ५२ ॥ आणि रामें रावण मारिला म्हणोनी ॥ विरिंचादि सर्व सुधापांनी ॥ अंतरीं परमानंद पावुनी ॥ रामासन्निध पातले ॥ ५३ ॥ आणि म्हणत हे दाशरथे राम ॥ त्वां जो मारिला राक्षसाधम ॥ हें आम्हां सर्व सुरांचें काम ॥ अप्रतिम केलेंसी ॥ ५४ ॥ म्हणोन आम्ही झालों प्रसन्न ॥ यथेच्छ मागें वरप्रदान ॥ तें सुरांचें ऐकूनि वचन ॥ रघुनंदन बोलत ॥ ५५ ॥ अहो तुम्ही देणार वर ॥ तरी जे माझे वीर वानर ॥ राक्षसीं मारिले ते सत्वर ॥ जीवंत करूनि उठवावे ॥ ५६ ॥ ती रामाची ऐकूनि वैखरी ॥ ब्रह्मेंद्रादि सर्व सुरवरीं ॥ तथास्तु म्हणोनि वानरांवरी ॥ केला अमृतवर्षाव ॥ ५७ ॥ तेणें ते सर्व वानरगण ॥ सुप्तोत्थितांपरी उठोन ॥ जय जय श्रीराम म्हणोन ॥ रामासि वंदिते जाहले ॥ ५८ ॥ मग सीतेसहित रघुनाथ ॥ आरूढोनियां पुष्पकांत ॥ सर्वत्रस्थित वानरांप्रत ॥ ऐसें सांगता झाला कीं ॥ ५९ ॥ हे सुग्रीवा हे हनुमंता ॥ हे अंगदा हे जांबुवंता ॥ तुम्ही वानरांसह सर्वथा ॥ मित्रकार्य केलेंती ॥ ६० ॥ आतां तुम्ही ह्या वानरांसी ॥ आज्ञापा येथुनी जावयासी ॥ जेथें येईल त्यांच्या मनासी ॥ तेथें समस्त राहोत ॥ ६१ ॥ हे मम कपि चिरायुं सकळ ॥ ज्या ज्या वनांत वसतील ॥ त्या त्या वनीं वृक्ष विपुळ ॥ सदा सुफळ असतील पां ॥ ६२ ॥ आणि नद्या किंवा सरोवरें ॥ पूर्ण राहतील शीतळ नीरें ॥ आणि कोणाच्यानेंहि निकुरें ॥ धर्षिले जाणार नाहींत ॥ ६३ ॥ ऐसें रामाचें आशीर्वचन ॥ पूर्वींच झालें यालागुन ॥ ज्या ज्या स्थानीं वानर म्हणोन ॥ सदा वसत असतात ॥ ६४ ॥ तेथें तेथें नद्या सरोवरें ॥ पूर्ण राहती



१ सांप्रत. २ मरण. ३ ब्रह्मदेवादि. ४ अमृतपान करणारे ( देव ). ५ वाणी. ६ निजून उठल्याप्रमाणें. ७ दीर्घायु ( पुष्कळ वर्षें वांचणारे. ) ८ थंड पाण्यानें. ९ खचित.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

शीतळनीरें ॥ आणि महावृक्ष फलपुष्पांकुरें ॥ सुमंडित असतात ॥ ६५ ॥ एवं रामाच्या प्रभावानें ॥ वानर-
जातिमात्राकारणें ॥ सद्वृक्षवनीं वसती मिळणें ॥ साहजिक झालें असे ॥ ६६ ॥ परी सुखदुःखें तीं समस्त ॥
प्राक्तनकर्मापासूनि होत ॥ जेथें जेथें प्राणी वसत ॥ तेथें तेथें तीं येती ॥ ६७ ॥ कर्म न संपे भोगिल्याविण ॥
ऐसें असे वेदानुशासन ॥ असो पुढें तो कपि महान ॥ पर्वताऐसा वाढूनियां ॥६८॥ त्या मृगतीर्थासन्निध वनांत ॥
क्षुधातृषांनीं अति पीडित ॥ स्वजातिचापल्यें सतत ॥ सर्वत्र भ्रमूं लागला ॥ ६९ ॥ नारदा त्या वनीं निरुती ॥
फलपल्लव विपुळ असती ॥ परी त्या कपीची कर्मगती ॥ विपरीत असे पैं ॥ ७० ॥ जन्मापासूनि त्याचे वदनीं ॥
पित्तजन्य व्रण होऊनी ॥ रात्रंदिन तयांतूनी ॥ रक्तस्राव होतसे ॥ ७१ ॥ तेणें वेदना अत्यंत होई ॥ भक्षावया
न शके कांहीं ॥ आणि पीडेमुळें तया कदाही ॥ एके ठायीं राहवेना ॥ ७२ ॥ वारंवार फळें तोडून ॥ मुखा-
जवळ नेई जाण ॥ परी तीं न भक्षवती म्हणून ॥ देई टाकून भूमीवरी ॥ ७३ ॥ अशक्तता आली शरीरीं ॥
वृक्षापासूनि वृक्षांतरीं ॥ जावया श्रम होऊनि भारी ॥ सुखावह मानी मृत्यूतें ॥ ७४ ॥ कदाचित् करितां उड्डाण ॥
भूमीसि पडला वृक्षावरून ॥ सकळ गात्रें झालीं भग्न ॥ जागेवरून उठवेना ॥ ७५ ॥ जीवनांविणें मीन जैसा ॥
भूमीवरी तळमळे तैसा ॥ चहूंकडूनि आली दुर्दशा ॥ विलाप करी अत्यंत ॥७६॥ क्षुधातृषांनीं अति व्याकुळ ॥
दंतपंक्ति पडली सकळ ॥ व्रणरोगाची पीडा विपुळ ॥ सर्वकाळ रक्त गळे ॥ ७७ ॥ ऐशा पूर्वजन्मकृतपापेंसीं ॥
पावोनियां बहु दुःखासी ॥ निराहार उपवासी ॥ रात्रंदिवस तळमळे ॥ ७८ ॥ ऐसे जातां बहुत दिवस ॥ दैवें
पातला पुरुषोत्तममास ॥ जो साक्षात् पुरुषोत्तमास ॥ प्रिय विशेष असे पैं ॥ ७९ ॥ त्या मासींहि तो पूर्ववत ॥
शीतवातादिकें पीडित ॥ कृष्णपक्षामाजीं कदाचित ॥ फिरत असतां वनामाजीं ॥ ८० ॥ तृषेनें अति व्याकुळ
झाला ॥ मृगतीर्थासन्निध पावला ॥ जळपानालागीं प्रवर्तला ॥ परी तें कांहीं प्राशवेना ॥ ८१ ॥ आणि होऊ-
नियां क्षुधाक्रांत ॥ वृक्षावरी चढला त्वरित ॥ कपिजातीचें चापल्य बहुत ॥ स्थिर न राहे तेथेंही ॥ ८२ ॥ उडी

१ वेदाज्ञा. २ पित्तापासून उत्पन्न झालेला. ३ शिथिल. ४ पाण्याशिवाय.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

मारितां वृक्षांतरीं ॥ मध्येंच पडला कुंडाभीतरीं ॥ बहुत दिवसांचा निराहारी ॥ कुंडाबाहेरी यवेना ॥ ८३ ॥ शरीरीं उरलें नाहीं बळ ॥ पंच प्राण झाले व्याकुळ ॥ कुंडप्रांतीं स्वल्पजळ ॥ तेथेंचि तळमळ करीतसे ॥ ८४ ॥ ऐसा तो कपि अधिकमासांत ॥ दशमीपासूनि पैं सतत ॥ पूर्ण चार दिवसपयत ॥ कुंडीं लोळत राहिला ॥ ८५ ॥ पांचवे दिनीं दोनप्रहरीं ॥ मध्यंदिनीं येतां अंधकारारी ॥ त्या मृगतीर्थाच्या पवित्र नीरीं ॥ पडला प्राण जाऊनियां ॥ ८६ ॥ असो ऐसें त्या वानरास ॥ अधिकमासांतीं पांच दिवस ॥ सहज स्नान घडतां विशेष ॥ तत्काळ निर्दोष जाहला ॥ ८७ ॥ आणि कपिदेहातें सोडून ॥ दिव्यदेही झाला तत्क्षण ॥ कीं ज्यावरूनि कोटि मदन ॥ ओंवाळून टाकावे ॥ ८८ ॥ नवघन कीं इंदीवर ॥ तैसें सर्वांग श्याम सुंदर ॥ कांसे झळके पीतांबर ॥ मेखला सुंदर त्यावरी ॥ ८९ ॥ रत्नजडित किरीट शिरीं ॥ कर्णी कुंडलें तळपती साजिरीं ॥ रत्नकेयूर वलयें करीं ॥ अग्नीपरी झळकत ॥ ९० ॥ दशांगुळीं मुद्रिका सोज्वळ ॥ चंद्रवत् प्रसन्न मुखकमळ ॥ सुस्निग्ध नीळ केश कुरळ ॥ गळां माळ वैजयंती ॥ ९१ ॥ असो ऐसा तो कपि आपण ॥ दिव्य देही जाहला जाण ॥ तों त्या सन्निध आकाशांतून ॥ दिव्य विमान पातलें ॥ ९२ ॥ इति श्रीअधिकमासमाहात्म्यसार ॥ बृहन्नारदीयपद्माधार ॥ सज्जन श्रोते एकोत चतुर ॥ त्रिंशत्तमाध्याय गोड हा ॥ ९३ ॥ ॥ इति त्रिंशत्तमोऽध्यायः ॥ ३० ॥

१ कुंडाच्या कडेस. २ सूर्य. ३ नवा (पाण्यानें भरलेला मेघ). ४ निळें कमळ. ५ कंबरेंतील दाब. ६ रत्नजडित बाहुभूषणें. ७ कडीं. ८ तेजस्वी.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

श्रीगणेशायनमः ॥ नारायण म्हणे नारदासी ॥ पुढील कथा परियेसी ॥ मृगतीर्थीं अधिकमासीं ॥ स्नानें कपीसी घडलीं जीं ॥ १ ॥ तेणें तो कपित्वासी टाकून ॥ दिव्यदेही होतां क्षण ॥ तयासन्निध आकाशांतून ॥ दिव्य विमान पातलें जें ॥ २ ॥ तयामाजीं वैष्णवलोक ॥ बैसले असती अनेक ॥ भेरीमृदंगवीणादिक ॥ वाद्यें सुरेख गर्जती ॥ ३ ॥ गंधर्व किन्नर सुस्वर गाती ॥ देवांगना नृत्य करिती ॥ स्वर्णकिंकिणी रुणझुण वाजती ॥ शोभा किती काय वानूं ॥ ४ ॥ ऐसें तें दिव्य विमान पाहुनी ॥ तो दिव्ययदेहधर कपि स्वमनीं ॥ अत्यंताचि विस्मय पावुनि ॥ मनाशींच बोलत ॥ ५ ॥ हें येथें कैसें आलें किमर्थ ॥ मज पाप्यासि कोठूनि प्राप्त ॥ हें वैमानिक सुख समस्त ॥ पुण्यात्म्यासचि योग्य असे ॥ ६ ॥ ऐसा अंतरीं विचार करी ॥ तों एक येऊनि दिव्य नारी ॥ तयाच्या मस्तकीं चंद्रापरी ॥ श्वेत छत्र धरियेलें ॥ ७ ॥ आणि दोघीजणी एकसरें ॥ तयावरी उडविती चामरें ॥ कित्येकी त्या मधुरस्वरें ॥ गाऊनि पुढें नाचती ॥ ८ ॥ हातीं घेऊनियां तांबूल ॥ एक उभी राहिली जवळ ॥ स्वर्णभृंगारीं गंगाजळ ॥ घेऊनि पुढें एक ठेली ॥ ९ ॥ ऐसें तें वैभव पाहुनी ॥ तो दिव्यदेही कपि तत्क्षणीं ॥ कुड्यावरील चित्रावाणी ॥ निश्चेष्ट स्वस्थ राहिला ॥ १० ॥ आणि म्हणे आपुल्या मनांत ॥ मी महापापी दुष्ट अत्यंत ॥ मज हें वैभव लोकातीत ॥ कवणें पुण्यें लाभलें ॥ ११ ॥ म्यां कधींही सर्व जन्मांत ॥ ऐसें पुण्य नाचरिलें खचित ॥ कीं जेणें श्रीहरिपदाप्रत ॥ विमानांतून जाईन ॥ १२ ॥ ऐसा तर्क करीत मनीं ॥ चलनवलन सर्व टाकुनी ॥ चित्रपटींच्या लेपावाणी ॥ तटस्थ जेव्हां राहिला ॥ १३ ॥ तैं तयाचें हार्द्र जाणून ॥ पुण्यशील सुशील दोघेजण ॥ हरिदूत तयासी वंदून ॥ हस्त जोडून विनवित ॥ १४ ॥ प्रभो चलावें गोलोकाप्रत ॥ कैसा उशीर लावितां येथ ॥ पुरुषोत्तमाचें सान्निध्य सांप्रत ॥ तुम्हां प्राप्त झालें असे ॥ १५ ॥ ती तयांची ऐकूनि वाणी ॥ कपि म्हणे हो माझी अजुनी ॥ असंख्य पापकर्में भुवनीं ॥ भोगावयाचीं आहेत ॥ १६ ॥ आज कोणत्या पुण्यें निगुती ॥ माझ्या पापांची झाली निष्कृती ॥ कीं जेणें मी त्या गोलोकाप्रती ॥ अनायासें पावेन ॥ १७ ॥ जितुक्या पर्जन्यधारा वर्षती ॥ कीं तृणांकुर

१ नौबती. २ सुवर्णाचे घुंगूर. ३ वानर. ४ विमानसंबंधीं. ५ सुवर्णाच्या झारींत. ६ भिंतीवरील. ७ चित्राप्रमाणें. ८ हृद्गत. (अभिप्राय).



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

भूमीं रुजती ॥ कीं रजःकण कीं तारा असती ॥ तितुकीं आहेत मम पापें ॥ १८ ॥ ऐसें असतां मज हें सुंदर ॥
कैसें लाभलें दिव्य शरीर ॥ आतां तें कारण मज समग्र ॥ विवरूनियां सांगिजे ॥ १९ ॥ ऐसें कपीचें ऐकूनि
भाषित ॥ श्रीहरिदूत तया बोलत ॥ देवा तें साधन तुम्हांप्रत ॥ कैसें नाहीं समजलें ॥ २० ॥ सर्व मासांमाजीं
उत्तम ॥ आणि श्रीहरीसी प्रिय परम ॥ ऐसा जो मास पुरुषोत्तम ॥ महापुण्य फलदायक ॥ २१ ॥ त्या पुण्यपवित्र
मासाठायीं ॥ उत्तम तप केलेंसी कांहीं ॥ जें प्रत्यक्ष देवांचेनही ॥ होणार नाहीं कदाच ॥ २२ ॥ वानरदेहें तूं
सतत ॥ भ्रमत असतां अरण्यांत ॥ मुखरोगास्तव कांहींच वस्त ॥ तुज वस्तू भक्षवेना ॥ २३ ॥ तेणें योगें
नेणतपणेंसीं ॥ निराहार व्रत तुजसी ॥ सहजवृत्या अधिमासीं ॥ घडोन आलें साचार ॥ २४ ॥ आणि स्वजाति-
चांचल्येंकरूनी ॥ वृक्षावरचीं फळें तोडुनी ॥ आपणा न भक्षवती म्हणूनी ॥ भूमीवर टाकिलींस ॥ २५ ॥ तीं
भक्षूनियां इतर जन ॥ असंख्य तृप्त झाले जाण ॥ आणि स्वयें बहु दुःखाचेन ॥ जळहि नाहीं प्राशिलेंस ॥ २६ ॥
ऐसें नेणतपणें तुजसी ॥ तप घडलें अधिकमासीं ॥ आणि त्या फळांच्या पातनेंसीं[1] ॥ परोपकार जाहला ॥ २७ ॥
आणि शीतवातातप[2] घोर ॥ साहिलेंसि तूं निरंतर ॥ मृगतीर्थीं पडूनि सांचार[3] ॥ पांच दिन राहिलासी ॥ २८ ॥
तीं पांच स्नानें झालीं तुजसी ॥ एवं[4] श्रीपुरुषोत्तममासीं ॥ रुग्णावस्थेंत[5] अज्ञानेंसी ॥ उत्तम तप घडलें जें ॥ २९ ॥
तेंचि सफळ झालें समस्त ॥ तुवां अनुभविलें हें सांप्रत ॥ व्यांजेंहि[6] केलेलें अधिमासांत ॥ सफळ होतें तुज ऐसें
॥ ३० ॥ मग जाणूनि मासप्रभावासी ॥ यथाविधि भक्तिभावेंसीं ॥ सत्कर्म करितां अधिमासीं ॥ काय फळासी
वानावें ॥ ३१ ॥ अरे त्वां जैसा साधिला स्वार्थ ॥ ऐसा साधाया कोण समर्थ ॥ अधिमासीं करितां किंचित ॥
फल अनंत लाभतें ॥ ३२ ॥ पुरुषोत्तममासामाझारीं ॥ एकचि उपोषण केलें तरी ॥ अनंत जन्मांचीं पापें सारीं ॥
निरसती जाण निश्चयें ॥ ३३ ॥ पुरुषोत्तमव्रतासमान ॥ भगवत्प्रीतिद नाहीं आन ॥ तद्वत् करिती ते धन्य ॥
आणि तेचि जाण कृतकृत्य ॥ ३४ ॥ भारतखंडीं मानवजन्म ॥ दुर्लभ असोनियां परम ॥ दैवें लाभतां तें उत्तम ॥

१ पाडण्यानें ( टाकिलींस त्यानें ). २ थंडी, वायु व ऊन. ३ खरोखर. ४ याप्रमाणें. ५ रोगीपणांत. ६ निमित्तांतरानें.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

पुरुषोत्तमा सेविती जे ॥ ३५ ॥ ते महाभाग्यवंत सकळ ॥ पुण्यस्वरूप अति निर्मळ ॥ तयांचें जन्म झालें सफळ ॥ यांत संशय नसोचि ॥ ३६ ॥ अधिमासामाजीं देख ॥ स्नान दान जप तपादिक ॥ सत्कर्मे करावीं तीं सकळिक ॥ फलद होती कोटिगुणें ॥ ३७ ॥ अहो जे अधिकमासाठायीं ॥ स्नानदानादि न करिती कांहीं ॥ ते शठ दुरात्मे खल सर्वही ॥ धिक्कार असो तयांस ॥ ३८ ॥ ऐसें त्या श्रीहरिदूतांनीं ॥ कथिलें तें सर्व ऐकुनी ॥ तो दिव्यदेही कपि स्वमनीं ॥ अत्यंत चकित जाहला ॥ ३९ ॥ पुलकांकित[1] झालें शरीर ॥ अंतरीं उदेला गहिंवर ॥ मग तीर्थदेवासी नमस्कार ॥ केला सादर भक्तीनें ॥ ४० ॥ आणि कालंजरगिरि वंदिला ॥ वनदैवतांसी नमस्कार केला ॥ सर्व लता[2]गुल्मवृक्षांला ॥ भावें घातला साष्टांग ॥ ४१ ॥ मग त्या दिव्य विमानासी ॥ प्रदक्षिणा केली विनयेंसीं ॥ हरिदूतीं अत्यादरेंसीं ॥ स्वहस्तें तयासी धरियेलें ॥ ४२ ॥ आणि इंद्रादिक देव समस्त ॥ गंगनांतुनी तया पाहत ॥ गंधर्वगण स्तुति करित ॥ किन्नर वाद्यें वाजविती ॥ ४३ ॥ ऐसा महोत्सव वहिला ॥ तो दिव्य पुरुष विमानीं बैसला ॥ सुरगणीं पुष्पवर्षाव केला ॥ आनंद झाला म्हणोनियां ॥ ४४ ॥ आणि अत्यादरें तयाचें पूजन ॥ सकळ सुरीं केलें जाण ॥ मग तेथूनि तें दिव्य विमान ॥ आकाशामाजीं प्रवेशलें ॥ ४५ ॥ स्वर्गादिलोकां अतिक्रमून ॥ गोलोकाप्रति गेलें तत्क्षण ॥ जेथें सदा सर्वत्र पूर्ण ॥ परमानंद कोंदलासे ॥ ४६ ॥ जो योग्यांसहि दुर्लभ अती ॥ जेथूनि नाहीं पुनरावृत्ती ॥ गोपगोपी गोधनें निरुती ॥ असंख्य सेविती जयातें ॥ ४७ ॥ आणि जो रासें मंडित सदा ॥ जेथें पावलें असतां कदा ॥ जरा मृत्यु आणि आपदा ॥ ह्यांची बाधा नव्हेच ॥ ४८ ॥ असो ऐशा त्या गोलोकालागुन ॥ विमान जाऊनि पोंचतांक्षण ॥ तो दिव्यपुरुष तयांतून ॥ परमानंदें उतरला ॥ ४९ ॥ आणि जेथें साक्षात् पूर्णतम ॥ बैसला असे पुरुषोत्तम ॥ तेथें जाऊनि तया प्रणाम ॥ करूनि बैसता जाहला ॥ ५० ॥ नारायण म्हणे गा ब्रह्मसुता ॥ विचार करूनि पाहे तत्वतां ॥ तो कदर्य द्विज सर्वथा ॥ यद्यपि होता पापात्मा ॥ ५१ ॥ तरी तयासि कपिजन्मांत ॥ नेणतां पुरुषोत्तममासांत ॥ सहजवृत्त्या यत्किंचित ॥

१ रोमांचित. २ वेली.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

स्नानादि कर्म घडलें जें ॥ ५२ ॥ तेणेंही तो सर्व पापांपासुनी ॥ मुक्त होऊनियां तत्क्षणीं ॥ पुरुषोत्तमाचें सान्निध्य पावुनी ॥ आनंदघन जाहला ॥ ५३ ॥ मग यथाविधि अधिकमासीं ॥ सत्कर्में करितां भावेंसीं ॥ मोक्षपद येईल हातासी ॥ यांत काय संशय ॥ ५४ ॥ नारदा बहु सांगूं काई ॥ उभयत्र सुखप्राप्तीविषयीं ॥ उत्तम साधन शोधितां पाहीं ॥ आणिक नाहीं कांहींच ॥ ५५ ॥ इतर सर्व साधनांहून ॥ पुरुषोत्तममाससेवन ॥ हेंचि एक उत्तम साधन ॥ असे जाण साचार ॥ ५६ ॥ सूत म्हणे शौनकालागुनी ॥ ऐशी नारायणमुनीची वाणी ॥ ऐकूनि तो नारदमुनी ॥ समाधान पावला ॥ ५७ ॥ आणि वंदूनि तच्चरणाब्जासी ॥ स्मरत श्रीपुरुषोत्तमासी ॥ फिरत फिरत सत्यलोकासी ॥ आनंदें जाता जाहला ॥ ५८ ॥ असो ऐका हो ऋषि समस्त ॥ तुम्हीं मज जें प्रश्निलेंत ॥ तयाचें उत्तर तुम्हांप्रत ॥ आतां बहुत काय सांगूं ॥ ५९ ॥ अहो अधिकमासासम ॥ कांहींच नाहीं पावनतम ॥ तयाचा स्वामी पुरुषोत्तम ॥ म्हणोन परम श्रेष्ठ तो ॥ ६० ॥ त्यांत यथोक्त व्रत करितां ॥ कीं अन्यहि कर्में आचरितां ॥ दुरितक्षय[1] होऊनि सर्वथा ॥ इहपरत्रीं[2] सुख होय ॥ ६१ ॥ यास्तव सर्व नर नारी ॥ पुरुषोत्तममासामाझारीं ॥ सद्भक्तिभावें एक तरी ॥ यथोक्त कर्म कीजिये ॥ ६२ ॥ भरतखंडामाजीं जन्मुनी ॥ पुरुषोत्तममासालागुनी ॥ न सेवितां केवळ अनुदिनीं ॥ प्रपंचीं आसक्त होती जे ॥ ६३ ॥ ते नराधम जाणा खचित ॥ वारंवार गतागत[3] पावत ॥ आणि जन्मोजन्मीं ते अत्यंत ॥ दुर्भागी होत निश्चयें ॥ ६४ ॥ आणि दारापत्यमित्रांदिकांशीं[4] ॥ वियोग पावती अहर्निशीं ॥ तैसेचि सर्व दुःखाचे राशी ॥ प्राप्त होती तयांस ॥ ६५ ॥ यास्तव येथें सर्व सज्जनीं ॥ अधिकमास येतांक्षणीं ॥ यथाशक्ति सद्भावेंकरुनी ॥ तयालागुनी सेवावें ॥ ६६ ॥ तेणें सकळ फळें यथोक्त ॥ प्राप्त होती जाण निश्चित ॥ असो ऐसें अधिमासाचें अद्भुत ॥ माहात्म्य असे साचार ॥ ६७ ॥ ह्या सकळमाहात्म्यासी ॥ जे ऐकती भक्तिभावेंसी ॥ तयांचे सकळ पापराशी ॥ दग्ध होती समूळ ॥ ६८ ॥ आणि तयांचे सर्व मनोरथ ॥ पुरवितो श्रीगोलोकनाथ ॥ एतद्विषयीं तुम्ही मनांत ॥ संशय कांहीं न

१ सर्व पापांचा नाश. २ ह्या लोकीं व परलोकीं. ३ जन्ममरण. ४ स्त्री, पुत्र, मित्र इत्यादिकांसी.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

धरावा ॥ ६९ ॥ याचा एक अध्याय तरी ॥ जो भक्तिभावें श्रवण करी ॥ तया सर्व तीर्थस्नानाचें सत्वरी ॥ फळ निर्धारीं लाभतें ॥ ७० ॥ सदा श्रेयस्कर भगवद्गुण ॥ तयांचें आहे यांत वर्णन ॥ म्हणोनि बुधजनीं हें अनुदिन ॥ भावें श्रवण करावें ॥ ७१ ॥ नित्य श्रवणा न होती समर्थ ॥ तरी नित्य ऐकिजे अधिकमासांत ॥ तेणें त्रिंशन्मासात्मक समस्त ॥ फळ यथार्थ लाभतें ॥ ७२ ॥ अधिकमास हा परम पावन ॥ जयाचा गेला श्रवणेंविण ॥ तयाच्या शिरीं मळ संपूर्ण ॥ त्रैलोक्यींचा कोसळतो ॥ ७३ ॥ जे अधिकमासीं प्रतिदिन ॥ अधिमासमाहात्म्य ऐकून ॥ शेवटीं वाचक द्विजालागुन ॥ वस्त्रादिकीं पूजिती ॥ ७४ ॥ तयांसि साक्षात् गोलोकेश ॥ सुप्रसन्न होतो विशेष ॥ ऐसें सूत शौनकादि ऋषींस ॥ नैमिषीं कथिता जाहला ॥ ७५ ॥ ऐसें वेदव्यासमुनीनें ॥ वर्णिलें गीर्वाण भाषेनें ॥ तेंचि म्यां हें देशभाषेनें ॥ ओंवीबंधीं वर्णिलेंसे ॥ ७६ ॥ हें अधिकमासमाहात्म्य पावन ॥ जे कां करिती श्रवण पठण ॥ तयांचे मनोरथ संपूर्ण ॥ होती पूर्ण निश्चयें ॥ ७७ ॥ माघादि मास असती अभिनव ॥ परी अधिमासाचें विशेष वैभव ॥ याचा पुरुषोत्तम अधिदेव ॥ म्हणोनि प्रभाव वाढला ॥ ७८ ॥ पुरुषोत्तम तो नारायण ॥ क्षीराब्धिशायी श्रीभगवान ॥ तयाचे जगद्रक्षणालागुन ॥ मत्स्यकूर्माद्यवतार ॥ ७९ ॥ तयांमाजील जो भार्गव[1] ॥ परशुराम रेणुकोद्भव[2] ॥ तयाचें कोंकण क्षेत्र अभिनव ॥ सह्याद्रितळीं आहे पैं ॥ ८० ॥ तेथें राजापूरनामें प्रसिद्ध ॥ नगरी आहे पूर्वसिद्ध ॥ तत्समीप धूतपापेश्वराभिध[3] ॥ ग्राम विशुद्ध आहे जो ॥ ८१ ॥ तयेग्रामीं धूतपापेश्वर ॥ शिवलिंग आहे पापहर ॥ तयाचें पूजक साचार ॥ घगवेनामक कुळ जें ॥ ८२ ॥ तयेकुळीं सर्वगुणसंपन्न ॥ जो सदाशिवतुल्य सदा शिवाभिमान ॥ तयाची पत्नी गुणनिधान ॥ पार्वती जैसी पार्वती ॥ ८३ ॥ तियेच्या पोटीं विठ्ठलासमान ॥ विठ्ठलनामा सदाशिवनंदन ॥ तो वेदशास्त्रांमाजीं प्रवीण ॥ तैसाचि ज्योतिषशास्त्रींही ॥ ८४ ॥ तयाची पत्नी रुक्मिणी ॥ रुक्मिणीपरि सुगुणखाणी ॥ तियेच्या उदरीं विठ्ठलापासुनी ॥ रघुनाथनामें जन्मला ॥ ८५ ॥ तो प्रसिद्ध रघुनाथशास्त्री ॥ अति प्रवीण तर्कालंकारीं ॥ आणि

१ भृगुकुलांत उत्पन्न ( जमदग्नीचा पुत्र ). २ रेणुकेचा पुत्र. ३ धूतपापेश्वरनामक.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

व्याकरणाख्यसागरीं ॥ निरंतर पोहतसे ॥ ८६ ॥ तयाची पत्नी सती सीता ॥ तीच होय माझी माता ॥ रघुनाथ-शास्त्री माझा पिता ॥ तीं उभयतां विख्यात ॥ ८७ ॥ त्या उभयतांपासून ॥ परशुरामनामा मी उत्पन्न ॥ माता-पितरांचे पवित्र चरण ॥ सदा अंतरीं ध्यात असें ॥ ८८ ॥ कृपासागर मातापितर ॥ तयीं प्रेरिलें माझें अंतर ॥ अधिकमासमाहात्म्य सुंदर ॥ प्राकृतभाषेंत वर्णिजे ॥ ८९ ॥ म्हणोनि तयांच्या चरणा ॥ वंदूनि प्रारंभ केला वर्णना ॥ तत्कृपेनें आजच्या दिना ॥ ग्रंथ समाप्त जाहला ॥ ९० ॥ शके अठराशें अठरांत ॥ दुर्मुखसंवत्सरीं वैशाखशुक्लांत ॥ इंदुवासर पूर्णिमा तीथ ॥ ते दिनीं ग्रंथ संपला ॥ ९१ ॥ मातापितरांच्या कृपेंकरून ॥ मुंबापुरीं ग्रंथ झाला संपूर्ण ॥ एकदां करितां श्रवण पठण ॥ पापें संपूर्ण भस्म होती ॥ ९२ ॥ याणें पुत्रपौत्रादि संतती ॥ आणि अखंडित योग संपत्ती ॥ इहलोकीं मनोरथ पुरती ॥ तैसाचि अंतीं मोक्ष लाभे ॥ ९३ ॥ ह्या एकतीस अध्याय ग्रंथें सर्वथा ॥ प्रीति होवो गोलोकनाथा ॥ ह्या ग्रंथाचा मूळकर्ता ॥ गोलोकनाथ असे पैं ॥ ९४ ॥ तेणें अंतरीं जें जें प्रेरिलें ॥ तें तें येथें पत्रीं लिहिलें ॥ न्यून अथवा अधिक झालें ॥ तरी तेणेंच क्षमिलें पाहिजे ॥ ९५ ॥ अधिमासमाहात्म्य संस्कृत ॥ तयाचें झालें हें प्राकृत ॥ तरी संत श्रोते तुम्ही समस्त ॥ भावें सतत ऐकिजे ॥ ९६ ॥ ह्या एकतीस अध्यायांभीतर ॥ जी विस्तरें आहे कथा सुंदर ॥ तीच संक्षेपें श्रोतीं सादर ॥ सावधांतरें ऐकिजे ॥ ९७ ॥ प्रथमाध्यायीं मंगलाचरण ॥ नारदमुनिप्रश्नकथन ॥ काम्यकवनीं कृष्ण जाऊन ॥ पांडवांलागून भेटला ॥ ९८ ॥ द्वितीयाध्यायीं अधिकमासाचें ॥ वैकुंठगमन सांगून साचें ॥ अधिक-मासासह श्रीविष्णूचें ॥ गोलोकगमन वर्णिलें ॥ ९९ ॥ तृतीयाध्यायामाजीं उत्तम ॥ मलमासासि पुरुषोत्तम-नाम ॥ कैसें तें लाभलें अनुपम ॥ वर्णन झालें साचार ॥ १०० ॥ चौथ्यांत आणि पांचव्यांत ॥ श्रीकृष्णें धर्मरायाप्रत ॥ द्रौपदीचें पूर्वजन्मवृत्त ॥ यथास्थित कथियेलें ॥ १०१ ॥ साहा सात आणि आठ ॥ ह्या तीन अध्यायांत चोखट ॥ दृढधन्वाख्यान प्रसंगें स्पष्ट ॥ सुदेवाख्यान वर्णियेलें ॥ १०२ ॥ नवमाध्यायीं स्नान-दानादी ॥ नियम सांगूनियां आदी ॥ पुरुषोत्तमपूजाविधि ॥ यथास्थित कथियेला ॥ १०३ ॥ दशमाध्याया-



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

माजीं पूर्ण ॥ धेनूचें महत्व वर्णून ॥ गोपूजनासहवर्तमान ॥ गोदानमहिमा सांगीतला ॥ १०४ ॥ एकादशाध्यायीं विप्रपूजेचें ॥ महत्व वर्णूनियां साचें ॥ ब्रह्मस्वापहारदोषांचें ॥ विवरण केलें असे ॥ १०५ ॥ द्वादशाध्यायांत संपूर्ण ॥ सांगूनियां स्नानमहिमान ॥ दीपप्रज्वलनाचें पुण्य ॥ अनुभवयुक्त वर्णिलें ॥ १०६ ॥ आणि दीपोच्छेदाचें फळ घोर ॥ विमलेसि मिळालें साचार ॥ तो वृतांत साद्यंत समग्र ॥ त्रयोदशांत कथियेला ॥ १०७ ॥ चतुर्दशीं आणि पंचदशीं ॥ दीपमाहात्म्य प्रसंगेंसीं ॥ मणिग्रीवाख्यान विस्तरेसीं ॥ कथिलें असे रसाळ ॥ १०८ ॥ षोडशांत भगवन्नाममहिमा ॥ अन्नदानाची गति उत्तमा ॥ उपवासव्रतनियमा ॥ यथास्थित वर्णिलें ॥ १०९ ॥ मौनभोजनव्रत सत्राव्यांत ॥ आणि वैधृति पूर्णिमा व्यतीपात ॥ ह्या तीन पर्वांचें माहात्म्य समस्त ॥ अठराव्यांत सांगितलें ॥ ११० ॥ अमाद्वादशी माहात्म्यकथन ॥ एकोणिसाव्यांत झालें पूर्ण ॥ आणि अप्सराशापविमोचन ॥ सर्व कथिलें विसाव्यांत ॥ १११ ॥ स्नानमहिमाप्रसंगेंसीं ॥ प्रेतमोक्ष कथिला एकविशीं ॥ बाविसाव्यांत सातशें प्रेतांशीं ॥ आणि राक्षसां मोक्ष लाभला ॥ ११२ ॥ तेविसाव्या अध्यायांत ॥ एकांतरोपवास व्रत ॥ आणि विप्रसेवेचा अद्भुत ॥ प्रभाव संमस्त वर्णिला ॥ ११३ ॥ चोविसाव्यांत अति निर्मळ ॥ अनेकविध दानांचें फळ ॥ आणि मेनाव्रतकथा सोज्वळ ॥ सविस्तर कथियेली ॥ ११४ ॥ पुढें पंचविसाव्या अध्यायांत ॥ स्नानादिफलकथनार्थ ॥ वीरबाहुरायाची यथार्थ ॥ कथा साद्यंत सांगितली ॥ ११५ ॥ मासव्रतोद्यापन सांग ॥ सव्विसाव्यांत कथिलें चांग ॥ आणि गृहीतनियमांचा त्याग ॥ सत्ताविसाव्यांत वर्णिला ॥ ११६ ॥ अठ्ठाविसाव्यांत शोभन ॥ सुमतिरायाचें आख्यान ॥ पुढें अध्यायद्वयें पूर्ण ॥ कदर्योपाख्यान सांगितलें ॥ ११७ ॥ शेवटीं एकतिसाव्यांत निर्मळ ॥ कदर्यमोक्षप्राप्ति सकळ ॥ आणि ग्रंथपठणश्रवणफळ ॥ वर्णूनि ग्रंथ संपविला ॥ ११८ ॥ हा एकत्रिंशाध्यायात्मक ॥ ग्रंथ झाला अलोकिक ॥ भक्तिभावें संत सकळिक ॥ श्रवण पठण करोत सदा ॥ ११९ ॥ आतां जोडूनियां करद्वयासी ॥ प्रार्थितों सकळ सज्जनांसी ॥ प्राकृतभाषें ही कथा ऐसी ॥ यथामती वर्णिली म्यां ॥ १२० ॥ न्यूनाधिकता झाली असेल ॥ तरी सज्जनीं होऊनि दयाळ ॥

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

 मज मानूनि आपुलें बाळ ॥ क्षमा केली पाहिजे ॥ १२१ ॥ हा ग्रंथ पावन उत्तम ॥ यार्णे प्रसन्न होऊनि पुरुषोत्तम ॥ श्रोत्यावक्त्यांलागीं परम ॥ भुक्तिमुक्ति देवो सदा ॥ १२२ ॥ इति श्रीअधिमासमाहात्म्यसार ॥ बृहन्नारदीय पद्माधार ॥ सज्जन श्रोते ऐकोत चतुर ॥ एकत्रिंशत्तमाध्याय गोड हा ॥ ३१ ॥ इति एकत्रिंशत्तमोऽध्यायः ॥ ३१ ॥ श्रीपुरुषोत्तमार्पणमस्तु ॥ ॥ शुभंभवतु ॥ ॥ श्रीरस्तु ॥ ॥ ॥ ॥



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

हा ग्रंथ बाळकृष्ण लक्ष्मण पाठक यांनीं वे. शा. सं. रा. रा. परशुराम रघुनाथशास्त्री घगवे यांजकडून संस्कृत बृहन्नारदीयपुराणोक्त पुरुषोत्तममासमाहात्म्य व पद्मपुराणोक्त अधिकमासमाहात्म्य यांच्या आधारानें ओंवीबद्ध तयार करवून प्रसिद्ध केला.

हा ग्रंथ सन १८६७ चा आक्ट २५ प्रमाणें रजिस्टर करून सर्व प्रकारचे व सर्व काळचे हक्क बाळकृष्ण लक्ष्मण पाठक यांनीं आपल्याकडे ठेविले आहेत.

पुस्तकें मिळण्याचें ठिकाणः—

**बाळकृष्ण लक्ष्मण पाठक,**

बुकसेलर व पब्लिशर, मोतीबाजार मुंबई नं. २.

मुद्रक—प्रभाशंकर जयशंकर पाठक, जगदीश्वर प्रिं. प्रेस, गिरगांव गायवाडी, मुंबई नं. ४.

प्रकाशक—दत्तात्रय विश्वनाथ पाठक, जगदीश्वर प्रिं. प्रेस, गिरगांव गायवाडी, मुंबई नं. ४.

आवृत्ति ६ वी. ] [ सन १९३७.

३१॥

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

## चातुर्मासांत वाचण्यालायक ग्रंथ.

| ग्रंथांचीं नांवें. | रु. आ. | ग्रंथांचीं नांवें. | रु. आ. | ग्रंथांचीं नांवें. | रु. आ. |
|---|---|---|---|---|---|
| श्रीमद्भागवत सार्थ ... | १२—० | दासबोध सार्थ ... | ४—० | सार्थ सत्यनारायण ... | ०—४ |
| भावार्थ रामायण ... | १२—० | ,, बुकसाईज ... | १—८ | ,, वटसावित्री ... | ०—३ |
| ,, बुकसाईज ... | ८—० | गुरुचरित्र पोथी ... | २—० | ,, वामनद्वादशी ... | ०—३ |
| एकनाथी भागवत ... | ६—० | ,, रेशमी बुकसाईज ... | २—८ | ,, हरितालिका ... | ०—२ |
| ,, बुकसाईज ... | ६—० | ,, ,, लहान ... | १—० | ,, ऋषिपंचमी ... | ०—२ |
| रामविजय मोठा ... | ५—० | नासिकेत ... | १—४ | ,, गणेशचतुर्थी ... | ०—३ |
| ,, लहान ... | २—० | तुकारामचरित्र ... | १—४ | ,, अनंतचतुर्दशी ... | ०—३ |
| हरीविजय मोठा ... | ४—० | मूळस्तंभ ... | १—० | ,, सोमवती ... | ०—३ |
| ,, लहान ... | २—० | शिवलीलामृत पोथी ... | ०—१२ | ,, पिठोरी ... | ०—३ |
| पांडवप्रताप मोठा ... | ६—० | ,, ग्लेज ... | १—४ | ,, वरलक्ष्मी ... | ०—२ |
| ,, लहान ... | ३—८ | ,, बुकसाईज रेशमी | १—० | ,, जन्माष्टमी ... | ०—४ |
| भक्तिविजय मोठा ... | ६—० | ,, कापडी ... | ०—८ | ,, सिद्धीविनायक ... | ०—५ |
| ,, लहान ... | ३—० | ज्ञानेश्वरी ... | १—८ | ,, सत्य विनायक ... | ०—६ |
| नवनाथ मोठा ... | ४—० | ,, साखरेकृत ... | ३—८ | ,, संकष्ट चतुर्थी ... | ०—४ |
| ,, लहान ... | ३—० | रुक्मिणी स्वयंवर ... | १—० | ,, पुरुषोत्तम मास माहात्म्य | १—० |
| सिद्धांतबोध ... | ५—० | सार्थ कार्तिकमाहात्म्य .. | १—० | व्यंकटेश विजय ... | १—८ |
| दासबोध ... | १—८ | ,, वैशाखमाहात्म्य .. | १—० | अधिक मास माहात्म्य ... | १—० |

हीं व इतर सर्व प्रकारचीं पुस्तकें मिळण्याचा पत्ता:—**बाळकृष्ण लक्ष्मण पाठक**, बुकसेलर मोतीबाजार—मुंबई २.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

